# शिपायाची बायको

लेखक

भार्गवराम विठ्ठल वरेरकर

ऑगस्ट १९४३ ]  [ किंमत ३-८-०

# प्रस्तावना

कादंबरीला प्रस्तावना नको, असा माझा आग्रह होता. पण सर्वसाधारणपणें वाचकांत, आणि अगदीं निश्चितपणें टीकाकारांत, कादंबरीच्या वाचनानंतर गैरसमज उत्पन्न होतात असें मला दिसून आलें, त्यामुळें या कादंबरीला तरी प्रस्तावना लिहिणें मला भाग पडलें.

'गोदू गोखले' या कादंबरीपासून आधुनिक ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिण्याची मी सुरवात केली होती. त्या बऱ्याचशा कादंबऱ्यांत काल्पनिक पात्रांबरोबरच आजच्या इतिहासांत विद्यमान असलेलीं ऐतिहासिक पात्रेंही मी समाविष्ट करीत आलों आहें, त्याचप्रमाणें प्रत्यक्ष घडलेले प्रसंगही समाविष्ट केले आहेत. तशीच प्रस्तुतची ही कादंबरी आहे.

प्रो. फडके यांनीं आपल्या 'उन्माद' या कादंबरींत ७ नोव्हेंबर १९३८च्या संपाचा प्रसंग अगदीं शेवटाला घातला आहे. अनिश्चित आणि अस्पष्ट असे अवास्तव आरोप करून कॉंग्रेसला दोषी ठरवण्याची प्रो० फडके यांना खोड लागली आहे. बुद्धिपुरःसर ते असें करीत असतील असें मला वाटत नाहीं. कारण या एक दिवसाच्या संपाच्या दिवशीं संध्याकाळच्या सभेला ते प्रत्यक्ष हजर असल्याचें मी पाहिलें होतें. इतर अत्याचार घडलेले त्यांनीं पाहिले कीं नाहींत तें मला माहित नाहीं.

या दिवशीं पहांटेपासून रात्रीं बारा वाजेपर्यंत ट्रॅमनें, बसनें, आणि टॅक्सीनें मी गिरणगांवांत सारखा हिंडत होतों. तो धोका पत्करतांना ज्या इच्छेनें मी ही पहाणी केली त्या इच्छेचें फळ म्हणजे ही कादंबरी.

स्वतंत्रमजूर पक्षाच्या स्वयंसेवकांनीं जरी हा दंगा माजवला होता तरीही, पूर्वीचें नातें स्मरून त्यांतल्या बऱ्याचशा स्वयंसेवकांनीं मला धोक्याच्या प्रसंगांतून संभाळून नेलें होतें, हें इथें कृतज्ञतापूर्वक नमूद करणें मला अवश्य वाटतें. प्रो. फडके जर असेच या भागांत त्या दिवशीं फिरले असते तर त्यांनीं 'उन्माद' मधें तशीं अवास्तव विधानें केलीं नसतीं.

२५९ पानावर ते म्हणतात, "निरनिराळ्या ५।६ ठिकाणीं किरकोळ दंगेधोपे झाले आणि नायगांवच्या रस्त्यावर संध्याकाळीं कामगार व संपफोडे यांची मोठीच मारामारी होऊन पोलिसांनीं अखेर गोळीबार केला. या प्रकारांत बहिरू चव्हाण नांवाच्या इसमावर एका सार्जंटानें **पिस्तुल रोखून त्याच्या छातीला भिडवून तें अक्षरशः रिकामं केलं.**" हा आरोप अक्षरशः खोटा आहे. बहिरू चव्हाण गोळीबारांत मेला

असेल, पण छातीशीं भिडवलेल्या पिस्तुलाच्या गोळीनें खास नव्हे. असले बेजबाबदार प्रसंग लिहिण्याचें धाष्ट्यं प्रो. फडके यांनीं कसें केलें याचें मला आश्चर्य वाटतें.

प्रस्तुत पुस्तकांत या संपाची जी हकिकत मी दिली आहे ती अगदीं साररूपानें आहे. मी प्रत्यक्ष पाहिलेले सर्वच प्रसंग जर दिले असते तर ते याहीपेक्षां रोमांचकर झाले असते. तरीही या गोळीबाराच्या चौकशीसाठीं नेमलेल्या कणिया कमिटीच्या रिपोर्टाला धरून जेवढे प्रसंग निर्दिष्ट करतां येतील तेवढेच या पुस्तकांत मी नमूद केले आहेत.

प्रस्तुतच्या परिस्थितीला अनुसरून प्रकाशकांनीं घातलेली पृष्ठांची मर्यादा राखणें भाग असल्यामुळें, या प्रसंगांची जंत्री अगदीं थोडक्या शब्दांत मी दिली आहे. विस्तृत वर्णन केलें असतें तर या कादंबरीची पृष्ठसंख्या दुप्पट वाढली असती.

हाजीकासम वाडी,
मुंबई नं. ७
१ आगस्ट १९४३

**भा. वि. वरेरकर**

# शिपायाची बायको



## १

शिपायाची बायको म्हटलं म्हणजे आमच्या वहिनीला वाईट वाटत असे. तसं पाहिलं तर ती शिपायाची बायको नव्हती. तिचा नवरा—माझा दादा—पोलिस इन्स्पेक्टर होता—म्हजजे सब इन्स्पेक्टर होता. शिपायाला हवालदार, हवालदाराला सरदार आणि सब इन्स्पेक्टरला इन्स्पेक्टर म्हणायचं असा सर्वसाधारण शिरस्ता आहे. तसंच आमच्या दादाला म्हणत असत, आणि म्हणूनच वहिनीला कुणी शिपायाची बायको म्हटलं कीं राग येई. आमचा दादा एम्. ए. झाला होता. विश्वविद्यालयाची ही शेवटची परीक्षा दिल्यावर प्रोफेसर व्हावं अशी त्यांची फार इच्छा होती. मास्तर होणं सहज साध्य होतं, पण तें त्याला आवडत नव्हतं. नोकरीच करायची तर त्याला कांहीं दर्जा हवा, हुद्दा हवा, अशी त्याची महत्वाकांक्षा होती. प्रोफेसर व्हायला कांहींतरी क्लास मिळायला पाहिजे होता, तसाच कुठंतरी लागाबांधाही हवा होता. तसा तो नसल्या-मुळं त्यानं पोलीसखात्यांत एक अर्ज पाठवला, तो मंजूर झाला, पोलिस ट्रेनिंग कॉलेजांत प्रवेश मिळाला आणि थोड्याच दिवसांत तो जेव्हां सब इन्स्पेक्टर म्हणून नोकरीवर रुजू झाला, तेव्हां त्याला आवडत असलेला रावसाहेब हा हुद्दा, राजाच्या जन्म-दिवसाच्या किंवा इंग्रजी पाडव्याच्या कुठल्याही यादींत नांव न येतां, एकदम मिळाला.

मला वाटतं, वहिनीचा आणि दादाचा परिचय पूर्वी कुठंतरी कॉलेजांतच झालेला असावा! 'असावा' असं मीं आपलं उगीचच म्हटलं—कारण तीं उभयतां प्रत्यक्ष कॉलेजांतल्या लाग्याबांध्याच्या गोष्टी बैठकींत चारचौघांसमोर कधींच उल्लेखीत नसत. पण एकादे वेळीं भांडण झालं, कीं एकमेकांच्या उखाळ्यापाखाळ्या काढतांना कॉलेजांतल्या संबंधाचा उल्लेख अगदीं हटकून येत असे. एरवीं मात्र लग्नापूर्वी आपला परिचय होता हें कबूल करायची त्या उभयतांपैकी एकाचीही तयारी नसे.

वहिनीसुद्धां बी. ए. झालेली होती. मुंबईतल्या कुठल्याशा एका प्रख्यात शाळेंत लग्न होण्यापूर्वी ती मास्तरीण होती. एवढ्याचसाठीं केव्हां केव्हां मी तिला 'मास्तरीण काकू' म्हणत असें. पण 'शिपायाची बायको' म्हटल्यानंतर तिला जितका राग येई तेवढाच 'मास्तरीण काकू' म्हटल्यानंतर तिला आनंद होई. आणि म्हणूनच मी तिला मुद्दाम शिपायाची बायको म्हणत असें.

एक 'आदर्श मास्तरीण' व्हावं अशी तिची महत्वाकांक्षा होती. प्रोफेसर व्हावं असं दादाप्रमाणेंच तिला देखील वाटत होतं कीं काय असा मला संशय होता. त्या संशयाचा उलगडा पुढं झाला. पण एवढं खरं, कीं लग्न झाल्यामुळं मास्तरणीची नोकरी सोडावी लागली ही गोष्ट तिच्या मनाला जाणवत असे.

तसं पाहिलं तर मी सुद्धां वयानं वहिनीच्या बरोबरीचाच होतों. मी सुद्धां बी. ए. झालों असतों. पण—

पण तें असं झालं, कीं मला अभ्यासाचा कंटाळा होता. कॉलेजांत गेल्याशिवाय, टर्म्स भरल्याशिवाय जर परीक्षेला बसतां आलं असतं तर मी सुद्धां बी. ए. झालों असतों. पण शाळामास्तर आणि स्त्रिया यांच्यासाठीं ही सोय नागपूरच्या युनिव्हर्सिटीनं जशी केली आहे तशी आमच्या मुंबईच्या मुर्दाड युनिव्हर्सिटीनं केलेली नसल्यामुळं पदवीचा टिळा मला लावून घेतां आला नाहीं.

शिवाय तें असं होतं—आम्ही घरचे फारसे संपन्न नव्हतों. दादाच्या शिक्षणापायीं बराच खर्च झाला होता. पदवी घेतल्यावरसुद्धां दादाचीं कांहीं वर्षं फुकट गेलीं होतीं. आणि आमचं गांव हें असं खेड्यांत—

जाऊं द्या—ही अंदरकी बात मी सहसा कुणाला सांगत नसें. दादाला आतां चांगला पगार मिळत होता. माझ्यासारख्या उनाड पोराला घरीं बसून पोसायला त्याची ना नव्हती. मग मी तरी उद्योग धंदा कां करावा?

सहजच आतां खेड्यांतली वस्ती सुटून आम्ही शहरांत राहूं लागलों होतों. शहर म्हटलं कीं मुंबई, पुणं असा सर्वसाधारण समज असतो. पण आम्हां खेडवळांच्या हिशेबीं जिल्ह्या-तालुक्याचं ठाणं सुद्धां शहराच्या सदराखालीं येतं. याची कल्पना पुणें-मुंबईकरांना व्हायची नाहीं.

पण वहिनी मात्र या आमच्या शहराच्या व्याख्येवर संतुष्ट नसे. तिचं सारं आयुष्य मुंबईत गेलं होतं. मुंबईच्या गर्दीत ती वाढली होती. माझ्या दृष्टीनं वाटणारी ही जिल्ह्याची शहरी वस्ती तिच्या नजरेनं मागासलेली ठरत होती. म्हणूनच ती या रहाणीवर असंतुष्ट असे.

आमच्या घरांत तशीं फारशीं माणसंही नव्हतीं. दादा, वहिनी, मी यांच्याखेरीज आमची एक दूरची आत्त्या होती. चूलपाणवठ्याचं साम्राज्य या आत्त्याच्या हातीं सोपवून आम्ही आळसांत वेळ काढीत असूं. अर्थात् दादा या सदरांत येत नव्हता. तो एक जबाबदार अधिकारी होता. आणि तो त्याचा अधिकारही गृहसौख्याला पारखं करण्याला पुरेसा होता.

आणि म्हणूनच वहिनीची असंतुष्टता दिवसेंदिवस वाढत होती. जिल्ह्याचं ठिकाण असलं तरी इथं चांगलीशी लायब्ररी नव्हती. ही लायब्ररी महाराष्ट्रांतली जुन्यांतली जुनी असल्याचा गांवच्या लोकांना अभिमान होता—पण तो अभिमानच आम्हां लोकांच्या दृष्टीनं मोठासा अभिमानास्पद नव्हता. एल्फिन्स्टन साहेबानं हिंदुस्थान सोडतांना विकलेला आपला पुस्तकसंग्रह, मला वाटतं, या लायब्ररीच्या पुराण्या प्रवर्तकांनीं केव्हांतरी विकत घेतला असावा. नवीं पुस्तकं अगदींच नव्हतीं असं नाहीं—पण तीं, टिळकांचं गीतारहस्य, इंदुप्रकाशचं कथासरित्सागर, भागवत-भारताचं भाषांतर अशा सदरांतलीं होतीं. अगदीं आधुनिक पुस्तकं घेऊन वाचकांची वाचनाची भूक भागवायची वृत्ति अजून या गावांत उत्पन्न झाली नव्हती.

तसं पाहिलं तर इथल्या लोकांत मुळीं वाचकच नव्हते. जे कुणी होते ते फार तर रोजचीं किंवा आठवड्याचीं वर्तमानपत्रं वाचीत. आधुनिक पुस्तकं वाचायची जाणीव फारशी कुणाला झालीच नव्हती. जे असे क्वचित् कुणी होते ते आपापल्यापुरतीं पुस्तकें स्वतः विकत घेत. अशा कांहीं माणसांशीं मुद्दाम ओळखी करून मी त्यांच्याकडलीं पुस्तकं आणून वहिनीला वाचायला देत असें.

विद्यार्थीदशेंत आमचा दादा मोठा जबरदस्त वाचक होता. पण नोकरी पत्करल्या-

पासून त्याला वाचायला फुरसतच मिळत नसे. हीं जीं पुस्तकं घरीं येऊन पडत त्यांच्याकडे तो ढुंकूनसुद्धां पहात नसे. पुस्तकं वाचण्याची आवड वहिनीला आहे, तिच्यासाठीं कांहीं पुस्तकं घ्यावीं, अशी कल्पना करण्याइतकी फुरसत नोकरीच्या घणाघाईमुळं त्याला मिळत नव्हती.

आणि मी म्हणतों, वहिनीनं तरी पुस्तकांची मागणी कां करूं नये ? तिला पुस्तकं पाहिजे होतीं हें त्याला तरी कसं कळावं ? एकदा वहिनीला मी तसं म्हटलंसुद्धां—पण ती गाल फुगवून उगीच बसली. मला तिनं धडसं उत्तरदेखील दिलं नाहीं. म्हणजे वहिनीचा स्वभाव धुढा होता असं मात्र मुळींच नाहीं. विद्यार्थीदशेंत ती कशी होती हें कळायला मला जरी कांहीं साधन नव्हतं, तरी त्यावेळीं तिचा स्वभाव एकंदरींत मोठा आनंदी आणि खिलाडु असावा असा माझा समज होता.

पुन्हां हें ' असावा ' आलं ! असावा म्हटलं म्हणजे, तसा दिसत नसतांनाही तो केव्हांतरी तसा होता, असा अंदाज करणं होय ! आणि तें तसंच होतं. कुठंतरी कांहींतरी शल्य होतं आणि तें शल्य तिला कुठंतरी डांचत होतं.

आमच्या घरीं रोजचा टाइम्स येत असे—सरकारी नोकराच्या घराचं हें भूषण असतं—दादा तो टाइम्सचा अंक क्वचित् वाचीत असे. मी मात्र छोट्या जाहिराती पासून शेवटच्या ओळीपर्यंत अथपासून इतिपर्यंत रोज वाचून काढीत असें. वहिनीला त्याचाच राग येई. एकदां तर ती चिडून उद्गारली, 'Why this dirty paper in our house ?' आमची वहिनी रागावली कीं एकदम इंग्रजी बोलत असे. ती म्हणायची, ' तुम्हीं वाचतां भावजी, म्हणून हें पत्र आमच्या घरीं येतं. ते कधीं हातसुद्धां लावीत नाहींत या पत्राला. मीं म्हटलं, दुसरं कांहींतरी मागवा—पण तुम्हांला हवंय ना हें ? '

' तें असं आहे वहिनी, ' मी म्हणत असें, ' कांहींतरी वाचायला हवं ना ? मी नको म्हटलं, तूं नको म्हटलंस, तरी हा टाइम्स आमच्या घरीं येणार. सरकारी नोकराच्या घराचं तें सौभाग्य आहे. एवढे ऑफिसर लोक आपल्या घरीं येतात, त्यांनीं जर पाहिलं कीं इथं टाईम्स नाहीं तर काय वाटेल त्यांना ?—'

' तुमच्याशीं बोलण्यांतच मुळीं अर्थ नाहीं ! ' असं म्हणून रागारागानं वहिनी तिथून निघून जाई.

एवढं खरं, कीं वहिनीला हवीं होतीं तीं पत्रं आमच्या घरींच काय पण गावांत

सुद्धां क्वचितच मिळण्याजोगीं होतीं. स्वतः तीं पत्रं घेण्याचं आमचं सामर्थ्य होतं— पण 'आमच' या शब्दाची व्याख्या अजून ठरली नव्हती. घर दादाचं होतं, मी भाऊ असलों तरी आश्रित होतों, कारण मी कांहींच उद्योग करीत नव्हतों किंवा पैसा मिळवत नव्हतों, वहिनीसुद्धां आश्रितच होती असं म्हटलं तर कुणाला पटायचं नाहीं—पण वस्तुस्थिति तिच्या आणि माझ्या दृष्टीनं तशीच होती. नवऱ्याच्या घरावर गृहिणीचा ताबा चालतो असं सर्वसाधारणपणें समजलं जातं. मी पुष्कळ कुटुंबं पाहिलीं आहेत. पुष्कळ कुटुंबांच्या अंतर्व्यवस्थाही माझ्या नजरेंतल्या आहेत. आणि म्हणूनच मला वाटतं, सर्वसाधारणपणें असलेला हा समज सर्वस्वी बरोबर नाहीं.

वहिनीलाही तसंच वाटत होतं म्हणून तिची ही अशी आबाळ होत होती. अमुक एक वर्तमानपत्र तिला पाहिजे आहे हें दादाला कळत नव्हतं असं नाहीं. कदाचित् तिनंही त्याच्याकडे तशी मागणी केली नसेल असं कांहीं मला वाटत नाहीं. पण ज्याअर्थी तें पत्र आमच्या घरीं आलं नाहीं त्या अर्थी घरची सत्ता सर्वस्वी दादाच्या हातीं होती असं मीं म्हटलं तर तो माझा दोष होणार नाहीं.

गोष्ट क्षुल्लक होती पण ती तिला जाणवत होती. तिच्या स्वभावाला अनुसरून ती तसं स्पष्टपणें बोलून दाखवीत नव्हती. वाचायला कांहींच मिळत नसल्यामुळं केव्हां केव्हां ती तासाचेतास आरामखुर्चीत पडून रहात असे. अशा वेळीं तिच्या झांकलेल्या डोळ्यांतून बाहेर पडणारे भले मोठे आसवांचे थेंब तिच्या गालावरून ओघळून गेलेले मला दिसून येत. त्यावेळीं सहानुभूतीनें माझ्याही अंतःकरणाची कालवाकालव होई.

मी तरी असाच बेकार होतों ना ? तिचा कांहीं तरी अधिकार होता-'पत्नी' या नात्याचा अधिकार होता. तसं म्हटलं तर 'भाऊ' या नात्यानं माझाही अधिकार होता. पण बेकार राहिल्याबद्दल लोकं नांवं ठेवीत तीं मला ! पण तिला कुणीच कधीं बेकार म्हटलं नाहीं.

कुणी तसं म्हटलं नाहीं तरीही ती बेकारी तिला जाणवत होती. अशीच एक दिवस ती झांकल्या डोळ्यांतून आसवं गाळीत आरामखुर्चीवर पडली असतांना मी तिला हटकलं. माझ्या हाकेनं ती घाबरल्यागत दचकून उठून डोळे पुसून हंसायचा प्रयत्न करीत तशीच खुर्चीत ताठ बसून म्हणाली, "काय आहे भावजी ?"

"टिपं गाळीत होतीस वहिनी ?" असं विचारतांना माझाही गळा भरून आला.

"नाहीं," वहिनी म्हणाली, "हल्लीं माझ्या डोळ्यांना कांहीतरी झालंय—"

" डोळ्यांना ? " मी भीतभीत विचारलं, " कीं डोक्याला ? कीं मनाला ?— काळजाला ? "

" मोठ वाईट आहांत तुम्ही भावजी ! " हंसायचा रडवा प्रयत्न करीत वहिनी म्हणाली, " माणूस रिकामं असलं कीं भलत्या विचाराचे ताणे-वाणे मांडित बसतं. तसंच झालंय तुमचं. जरा कुठं माझ्या डोळ्यांतून पाणी आलं तर त्याचे किती लांब धागेदोरे काढलेत तुम्हीं ? "

" खरं आहे. " मीं म्हटलं, " माणूस रिकामं बसलं म्हणजे त्याला जगाकडे पहावंसं वाटतं. पहातां पहातां दृष्टि सूक्ष्म होते. व्यवहारी माणसाला न दिसणाऱ्या गोष्टी माझ्या-सारख्या रिकामटेकड्या बघ्याच्या दृष्टीला दिसूं लागतात. अन् त्या दिसल्या म्हणजे विचारल्याशिवाय रहावत नाहींसं होतं—" मी थोडा वेळ थांबलों पण वहिनी कांहींच बोलत नाहींसं पाहून मीं म्हटलं, " असं पहा वहिनी, मी जसा रिकामा आहें तशीच तूं सुद्धां नाहीं का रिकामी ? "

वहिनी एकदम दचकल्यासारखी झाली आणि म्हणाली, " कां बरं ! घरचं काम असतं ना मला ? "

" कसलं काम ? " मीं म्हटलं, " तीनचार माणसांचा हा संसार ! जेवण करते आत्त्या, तूं कुठं तिच्या हाताजवळ इकडे तिकडे करतेस. क्वचित् एकादा जिन्नससुद्धां करतेस—पण तें कांहीं काम नव्हे—तो नुसता खेळ आहे—विरंगुळा आहे. म्हणूनच मी म्हणतों, मी जसा बेकार तशी तूंही बेकारच आहेस. रिकामपणीं राहिल्यानं मला भलते विचार सुचतात असं म्हणतेस—आणि रिकामपणीं राहिल्यामुळं तुला जे विचार सुचताहेत ते भलतेच आहेत असं मला वाटलं, तर तो माझा दोष का ? "

मी अगदीं जीव तोडून बोलत होतों त्याचा तिच्या मनावर परिणाम झाला असावा. तिच्या डोळ्याला टचकन पाणी आलं.

" आतां हें पहा—" मीं एकदम म्हटलं, "—हें पहा, पुन्हां आसवं गाळलींस. काय झालं ? "

एक मोठा थरथरता सुस्कारा सोडून ती क्षणभर स्तब्ध बसली आणि नंतर आंवढा गिळून म्हणाली, " खरं आहे. भावजी खरं आहे. रिकाम्या घरांत भुतं शिरतात असं म्हणतात तें खरं आहे. काय करायचं ?— रिकामं बसायचं नाहीं तर करायचं तरी काय ? कांहींच कुठं मार्ग दिसत नाहीं. इथल्या बायकांचं माझं पटत नाहीं—त्या आहेत

जुन्या काळच्या. त्यांना पाहिजे आहेत गांवच्या उखाळ्या पाखाळ्या. तसले गदळे घालीत बसायची मला चीड आहे. आतां या मामलेदार मुनसफांच्या बायका आहेत. पण मीं पाहिलंय, त्या देखील तशाच ! नवऱ्याच्या मोलानं त्या बायकोचा दर्जा लावतात. त्यांच्या लेखीं मी कांहीं त्यांच्या दर्जाची नव्हे. तसं पाहिलं तर त्या कांहीं माझ्या इतक्या शिकलेल्या नाहींत. पण मुनसफ मामलेदाराशेजारीं पोलिस सब इन्स्पेक्टरचा जो दर्जा, त्याच दर्जानं त्या माझ्याकडे पहातात आणि मला तें मग जाणवतं. राहतां राहिल्या वरच्या अधिकाऱ्यांच्या बायका—डिस्ट्रक्ट जज्ज, एक्झिक्यूटिव्ह इंजिनिअर, सिव्हिल सर्जन, असिस्टंट कलेक्टर, डेप्युटी कलेक्टर यांच्या बायका—एक कलेक्टर काय ते गोरे साहेब आहेत. पण या काळ्या साहेबांच्या बायका, लुगडं नेसलों तरी आपण मडमा आहोंत अशी कल्पना करतात. म्हणून त्याही माझ्यासारखीला कमीच लेखतात. माझी भाषा समजेल अशी आतां आहे कोण इथं ? मी माझ्या मनाशीं विचार करतें, त्यावेळीं या साऱ्या मोठ्या म्हणवणाऱ्या बायकासुद्धां माझ्यापेक्षां कमी दर्जाच्या वाटतात–"

" खरंच तें, " मी मधेंच म्हटलं, " मॅट्रीकच्या पलीकडे गेलेली एकसुद्धां नाहीं त्यांत !—"

" तेंच जाणवतं मला ! " वहिनी आपल्याशींच बोलल्यागत म्हणाली, " मी बी. ए. आहें—फर्स्ट क्लासांत मी आलें होतें—एवढीं बक्षिसं पदकं मिळवलीं—आणि आतां मी काय करतें आहें ? कशाला मी एवढा जिवाला त्रास करून घेतला ? जीव तोडून कां एवढा अभ्यास केला ? रेसकोर्सवरच्या घोडीसारखी ऊर फुटेपर्यंत परीक्षा देण्याची कां एवढी दौड केली ?—"

ती एकदम मधेंच थांबली. तिच्या चेहऱ्यावरची रडवी कळा जाऊन तिची मुद्रा क्रूर झाली होती. मला वाटतं, तें तिचं तिलाच जाणवलं. कसल्यातरी सात्त्विक संतापानं मस्तकाला चढलेलं रक्त खालीं उतरेपर्यंत ती थांबली, आणि नंतर अगदीं मोकळ्या मनानं हंसून म्हणाली, " पण तुम्हीं आहांत इथं भावजी, म्हणून माझ्या जिवाला कांहींतरी विरंगुळा आहे. जरा बोलतां तरी येतं तुमच्याबरोबर—"

" पण मी तरी कुठं तुझ्या तोलाचा आहें वहिनी ? " मीं म्हटलं, " मी नुसता मॅट्रिक आहें—या ज्या इतर बायका आहेत त्यांच्यासारखाच मी एक आहें. नव्हे, त्यांना एक सामाजिक दर्जा तरी आहे. मी कोण आहें ? भावाच्या जिवावर चरत

रहाणाऱ्या माझ्यासारख्या बेकार बकऱ्याची समाजांत काय किंमत आहे याची कल्पना तुला घरीं बसून यायची नाहीं वहिनी ! ”

असंच बोलतांना ती चिडली होती–पण तसंच बोलतांना मी मात्र रडकुंडीला आलों होतों. वहिनीला माझी दया आली. ती म्हणाली, “ असं म्हणूं नका भावजी. तुम्हांला काय वाटतं याची कल्पना मला चांगली आहे. तुम्ही बेकार आहांत म्हणून लोक तुम्हांला नावं ठेवतात. पण मी बेकार आहें म्हणून त्याचं कुणालाच कांहीं वाटत नाहीं. बेकार भाऊ लोकांच्या डोळ्यांत सलतो. पण बेकार बायकोची दया कुणालाच येत नाहीं, कीं ही बाई घरीं बेकार बसली आहे म्हणून तिला कुणीं नावंही ठेवीत नाहीं. बायको आहें ना मी कुणाची तरी ? असं आहे हें दुर्दैव आम्हां बायकांचं ! ”

“ मीं आतां असा विचार केला आहे—” मीं म्हटलं, “ कीं मुंबईला जाऊन कुठंतरी नोकरी पहायची—”

“ कां हा निर्दयपणा आठवला तुम्हांला ? ” एकदम दचकून माझ्याकडे पाहून वहिनी म्हणाली.

“ निर्दयपणा कसला यांत ? ” मीं म्हटलं, “ असं किती दिवस मी भावाच्या जिवा-वर तुकडे मोडीत बसूं ? लोक छीः थू करतात तें किती दिवस सहन करायचं ? ”

“ पण त्यांनीं कांहीं तुम्हांला नोकरी करायला जा असं म्हटलं नाहीं ! ”

“ तें खरें आहे, पण दादा तसं म्हणेपर्यंत मुकाट्यानं बसून राहणं योग्य होईल का ? ‘ आतां पुरे झालं, आतां एकदां कुठंतरी नोकरी पहा आणि माझा बोजा थोडा हलका कर. ’ असं दादा म्हणेपर्यंत मूर्दाडपणा दाखवणं माझ्या वयाच्या पुरुषमाणसाला शोभेल का ? ”

“ पण मग मी काय करूं ? तुम्ही आहांत म्हणून मला बाहेरच्या जगाची कांहीं-तरी माहिती कळतेय. तुम्ही कुठंतरी जातां, कांहींतरी वाचतां, मला येऊन सांगतां–घटकान् घटका माझ्याशीं चर्चा करतां. एवढंच ना माझ्या जिवाला समाधान आहे ? तेवढंदेखील समाधान हिरावून घेणार का तुम्ही ? ”

बोलतां बोलतां तिच्या डोळ्यांना पुन्हां पाणी आलं.

तिला काय वाटत होतं याची मला कल्पना नव्हती असं नाहीं. पण मी तरी काय करणार होतों ? गांवच्या लोकांचा जाच मला असह्य होत होता. निरुद्योगी राहून

रोज सारा गांव पालथा घालीत राहायची संवय माझ्या अंगीं इतकी बाणत चालली होती, कीं कोणत्याही प्रकारची कर्तबगारी दाखवण्याचं माझं सामर्थ्य आतां हळुहळू नाहींसं होत चाललं आहे कीं काय अशी शंका मला येऊं लागली होती. दादाचा स्वभाव अगदीं एकमार्गी होता. आपल्या नोकरीपलिकडे कोणत्याच गोष्टीचं त्याला चोज वाटत नसे. सब इन्स्पेक्टर या नात्यानं त्याची मोठी ख्याती झाली होती आणि त्या ख्याती-मुळंच नोकरी चोख बजावण्याचा हव्यास त्याच्याठायीं उत्पन्न झाला होता. म्हणूनच मला वाटतं, वहिनीकडे त्याचं दुर्लक्ष होत होतं.

" कसला विचार करतां आहांत भावजी ? " वहिनी म्हणाली.

उत्तर देण्यापूर्वी मीं आधीं थोडंसं हंसून घेतलं. त्या हंसण्यानं मनांत आलेला कुढा विचार मावळला असा मी समज करून घेतला नी म्हटलं, " पत्नी आणि नोकरी यांच्यांत जास्त आकर्षक काय याचा विचार करीत होतों—" मी कांहींतरी भलतंच बोलून गेलों असं मला वाटलं. पण माझ्या त्या उद्‌गारांनुळं वहिनी हंसली असं पाहून मी म्हटलं, " आतां मी कांहीं अगदींच लहान नाहीं. माझ्याबरोबरचीं माणसं नोकऱ्या पत्करून चांगलीं कर्तीसवरतीं झालीं आहेत. कधींकाळीं तीं भेटलीं तर लाजेनं मला खालीं मान घालावी लागते. तेंच मला जाणवतं आहे. मी गेलों तर तूं एकटी पडशील हें मला कळतं—पण केव्हां केव्हां असं वाटतं, कीं मी नसलों तर दादा आजच्यापेक्षां तुझ्याकडे कदाचित् जास्त लक्ष देईल. म्हणूनच मा मुंबईला जायचा विचार केला आहे. "

" त्यांना विचारलं होतं का ? " वहिनी संकोचून म्हणाली.

" दादाला काय विचारायचं ? " मीं म्हटलं, " कुठंतरी नोकरी पहा, असं अजून त्यानं म्हटलं नाहीं हेच त्याचे उपकार म्हणायचे. माझं मलाच नको का कळायला ? "

" असं मला म्हणतां येत नाहीं ! " केविलवाणी मुद्रा करून वहिनी म्हणाली, " मला असं कां म्हणतां येत नाहीं ? कांहींतरी करायची धमक तुमच्या इतकीच माझ्या अंगीं आहे असं नाहीं तुम्हांला वाटत ?—" मी कांहीं बोलत नाहीं असं पाहून तिनं पुन्हां विचारलं, " सांगा ना, मी दुबळी आहें का ? नेभळी आहें का ? नालायक आहें का ? मग तुम्हीं म्हणतां तसं म्हणायचा धीर मला कां होत नाहीं ?—"

या प्रश्नाला मी तरी काय उत्तर देणार होतों ? वहिनीची योग्यता मी जाणत होतों. कर्तबगारीची हांव तिच्याठायीं असणं जितकं अशक्य नव्हतं तितकंच अस्थानींही नव्हतं.

" मग मुंबईला जायचं तुमचं निश्चितच झालंय तर ? " कठोरपणानं वहिनीनं विचारलं.

" तसंच कांहीं नाहीं, " मी जरा शरमून म्हटलं, " पण मी अजून जरा विचार करतों आहें. "

" विचार करायच्या आधीं एकदां त्यांना विचारा ! " असं म्हणून वहिनी एकदम उठून तिथून निघून गेली.



आमच्या सुदैवानं त्या दरिद्री जिल्ह्यांतून दादाची त्यावेळीं जिथं बदली झाली, तें जिल्ह्याचं ठाणं आमच्यासारख्या माणसांच्या वसतीला पुष्कळसं अनुकूल होतं.

अर्थात् मुंबईची त्याला सर आली नसती हें मात्र मला पुन्हां पुन्हां जाणवत होतं.

परिस्थिति ध्यानांत घेऊन दादानं खटपट करून ही बदली करून घेतली असावी असा वहिनीचा समज झाला होता. ती मला म्हणाली, " बदलीच करून घ्यायची मग मुंबईला कां घेतली नाहीं ? "

बी. ए. झाल्यानं कांहीं माणसाला व्यवहारज्ञान येत नाहीं.

मीं म्हटलं, " मुंबई प्रांताच्या कारभारांत जे निरनिराळे विभाग आहेत, त्या विभागाबाहेरच्या एकाद्या विभागांत बदली करून घेणं देखील मोठं कठीण जातं. मुंबई विभाग हा अगदीं स्वतंत्र विभाग आहे. त्या विभागांतच ज्याच्या नोकरीची सुरवात झाली असेल त्याला मुंबईबाहेर जावं लागत नाहीं. मुंबई विभाग हा मुंबई प्रांताचा मेरुमणी आहे. तिथं इतरांचा शिरकाव होणं शक्य नाहीं. "

" मग मुंबईतच यांनीं कां नोकरी नाहीं धरली? " वहिनी रागारागानं म्हणाली.

"तुझ्याशीं लग्न व्हायच हें त्यावेळीं कुठं त्याला माहीत होतं?" मी म्हटलं, "तसं माहीत असतं किंवा तसं लग्न झालं असतं, तर आज हा प्रश्नच उद्‌भवला नसता!"

आपल्याशींच बोलल्यासारखं करून वहिनी तोंडातल्या तोंडांत पुटपुटली, "फर्स्ट क्लास एम्. ए. ला हें एवढं सुद्धां कळूं नये!"

"तसं नव्हे वहिनी—" वडिलकीचा आव आणून मीं म्हटलं, "शहरची भाऊगर्दी कित्येक माणसांना आवडत नाहीं. शिवाय मुंबईतल्या नोकरांचा कामाचा पसाराही फार मोठा असतो. प्रमोशन मिळतं खरं पण अधिकाराची जागा मिळायला तिथं फार वेळ लागतो—"

"बरं, बरं," वहिनी चिरडीला येऊन म्हणाली, "अधिकाराची जागा म्हणे! मला काय करायचं आहे त्या अधिकाराच्या जागेशी?"

"नोकरी आहे ती तुला नव्हे वहिनी!"

'तें मला कळतं. मी नोकर नाहीं–पण मी बायको आहें. माझ्या सुखसोयींकडेही पाहिलं पाहिजे नोकर नसलें तरी मी पत्नी आहें. माझ्या सुखसोयीचा भार आपल्यावर आहे हें यांना कळायला हवं होतं!"

आज पहिल्यानंच वहिनी इतकं उघड उघड बोलली. कोणत्याही बाबतींत दादाला तिनं दोष दिल्याचं यापूर्वी मला दिसून आलं नव्हतं. विकोपाला जाऊं नये म्हणून मी कांहींतरी निमित्त करून तिथून पाय काढला.

जिल्ह्याच्या या गांवीं आल्यापासून वहिनी पूर्वीपेक्षां जास्त उल्हसित झाली होती. इथं काहीं मित्रमंडळी जोडली गेली होती. गावांत बायकांचा छोटासा एक क्लब होता. त्या क्लबांत पत्ते, कॅरम, बॅडमिंन्टन, टेनिसचे रोज झडणारे अड्डे होते. या अड्ड्यांत वहिनी मिसळली होती. खेळाची तिला आवड होती असं नाहीं. पण पूर्वीच्या गावीं असताना घरीं बसून राहायच्या झालेल्या कोंडमाऱ्याचं उट्टं ती इथं काढीत होती.

या गांवातली लायब्ररीही एकंदरींत बरी होती. वहिनीला हवीं होतीं तीं वर्तमानपत्रं या लायब्ररींत येत होतीं. त्यामुळं आतां तिच्या वाचनाची सोय झाली होती. कोणतंही आजतागायत पुस्तक जरी इथं येत नव्हतं तरीही, बरेच दिवस कांहींच वाचायला न मिळाल्यामुळं, मिळत होतीं तींच पुस्तकं आम्हां दोघांनाही आजतागायत वाटत होतीं.

इथं आल्यापासून मी बराच भटकूं लागलों होतों. इथं एक गावांतलं 'वाङ्मय मंडळ' होतं. त्यांत मीं प्रवेश मिळवला होता. साहित्यिक म्हणवणारे कांहीं लेखक

या वाङ्मय मंडळाचे सभासद होते. त्यांतल्या कित्येकांनीं लघुकथेपलिकडे फारशी मजल मारलेली नव्हती. तरीही 'ओसाड गावांत एरंड बळी' या नात्यानं ते सारे बडे लेखक म्हणून मिरवत होते.

या सभासदांत कवींची संख्या मात्र भरपूर होती. पण त्यांतल्या कुणाचीही कविता फारशी कुठं प्रसिद्ध झाली नव्हती. तसं पाहिलं तर मीही आपल्या परीनं थोडा कवि होतोंच—लेखक सुद्धां होतों. गणपतीच्या मेळ्यासाठीं मी पुष्कळसे संवाद लिहिले होते. त्या संवादाचीं पुस्तकं छापून प्रसिद्ध झालेलीं असल्यामुळं लेखकांच्या श्रेणींत यायचा अधिकार मला प्राप्त झाला होता.

या वाङ्मय मंडळांत जीं माणसं होतीं तीं बुद्धीनं जरी मोठीशीं असामान्य नसलीं तरी वाङ्मयाबद्दल अंतःकरणपूर्वक कळकळ बाळगणारीं होती. लेखक या नात्यानं जरी त्यांना मोठासा दर्जा नसला, तरी वाचक या नात्यानं कोणत्याही सुप्रतिष्ठित लेखका-पेक्षां त्यांचं वाचन जास्त होतं.

या वाङ्मय मंडळांत वहिनीला ओढण्याचा मी प्रयत्न केला. पण त्यांत दुसरी कुणीच स्त्री सभासद नसल्यामुळं तिनं सभासद होण्याचं नाकारलं आणि त्यामुळं मंडळाच्या अध्वर्यूंची मोठी निराशा झाली.

या मंडळाच्या बैठकी केव्हां केव्हां आमच्या घरीं भरत. मीच हा योग जमवून आणला होता. सभासदांना देखील तो एक प्रकारें मानाचा वाटत होता. यावेळीं आमच्या उपाहाराची वगैरे व्यवस्था वहिनी करीत असे खरी पण आमच्या बैठकींत ती केव्हांच भाग घेत नसे. मी बारकाईनं अंदाज घेतला, त्यावेळीं मला असं दिसून आलं, कीं इच्छा असूनसुद्धां ती आमच्या बैठकींत भाग घ्यायचं बुद्ध्या टाळीत होती. ती म्हणे, " तुमच्या त्या चर्चा चालल्या असल्या कीं मी ऐकत असतें. त्यांतलीं कांहीं माणसं खरोखर जशीं मोठी सहृदय आहेत तशींच विलक्षण आहेत. त्या चर्चेत तोंड घालावं असं मला केव्हां केव्हां वाटतं—" असं म्हणून ती थांबली आणि क्षणभर विचार करून म्हणाली, " पण मीं म्हटलं आपण आपल्या पायरीनं रहावं. किती झालं तरी मी बायको माणूस. त्यांतून अलिकडे तुमच्या चर्चाचं पाऊल जरा लांब पडूं लागलं आहे. वाङ्मय सोडून तुम्ही राजकारणांत घुसूं लागलां आहांत—"

" हं हं वहिनी—" मी मधेंच म्हटलं, " तूं चुकते आहेस. वाङ्मय आणि राज-कारण यांचं फारकत करायचे दिवस आतां राहिले नाहींत—"

" म्हणूनच मी तुमच्या चर्चेत तोंड घालीत नाहीं. " वहिनी गंभीर होऊन म्हणाली, " राजकारणांत मला कांहीं कळत नाहीं—"

" हें अगदीं खोटं बोलते आहेस वहिनी ! " मी हंसून म्हणालों, "तीं कात्रणं गोळा केलीं आहेस तीं मीं पाहिलीं नाहींत असं का तुला वाटलं ? "

" कुठं पाहिलींत ? " वहिनी दचकून म्हणाली.

" परवां तुझं तें कात्रणाचं पुस्तक दादा चाळीत होता—" मी चट्कन बोलून गेलों.

" अस्सं ! तरीच ! " वहिनी आपल्याशींच पुटपुटली. माझ्या डोक्यांत आत्तां प्रकाश पडला.

एक क्षणभर वहिनी विचार करीत होती. कांहीं तरी कल्पना मनांत येऊन ती अगदीं हलक्या आवाजांत मला म्हणाली, " माझ्यावर एक उपकार कराल भावजी, केव्हां विचारलं तुम्हांला, तर तें कात्रणाचं पुस्तक आपलं आहे म्हणून सांगाल ? "

" हो सांगेन. त्याला एक अट आहे. तें पुस्तक माझ्या ताब्यांत हवं. तुम्हांला हवं असेल, कात्रणं चिकटवायचीं असतील, तेव्हां सुद्धां तुम्हीं तें माझ्याकडून मागून घेतलं पाहिजे. "

" कबूल ! " असं म्हणतांना तिनं एक मोठा सुस्कारा सोडला.

खरोखरच मला तिची कींव आली. अजूनपर्यंत ही कल्पना मला आली नव्हती. एकदा मला वाटलं, पूर्वी ज्या गावीं होतों तिथंच आम्हीं सुखी होतों. तिथं लायब्ऱ्या नव्हत्या, पुस्तकं नव्हती, वर्तमानपत्रं नव्हतीं आणि त्यांतील कात्रणंही नव्हतीं. होतं काय तें असमाधान. आतां समाधान मिळायला सुरवात झाली होती. त्या समाधानाबरोबरच अस्वस्थतेचा उगम झाला होता—चोराचोरी सुरू झाली होती. परिस्थितीच्या अवलोकनानं उत्पन्न झालेल्या असमाधानी वृत्तीमुळं उत्पन्न झालेलं तें समाधान होतं. तें समाधान सुखाचं नव्हतं. तें समाधान म्हणजेच दुःखाचं मूळ, असं आतां मला वाटूं लागलं. या समाधानापायीं सुखाच्या संसारावर बिब्बा पडेल कीं काय अशी ही शंका क्षणभर माझ्या मनांत आली. ' कसला विचार करतां आहां भावजी ? ' असं वहिनीनं विचारलं तेव्हां मी चट्कन भानावर आलों खरा, पण काय उत्तर द्यावं हें न सुचल्यामुळं वेड्यासारखा नुसता तिच्या तोंडाकडे पहात राहिलों.

माझी ती केविलवाणी स्थिति पाहून वहिनी हंसली आणि म्हणाली, " पुरुषांची जात

इतकी मित्री असते हें अजून मला माहीत नव्हतं. ते एक सरकारी नोकर आहेत— तुम्हीं नाहीं ना तसे ? मग असे घाबरलांत कां ?"

अर्थातच मी घाबरलों नव्हतों. मीं म्हटलं, "स्वतःला निर्भय ठरविण्यासाठीं मला मित्रा ठरवतेयस होय वहिनी ? मग त्या कात्रणाच्या बुकाची मालकी माझ्यावर कां लादलीस ?—रागावूं नको हं—"

"छे, छे मुळींच नाहीं ! " वहिनी शांतपणें म्हणाल्यी. तुमचा प्रश्न अगदीं बरोबर आहे. तुम्हांला तसं वाटायचंच. स्त्री या नात्यानं मी निर्भय आहें. पण त्या निर्भयतेला पत्नी या नात्यानं ज्या मर्यादा उत्पन्न होतात त्या तुम्हांला कळायच्या नाहींत. तुम्हीं पुरुष त्या मर्यादा घालतां खरे पण त्यांची व्याप्ती आम्हांला कशी जाणवते याची तुम्हांला कल्पना नसते—" अगदीं खवचटपणानं हंसून ती पुढं म्हणाली, "नवराबायकोच्या पडद्याआडच्या व्यवहारांतल्या गुंतागुंती तुम्हां अविवाहित पुरुषांना कळत नाहींत. आणि हे तुम्ही लोक कथालेखक बनतां ! नी मग लिहितां कांहींतरी कल्पनेचा बेफाट फापटपसारा ! तें वाचून आम्हीं लग्न झालेल्या बायका गालांतल्या गालांत हसतों आणि स्वस्थ बसतों. जाऊं द्या, कशाला हव्यात त्या गोष्टी ? तेवढं वचन ध्यानांत ठेवा हं ! " असं म्हणून एकदम ती तिथून निघून गेली.

या गांवीं आल्यापासून दादाच्या कामाचा पसारा वाढला होता. 'चळवळ्या गांव' म्हणून या गांवाची प्रख्याती होती. इथं वाङ्मयविषयक चळवळी चालू होत्या हें मीं पूर्वीं सांगितलंच आहे. शिवाय कॉंग्रेस, हिंदुसभा वगैरे सार्वजनिक संस्थांबरोबरच म्युनिसिपॅलिटी आणि सरकारी चळवळीसाठींही कांहीं ना कांहीं सभा सारख्या चालू असत. मुख्यत्वेंकरून हेंच काम दादाच्या वांट्याला आलं होतं. आणि तसलं काम करण्याची दादाला हौस होती.

मला वाईट वाटलं तें एकाच गोष्टीचं—घरीं रिकामटेकडा असल्यामुळं मी या साऱ्या सभांना बहुधा हजर रहात असें. त्याचा फायदा घ्यायचा डाव दादानं टाकला. एके दिवशीं तो म्हणाला, "असं पहा बाळू, या इथल्या सभांना तूं जातोस—लक्ष-पूर्वक ऐकतोस हें पाह्यलंय मी. त्यांत कांहीं वाईट नाहीं—त्या सभांना तूं जाऊं नकोस असं कांहीं मी म्हणत नाहीं—पण जातोच आहेस तेव्हां त्याचा थोडा फायदा मला दे. या सभांच्या हकिकतींचीं टाचणं घेऊन ठेवलींस तर त्याचा मलासुद्धां उपयोग होईल. शिवाय तूं कुठल्या तरी वर्तमानपत्राकडे संधान बांधलंस, हे रिपोर्ट पाठवलेस,

तर तुलासुद्धां चार पैसे मिळतील. केवळ माझ्यासाठींच रिपोर्ट घेतलेस असं तुलाही वाटायचं नाहीं. कसं ?"

नुसता हुंकार देऊन मी उगीच राहिलों. वहिनी त्यावेळीं हजर होती. तिनं सारं कांहीं ऐकलं होतं. दादा निघून गेल्यावर ती म्हणाली, "मग कसं काय भावजी ? केव्हांपासून सुरू करणार हें रिपोर्टरचं काम ? खाल्लेल्या अन्नाला जागतां येईल अन् विडीपानसुपारीपुरते चार पैसेही मिळवतां येतील ! नाहीं ?"

वहिनीच्या बोलण्यांतली खोंच माझ्या ध्यानीं आली. दादाचा तो प्रस्ताव तिला जागवला होता म्हणूनच ती असं बोलली, याचा मला अंदाज होता. तरीही तिच्या मनाचा ठाव घेण्यासाठीं मी म्हटलं, "इतके दिवस मी सभांना जातों पण वर्तमानपत्रांना बातमी पाठवायची कल्पना कांहीं माझ्या डोक्यांत आली नव्हती. हें एक बरं होईल. इथं एवढ्या सभा होतात, त्यांच्या बातम्या कुठंच जात नाहींत, त्याही जातील, अन् तुम्ही म्हणतां तसं खाल्ल्या अन्नाला जागल्यासारखंही होईल ! नाहीं ?"

"छान !" वहिनी म्हणाली, "अन् असं समजा, यांतल्या एकाद्या सभेंत मी बोललें—आचरटासारखं कांहीं बोललें—तर त्याचा रिपोर्ट देणार आहांत का तुम्हीं ?"

"रिपोर्ट द्यायचं काम माझं. तो आचरटपणाचा आहे कीं शहाणपणाचा आहे हें पाहायचं काम संपादकाचं —"

"आणि यांच्याकडचा रिपोर्ट ?"

"तेंही तसंच. रिपोर्ट द्यायचं माझं काम मी प्रामाणिकपणें करीन. मग त्याचा उपयोग करून घेणारानं आपापल्या नजरेप्रमाणें अन् बुद्धीप्रमाणें तो पाहून घ्यावा. त्याच्याशीं मला कांहीं कर्तव्य नाही !"

"अस्सं !" वहिनी म्हणाली, "एकूण तुम्हीं आतां रिपोर्टर बनणार !"

"कांहीतरी बनलंच पाहिजे ना मला ?" मी जरा खवचटपणें म्हटलं, "नुसतं घरीं बसून आयतोबासारखं अन्न खातोंय् त्याची या पूर्वीच मला शरम वाटायला हवी होती. अजून वाटली नव्हती याचं कारण दादाचा चांगुलपणा ! कधीं कुठलं काम दादानं मला केव्हां सांगितलं नाहीं, आतां सांगितलं—मी तें केलं नाहीं तर तो कृतघ्नपणा नाहीं का होणार ? शिवाय मी हें काम करणार आहें तो वर्तमानपत्राचा खास बातमीदार म्हणून—नाहीं का ? ही दुसरी बाजू कांहीं डांगोरा पिटून जगाला सांगायला नको."

वहिनी क्षणभर स्तब्ध राहिली. चीड आल्याचं लक्षण तिच्या चेहऱ्यावर दिसत होतं. पण मला उत्तर देतांना तें न दिसूं देण्याची तिनं खबरदारी घेतली. ती म्हणाली, " रिकामपणीं बसणं कठीण वाटत असेल तर जा कीं मुंबईला. तिथं पहा कसली तरी कारकुनाची नोकरी. मॅट्रिक झालां आहांत तुम्ही, पोटापुरतं मिळायला कांही कठीण जायचं नाहीं ! "

" म्हणजे ? माझं हें आवडतं काम टाकून दुसरा कसला तरी सक्तीचा बोजा मी माथीं घ्यावा, असं का तुझं म्हणणं आहे वहिनी ? कीं माझी अडगळ इथनं दूर करावी म्हणून असं म्हणतेयस ? "

कांहींतरी झणझणीत उत्तर द्यावं असं तिला वाटत असल्याचं तिच्या मुद्रेवरून दिसत होतं—म्हणूनच मला वाटतं ती पुन्हां कांहीं वेळ थांबली आणि आत्मसंयमन करून म्हणाली, " किती कठोर बोलतां आहांत भावजी ! तुम्ही मुंबईला जावं असं यापूर्वी कधीं मीं म्हटलं होतं का ? आतां म्हटलं—तें कां म्हटलं हें न कळण्याइतके तुम्ही निर्बुद्ध नाहीं, असं मला वाटलं होतं—"

" मग आतां नाहीं का वाटत तसं ? " मी तितक्याच गंभीरपणानं म्हटलं, " दादाच्या हुकूमानं माझ्यांत पालट झाला असं का तुला वाटलं ? "

" मग होकार कसा दिलात ? "

" होकार कुठं दिला आहे ? मी अजून विचार करतो आहें ! "

" हो ना ? तर मग अजून विचार करा—चांगला मनाशीं छानून विचार करा अन् मग काय तें उत्तर द्या. "

" म्हणजे तुला हें पटत नाहीं तर ! "

" असं मी कुठं म्हटलं ? अविचारानं वचन देऊन गुंतून पडूं नका, एवढंच माझं म्हणणं. एकदां वचन दिलं कीं मग तें तुम्हांला पाळावं लागेल. अन् मग कदाचित् पश्चात्तापाची पाळी यायची. त्यांच्या स्वभावाचा मला ठाव लागत नाहीं खरा—जबाबदारीची नोकरी पत्करली कीं माणूस लग्नाच्या बायकोशींसुद्धां प्रतारणा करतो—त्यांत कांहीं दोष नाहीं म्हणा !—पण तुमच्या स्वभावाचा मला चांगला अंदाज आहे—" मी हंसलों असं पाहून ती म्हणाली, " हसूं नका. मी खरोखरच सांगतें, खुद्द तुम्हांला नसेल इतका तुमच्या स्वभावाचा अंदाज मला आहे. एवढ्यासाठींच मी तुम्हांला धोक्याची सूचना देतें आहें. "

" थँक्यू वहिनी ! " असं म्हणून मी उगीच राहिलों.

यानंतर एकदोन आठवडे होऊन गेले. त्या मुदतींत गांवांत एकदोन सभाही झाल्या. त्या सभांचा रिपोर्ट मीं कांहीं दादाकडे दिला नाहीं. तरीही त्यानं त्या बाबतींत मला विचारलं नाहीं. असेच आणखीही एकदोन आठवडे गेले.

मग मात्र दादानं विचारलं. तो म्हणाला, " काय रे बाळू, मी सांगितलं होतं तें विसरलास वाटतं ? "

" काय तें ? " मीं अजाणतेपणाचा आव आणून म्हटलं, " हं हं, तें रिपोर्टासंबंधीं होय? मी लिहलंय् त्या मुंबईच्या दैनिकाला. तिकडलं उत्तर आल्याशिवाय म्हटलं रिपोर्ट घेऊं नये. उगीच कुणी संशय घ्यायचा. वर्तमानपत्राचं अधिकारपत्र हातीं असलं मग उजळ माथ्यानं रिपोर्ट घ्यायला कांहीं हरकत नाहीं. "

" तसा माझा कांहीं आग्रह नाहीं बरं!" दादा हंसून म्हणाला, " रिकामं बसण्यापेक्षां एक कामगिरी तुला मीं सुचवली एवढंच. वाटलं तर कर नाहींतर सोडून दे. माझा तसा कांहीं आग्रह नाहीं ! "

हें भाषण झालं त्यावेळींही वहिनी तिथं हजर होती. ती हजर होती म्हणूनच दादा तसं बोलला, अशी शंका मला क्षणभर आली. पण दादा निघून गेल्यावर वहिनी म्हणाली, " ऐकलंत ना भावजी ? ही सक्ति नाहीं. वाटलं तर करा, नाहीं तर करूं नका. हंः ! असं असतं हें ! बायकोपाशीं नवरा कसा वागतो हें लग्न न झालेल्या माणसाला कळत नाहीं. लग्न न झालेल्या पुरुषांना आणि बायकांना सारखंच कळत नाहीं—त्यामुळं लेखक लोक कल्पनेच्या जोरावर नवराबायकोचे जे प्रेमप्रसंग लिहितात ते वाचून माझ्यासारखीला हसूं येतं. पण आतां हें भाषण ऐकलं, आश्चर्य वाटलं मला! बेकार भावाशीं बोलायचीही माणसाची भाषा तशीच कशी ? " असं म्हणून झट्‌कन् ती तिथून गेली.

मला प्रश्न पडला—दादानं वहिनीलासुद्धां अशीच कांहीं कामगिरी सांगितली होती का ? कीं आणखी कांहीं दुसरं अशाच स्वरूपाचं काम सांगितलं होतं ? वहिनीला मी तसं विचारणार होतों पण माझ्या प्रश्नाचं उत्तर द्यायची इच्छा नसल्यामुळंच ती अशी निघून गेली, अशी कल्पना करून मीं त्यानंतर तिला तो प्रश्न केला नाहीं.

आमच्या या मर्यादित कुटुंबांत आतां एका नव्या व्यक्तीची भर पडली होती. उन्हाळ्याच्या सुट्टीचे दिवस असल्यामुळं कॉलेजांत असलेली वहिनीची एक बहीण हवापालट करण्यासाठीं आमच्याकडे राहायला आली होती.

ही नवी व्यक्ति आल्यापासून वहिनी माझ्यापासून दुरावत चालली होती. म्हणजे ती सदोदित तिच्याच सभोंवार घोटाळत राहिली होती असं नव्हे—ती इथं आल्यापासून उलट माझाच संकोच वाढत चालला होता.

दादा आपल्या कामावर गेल्यावर मी आणि वहिनी अशीं दोनच माणसं घरांत शिल्लक राहात होतों. म्हातारी आत्त्या असून नसल्यासारखी होती. जिवाभावाच्या आणि सुखदुःखाच्या गोष्टीप्रमाणेंच जगाच्या उलाढालीच्या गोष्टी बोलायला वहिनीला मीच काय तो आधार होतों. आतां ही उषा आल्यामुळं गप्पा मारण्यासाठीं वहिनीला ती गुंतवून ठेवीत असे.

ती मोठी गोष्टीवेल्हाळ होती—मोठी बहुश्रुत होती. स्वतःला ती कम्युनिस्ट म्हणवित असे. वहिनीच्या बापाची गृहस्थिति चांगली संपन्न असल्यामुळं उषा एकंदरींत मोठ्या थाटांत रहात असे. वहिनीची वृत्ति तशी नव्हती म्हणूनच उषेचा तो थाट मला जाणवत असे. दिवसांतून तीन वेळां ती आपलीं पातळं बदली. तिच्या ट्रंकांची झडती घेतली असती तर शंभर कुटुंबांना पुरतील इतकीं ब्लाउझेस इथल्या इथंच मिळालीं असतीं.

तसं पाहिलं, तर मी तिच्या खिजगणतींत नव्हतों. घरांतल्या मोलकरणीशीं ती बोले—पण माझ्याशीं बोलायचं ती बुद्ध्या टाळी. स्त्रीसुलभ संकोचामुळं ती असं करते असं पहिल्यानं मला वाटलं. पण दादाबरोबर बोलतांना तिला एवढासुद्धां संकोच वाटत नाहीं असं जेव्हां मला दिसून आलं, तेव्हां माझं ते मत बदललं.

वहिनीला ती बोलण्यांत सदा गुंतवून ठेवीत असे. माझ्याशीं बोलायला मुळीं संधीच देत नसे. फारा दिवसांनीं भेटलेली बहीण—लाडकी बहीण—म्हणून वहिनीही तिचं कोडकौतुक करी. त्या कोडकौतुकाचा पाढा वाचण्यासाठीं वहिनी माझ्याकडे आल्याचं मात्र उषेला पटत नसे. उषेला माझा मत्सर वाटत होता कीं काय, अशीही शंका क्षणभर माझ्या मनात आली. तसं होणं स्वाभाविक होतं. जिव्हाळ्याच्या माणसाला टाकून परक्या माणसाबद्दल आपुलकी दाखवलेली कुणाकुणाला खपत नसते हें मी पाहिलं होतं. तसंच हें असेल असं मी धरून चालत होतों—पण एके दिवशीं माझे डोळे उघडले.

वर्तमानपत्रांत आलेल्या एका पुस्तकाच्या परीक्षणाबद्दल वहिनी माझ्याशीं बोलत होती—खूपखूप चर्चा करीत होती—मी नुसता ऐकत होतों. परीक्षणलेखकानं मूळ

लेखकाच्या बाबतींत अन्याय केला आहे, किंबहुना मूळ लेखकाची विचारसरणी परोक्षण-लेखकाला कळलीच नाहीं असं वहिनीला वाटत होतं, म्हणूनच ती एवढं बोलत होती.

पूर्वी ती अशी बोलली असती तर आमचं तें भाषण प्रश्नोत्तरांत झालं असतं. पण उषा आल्यापासून मला जो एक संकोच उत्पन्न झाला होता त्याला अनुसरून, देवळां-तल्या पुराणाला जाणारी श्रद्धाळू विधवा जितक्या निर्बुद्ध भाविकपणानं पुराण ऐकत असते तसल्याच वृत्तीनं, मी हें भाषण ऐकतों आहें असं पाहून उषा म्हणाली, " कशाला एवढे शब्द खर्ची घालते आहेस सुलताई ?—" वहिनीचं माहेरचं नांव सुलेखा होतं. सासरीं आल्यावर आमच्या आजींची जागा भरून काढण्यासाठीं तिचं नांव सुभद्रा ठेव-ण्यांत आलं होतं. पण त्या नावानं तिला कुणीच संबोधित नसे. ' सुलेखा हेगडे ' या नांवानंच तिला सर्वजण ओळखीत असत.

" मानसशास्त्रावरच्या पुस्तकांत तुझ्या या मॅट्रिक भावजींना काय कळणार आहे ? " असं उषा म्हणाली तेव्हां मी हंसलों असं पाहून ती म्हणाली, " हंसूं नका बाळाभाऊ, हा तुमचा विषय नव्हे. "

" होय, खरं आहे. " मी अगदीं नम्रतेनं म्हणालों, " हा विषय कांहीं आमच्या अभ्यासक्रमांत नव्हता. पण वहिनीच्या सहवासानं अलिकडे अलिकडे मला बऱ्याच नव्या नव्या विषयांचा परिचय होऊं लागला आहे. तसं कांहीं कळत नाहीं त्यांत— पण कळून घ्यायचा प्रयत्न करीत असतों मी. "

आजीबाईचा आव आणून उषा म्हणाली, " आपल्याला ज्यांत कांहीं कळत नाहीं त्यांत माणसान कशाला तोंड घालावं ? प्रयत्न केल्याशिवाय कोणताही विषय कसा कुणाला कळेल ? "

मी म्हटलं, " हा माझा नुसता प्रयत्न आहे. असल्या जड विषयांचा मी दर्दी आहें असं केव्हांच मीं म्हटलं नाहीं. "

"तें तुम्हांला कळायचं नाहीं !" उषा म्हणाली, "तुम्हीं तीं तुमचीं नाटकं-कादंबऱ्या वाचा."

उषेचं हें भाषण वहिनीला आवडलं नसावं. ती म्हणाली, " हें काय उषे ? कुणालाही उपदेश करायचा अधिकार अजून तुला आलेला नाहीं. सध्यां तूं आपल्यापुरतं पहा. "

" तुझं चुकतं तें हेंच ताई. असल्या विषयाची चर्चा करायला तुझ्या नवऱ्यासारखा

विद्वान जवळ असतांना तूं या बाळाभाऊंबरोबर बोलत कशी बसतेस याचंच मला नवल वाटतं ! ”

तो अप्रिय चर्चा टाळण्यासाठीं कांहींतरी निमित्त करून वहिनी तिथून उठून निघून गेली. मीही जाणार होतों; पण तितक्यांत उषा म्हणाली, “ आमच्या ताईचं मला आवडत नाहीं तें हेंच. कोणतीही गोष्ट तिला पटली नाहीं, कीं ती अशीच विषय अर्ध्यावर टाकून निघून जाते. हें भेकडपणाचं लक्षण आहे. असला भेकडपणा मला मुळींच आवडत नाहीं. जें काय बोलायचं तें अगदीं निर्भिडपणानं बोलावं. कुणाचीसुद्धां पर्वा करूं नये. आतां हेंच पहा, तुमचे दादा पोलीस ऑफीसर आहेत पण मी त्यांच्यासमोर अगदीं उघड उघड कॉम्युनिझमची चर्चा करतें. ते अगदीं मुकाट्यानं ऐकत असतात–”

“ हो– ” मीं म्हटलं, “ मी सुद्धां ऐकत असतों–तितक्याच मुकाट्यानं ऐकत असतों. नाहीं का ? ”

अगदीं तुच्छतेनें हंसून उषा म्हणाली, “ मुकाट्यानं ऐकणं म्हणजे कांहीं तो विषय कळणं नव्हे. आतांसुद्धां ताई बोलत होती त्यावेळीं तुम्ही मुकाट्यानंच ऐकत होतां. पण विषय कळतो म्हणून ऐकणं अन् हें तुमचं ऐकणं यांत फरक आहे. ”

“ खरोखरच फरक आहे. ” मीं शांतपणें म्हटलं, “ विषय कळतो म्हणून दादा मुकाट्यानं ऐकतात, विषय कळायला हवा म्हणून मी मुकाट्यानं ऐकतों. यांत बिघडलं कुठं ? ”

“ नव्हेच–नव्हेच तें ! ” उषा तिरसटून म्हणाली, “ कळणं म्हणजे काय हेंच तुम्हांला कळत नाहीं. तुमच्याशीं बोलणं म्हणजे शब्दाचा अपव्यय होय ! ” असं म्हणून शेजारचं पुस्तक उघडून ती वाचूं लागली.

माझी नालायकी कशी सिद्ध होत होती हें शेवटपर्यंत कांहीं मला कळलं नाहीं. तिनं भाषण संपवलं होतं. एक प्रकारें मला निघून जाण्याची सूचना केली होती, तरीही मी गेलों नाहीं. तिच्या जवळच पडलेलं एक पुस्तक मीं उघडलं तेव्हां एकदम हातातलं पुस्तक दूर करून ती वस्कन म्हणाली, “ त्या पुस्तकांत कांहीं कळायचं नाहीं तुम्हांला. तो तुमचा विषय नव्हे. ठेवा तें पुस्तक तिथं ! ”

मीं मुकाट्यानं पुस्तक जागच्याजागीं ठेवलं आणि ती आपलं पुस्तक वाचूं लागली.

कितीतरी वेळ मी तिथं तसाच बसून राहिलों होतों. बराच वेळ गेल्यावर हातांतलं

पुस्तक बाजूला करून ती म्हणाली, " असं पहा बाळाभाऊ, मला हें आवडत नाहीं. कॉलेजांतलीं पोरंसुद्धां अशींच माझ्याभोंवतीं घोटाळत असतात—"

" अशींच म्हणजे कशीं ? " मीं बावळटपणाचा आव आणून विचारलं.

" अशींच म्हणजे—" उषा तसाच आजीबाईचा आव आणून म्हणाली, " कीं हीं तुमच्यासारखीं. कांहीं ध्येय नसलेलीं माणसं मला आवडत नाहींत. माणसाला कांहीं आयडिऑलॉजी पाहिजे—कांहीं धोरण पाहिजे—कांहीं तात्विक दृष्टि पाहिजे. तुमच्याकडे यांतलं कांहींसुद्धां नाहीं. भावाच्या जिवावर रिकामपणीं तुकडे मोडित घरीं बसून राहिलेले तुम्ही.—तुम्हांला असल्या जीवनाची शरम वाटली पाहिजे. पुरे झालं. यापुढं असला लघळपणा कराल—"

" कसला लघळपणा केला मी ? " तितक्याच शांतपणानं मीं विचारलं.

" मला जास्त बोलायला लावूं नका ! " पुस्तक समोर धरून ती म्हणाली, " अन यापुढं केव्हांही माझ्या बाजूला येत जाऊं नका. "

" हें घर माझं आहे–" मीं म्हटलं.

" नाहीं ! " ती म्हणाली, " तुम्ही या घरचे एक आश्रित आहां–मालक नव्हे. तुम्हांला कळत नसलं तरी मला त्याची पूर्ण जाणीव आहे. "

" क्षमा कर उषे, माझी चूक झाली. " असं म्हणून मी जायला निघालों तेव्हां ती म्हणाली, " उषेबिषे असं कांहीं म्हणायचं नाहीं मला ! तुम्हीं कांहीं माझ्या पाळण्याची दोरी हलवलेली नाहीं. "

" क्षमा करा उषामावशी ! " असं म्हणून मी तडक तिथून बाहेर निघालों. हातांतलं पुस्तक तिनं थाड्कन् टेबलावर आपटल्याचं मला ऐकूं आलं. आणखी एक क्षणभर जास्त मी तिथं राहिलों असतों तर तिनं कदाचित् मला मारलंसुद्धां असतं.

दोघी सख्या बहिणी पण दोघींत केवढा हा फरक ! दोघींही उच्चशिक्षाविभूषित होत्या. वहिनीप्रमाणंच विश्वविद्यालयाच्या परीक्षांतून उषेनं नांव गांजवल होतं. पुढल्याच वर्षी ती बी. ए. होणार होती. शिक्षणक्रमाच्या बाहेरच्या वाचनाच्या हिशेबानं पाहिलं तर वहिनीसुद्धां कांहीं कमी बहुश्रुत नव्हती. कोणतंही नवं तत्वज्ञान तिला पारखं नव्हतं. अर्थशास्त्र या विषयांत तर तिनं बक्षीस मिळवलं होतं. ती ज्या घरांत पडली होती त्या घरांत या विषयांची कांहीं कदर नव्हती. परीक्षेंत नांव गाजवून बक्षिसं स्कॉलरशिपा मिळविण्यापलिकडे दादानं कांहींच केलं नव्हतं. वाचनाची त्याला आवड नव्हती.

पत्करलेल्या नोकरीपलिकडे त्याला कांहीं दिसत नव्हतं. ती नोकरीसुद्धां इतकी एक-मार्गी होती, कीं तिच्यापायीं फारसं वाचन करण्याचीही आवश्यकता नव्हती. तो कदाचित् प्रोफेसर झाला असता तर ' प्रोफेसरची नोकरी ' करण्यासाठीं त्यानं इतर वाचन कदाचित् केलं असतं—पण तें नोकरीसाठीं म्हणून. नोकरी हें त्याचं ध्येयं होत. त्या ध्येयाला जरूर नसेल अशी गोष्ट करण्यांत बुद्धि खर्च घालायची त्याची वृत्ति नव्हती.

असं होतं तरीही उषेनं त्याची तारीफ करावी आणि माझी हेटाळणी करावी, याचं मला आश्चर्य वाटलं. मी घरीं रिकामा बसल्याची खरी आंच जर कुणाला लागायची तर ती वहिनीला—पण तिनं कधींच तशी तक्रार केली नव्हती— उलट मला तिचा पाठिंबाच होता. आणि आतां ही पाहुणी म्हणून आलेली तिची बहिण माझा रिकाम-टेकडेपणा माझ्या दातांवर मारते आहे ! कोणत्या अधिकारानं ? कुणाच्या जिवावर ? कीं कुणाच्या चिथावणीनं ? एक क्षणभरच मला संशय आला, दादानंच तर तिला चिथावलं नसेल ? इतके दिवस झाले तरी त्यानं सांगितलेलं काम करायला मी सुरवात केली नव्हती. म्हणूनच, अशा आडवळणानं, त्यानं या पोरीकडून माझा असा पाण-उतारा करवला का ?

दादा घरीं असे तेव्हां तासचेतास उषा त्याच्याबरोबर गप्पा मारीत बसत असे. अशा वेळीं त्यांचं काय भाषण चाले तें ऐकायला वहिनीसुद्धां क्वचितच तिथं हजर असे. अशा वेळीं त्यानं काढलेल्या उद्गारांचा फायदा घेऊन—कदाचित् कळून अगर कदाचित् न कळून—तिनं आज माझी अशी ही हेटाळणी केली, असंच मला वाटूं लागलं.

समाधानाच्या संसारांत सुख असतं, तसंच अव्यवस्थितपणाच्या संसारांतही एक प्रकारचं सुख असतं. तसलंच सुख आम्हीं अनुभवीत होतों. घरांत असलेल्या माणसां-पैकीं कोण कसं वागतं याची त्या प्रत्येकाला मुळींच कदर नव्हती. ही मुलगी घरीं आल्यापासून आतां ती परिस्थिति बदलूं लागली होती. प्रत्येक बाबतींत ती फाजील मन घालीत असे. प्रत्येक बाबीची चिकित्सा करीत असे. आज इतकीं वर्षं आमचा भार वाहणाऱ्या आत्त्याबाई, वहिनीनंसुद्धां कधीं त्यांना नांव ठेवलं नव्हतं, पण उषा आतां आत्त्याबाईच्या कामांतसुद्धां नजर घालून तिचे दोष दादाला दाखवून देऊं लागली होती.

या परिस्थितीमुळं मी फार अस्वस्थ झालों होतों. वहिनीच्या मनावरदेखील कांहीं-तरी परिणाम झाला असावा असं मला वाटे. ती प्रत्यक्ष बोलून दाखवीत नसे. उषा

कुणाला कांहीं बोलूं लागली तर तिला नुसतं दटावितसुद्धां नसे. पण त्यावेळची तिची मुद्रा पाहिली कीं मला वाटे, कीं तो प्रकार कांहीं तिला आवडत नव्हता.

शेवटीं दादानं मला पुन्हां विचारलंच. गावांत हल्ली सभांना बराच ऊत आला होता. एकाच वेळीं दोन दोन सभा होत असल्यामुळं दोहींकडे जाणं दादाला शक्य नव्हतं. म्हणूनच त्यानं मला घाई केली.

खरं सांगायचं म्हणजे मीं कुठल्याच दैनिकाला पत्र लिहिलं नव्हतं. दादाला मी तसं सांगितलं नाहीं. कदाचित् त्याला संशय आला असावा. तो मला म्हणाला, "पुन्हां एकदां माझ्यासमोर पत्र लिही आणि माझ्याकडे दे. मी स्वतः तें पोष्टांत टाकतों. त्या पत्राचा कुणीच बातमीदार या गांवीं नाहीं, असं असतांना तुझी ऑफर तो नाकारील असं मला वाटत नाहीं. आजच्या परिस्थितींत तरी त्या लोकांना सर्व ठिकाणच्या बातम्या हव्या आहेत."

माझा नाइलाज झाला. पत्र लिहून मी दादाजवळ दिलं. पूर्वी पाठवलेल्या–म्हणजे न पाठवलेल्या–पत्रांचा मी त्यांत उल्लेख केला होता. त्याचं काय उत्तर येणार याची कल्पना मला होती.

शेवटीं उत्तर तसंच आलं—-तरीही त्यांनीं माझी मागणी कबूल केली होती. माझ्या बातमीपत्राबद्दल मोबदला द्यायचा उल्लेख त्यांत होता. महिन्यांतून चार बातमीपत्रं मीं पाठवलीं तर निदान माझं जेवण सुटण्याइतके पैसे मला मिळाले असते. माझ्या प्रस्तुतच्या परिस्थितींत ही कमाई कांही थोडी नव्हती. चार दोन आण्यांसाठीं दादापुढं हात पसरायचा प्रसंग आतां टळेल असं पाहून मला आनंद झाला खरा, पण दुसरी भीति पुढं उभी राहिली. आतां दादाच्या प्रस्तावाचं काय करायचं ?

ती बातमी ऐकून उषा म्हणालीं, "हीं असलीं अशिक्षित माणसं संपादकाच्या क्षेत्रांत वावरत आहेत म्हणूनच आमच्या मराठी जॅर्नलिझमचा विचका उडतो आहे. तरीपण एक बरं झालं. पोटापुरतं मिळवायचं भाग्य तरी बाळाभाऊला लाभलं !"

तिचं तें भाषण ऐकून मी कुत्सितपणानं नुसता हंसलों. वहिनी मात्र एक शब्दसुद्धां बोलली नाहीं.





आतां हा पेंच कसा सुटणार याची मला काळजी लागून राहिली. उषा बाहेर गेली होती अशी संधी साधून मी वहिनीपुढं हा प्रश्न ठेवला. ती म्हणाली, " तुम्ही आपण होऊन स्वतःला संकटांत पाडून घेतलं आहे. आतां यांतून बाहेर पडणं कठीण आहे. एक पत्करलेलं काम बजावलं तरी पाहिजे नाहींतर—" ती क्षणभर थांबली, हंसली आणि अर्थपूर्ण डोळे मिचकावून म्हणाली, "—तुमचा मार्ग तुम्हींच पाहिला पाहिजे. एवढं खरं, कीं आतां तुम्हीं ज्या सभेला जाल त्या सभेचे रिपोर्ट देणं टाळतां यायचं नाहीं."

मी क्षणभर विचारांत पडलों. कांहींतरी उपाय सुचवायचा वहिनीचा विचार होता खरा, पण स्पष्ट शब्दांत ती मला सांगत नव्हती. उषा तिथं हजर नसल्यामुळं तसं सांगणं कांहीं अशक्य नव्हतं. कोणत्याही बाबतींत स्वतःचं निश्चित मत द्यायचं नाहीं असंच तिनं ठरवून टाकलं असावं कीं काय, असं मला वाटलं.

" ठीक आहे, " मी म्हटलं " स्पष्ट सांगायचं नसेल तर सांगूं नकोस. एवढं सूचक सांगितल्यावर माझा मला मार्ग काढतां आला नाहीं तर मीच नालायक ठरेन. एक बरं आहे, कीं उषा या सभांना येत नाहीं ! उषेची रजा केव्हां संपणार आहे ?"

वहिनी हंसून म्हणाली, " मधेंच कां हा प्रश्न आठवला ?"

" नाहीं—तसं विशेष नाहीं— " मी संकोचून म्हटलं, " फार दिवसांनीं घरीं आलेली तुझी बहीण, तिनं निघून जावं असं कांहीं मी म्हणत नाहीं. पण स्पष्ट बोलायचं म्हणजे तिचा स्वभाव मला मुळींच आवडत नाहीं."

" मग बोलूं नका तिच्याशीं ! " वहिनी आणखी थोडं जास्त हंसून म्हणाली, " तिचं तुमचं पटत नाहीं तर कशाला तिच्याशीं बोलायला जातां ?"

" मी कुठं बोलायला जातों ? तीच मुद्दाम बोलणं काढते माझ्याशीं अन् मग तीच चिडते आणि बोलूं नका म्हणते. ही तुझी सख्खीच बहीण ना ?"

माझा तो प्रश्न ऐकून वहिनी मोठमोठ्यानं हंसली. मीही हंसलों. प्रश्नाचं सरळ उत्तर न देतां ती म्हणाली, " एक बरं आहे, कीं त्यांचीं तिचीं मतं जुळताहेत. नाहींतर मलाच त्रास झाला असता. उषा आपल्याला कॉम्युनिस्ट म्हणवते–तरीही तुमचा प्रश्न आला, कीं तिचा आणि त्यांचा मतभेद होत नाहीं याचंच मला आश्चर्य वाटतं. पण आहे तें बरं आहे. असा हा तुमच्यासारखा प्रश्न करायची पाळी त्यांच्यावर येत नाहीं हें काय थोडं झालं ! "

त्या दिवशीं तो विषय तेवढाच राहिला. माझ्या प्रश्नाचं निश्चित उत्तर कांहीं मला मिळालं नाहीं.

दुसऱ्या दिवशीं गावांत दोन सभा होत्या. एक हिंदूमहासभावाल्यांची आणि दुसरी कॉंग्रेसवाल्यांची. कॉंग्रेसवाल्यांची सभा असली कीं हिंदूसभावाले हटकून त्या दिवशीं कुठंतरी आपली दुसरी सभा जाहीर करीत असत. या गांवचा हा शिरस्ताच होता. मी हिंदूसभेला जायचं ठरवलं.

पण दादांचा हुकूम सुटला तो कॉंग्रेसच्या सभेला जायचा. मी मोठ्या पेंचांत पडलों. त्या सभेला त्या दिवशीं एक बाहेरचे वक्ते हजर रहाणार होते. जहाल भाषण करण्याबद्दल त्यांची फार प्रख्याती होती. पहिल्याच दिवशीं माझी अशी कसोटी लावायचा दादानं टाकलेला डाव पाहून मी सर्द झालों.

वहिनीसुद्धां म्हणाली, " तुमच्या परीक्षेचा आज पहिला पेपर आहे भावजी ! "

मी सभेला गेलों तेव्हां उषाही तिथं हजर असल्यानं पाहून चीत झालों. कॉंग्रेसच्या सभेला उषा ? मला प्रश्न पडला, ती सुद्धां रिपोर्ट घेणार होती कीं काय ? वक्त्याचं भाषण सुरू झालं त्यावेळीं उषा कांहीं लिहिते आहे कीं काय हें मी मधूनमधून नजर टाकून पहात होतों. अगदीं लक्षपूर्वक ती भाषण ऐकत होती.

माझ्या सुदैवानं त्या दिवशीं हे नाणावलेले जहाल वक्ते मुळींच जहाल बोलले नाहींत. अर्थात् तो सविस्तर रिपोर्ट दादाच्या हातीं देतांना मला यत्किंचितही संकोच वाटला नाहीं.

वहिनीनं दादाला विचारलं, " कसा काय आहे भावजींचा रिपोर्ट ? "

" तें मला कसं कळणार ? " दादा म्हणाला, " मी त्या हिंदूसभावाल्यांच्या सभेला गेलों होतों. त्यांचे रिपोर्ट घेणं मोठं सोपं असतं. कुठल्याही सभेचं भाषण घेऊन कुठलाही रिपोर्ट दिला, तरी त्यांच्यांत फारसा फरक नसतो––इतकीं ठराविक सांचाचीं असतात त्यांचीं भाषणं ! गेलों नसतों तरीसुद्धां हा रिपोर्ट मला लिहितां आला असता."

" पाहूं पाहूं तो रिपोर्ट ! " असं म्हणून उषेनं माझ्या रिपोर्टाचा कागद दादाच्या हातून खस्कन ओढून घेतला.

ती तो रिपोर्ट वाचीत असतांना आम्ही तिघंही सारखी तिच्याकडे नजर लावून स्तब्ध राहिलों होतों.

" वा, छान ! " उषा उद्‌गारली, " अगदीं व्हर्बेटिम् रिपोर्ट आहे हा !—" तें ऐकून मलासुद्धां क्षणभर समाधान वाटलं. पण लगेच ती म्हणाली, " असा रिपोर्ट कांहीं मला घेता आला नसता. रिपोर्टरचं काम एकंदरींत निर्बुद्ध माणसाच्या हातीं देणंच बरं. यंत्रासारखा तो लिहून घेऊं शकतो. कांहींच विचार करीत नाहीं. असं मूर्खासारखं बोलत होता तो खादीवाला–अर्थशास्त्र कशाशीं खातात याची या वेडप्याला कल्पनासुद्धा नसावी. अन् बेटा राज्यघटनेच्या गोष्टी बोलत होता. या वेड्यांचं औद्योगीकरण म्हणजे चरखा आणि खादी—तें एकच तुणतुणं हे नेहमीं वाजवीत असतात. यंत्रं अस्तित्वांत आलेलीं असतांना–यंत्रानं होणाऱ्या पैदासीमुळं आंतरराष्ट्रीय व्यापारांत जगाची उलाढाल होत असतांना–खादीची गोधडी डोळ्यावर ओढून बसलेल्या या उंबरातल्या किड्यांची मला कींव येते. वक्तृत्वाची कला उत्तम जाणणारा हा माणूस विषयाच्या निवडीमुळं अगदीं फुकट गेला आहे, असंच मला वाटलं रावसाहेब. "

" तें आम्हांला कांहीं कळत नाहीं. " दादा म्हणाला, " विषयांत डोकं घालायची सवय पार बुजवून टाकल्याखेरीज आमचं काम करतां यायचं नाहीं. बुद्धी असून निर्बुद्ध झालेलीं म्हणा, किंवा तुम्ही म्हणतां तशी मुळचींच निर्बुद्ध म्हणा, डोळे झांकून यंत्रासारखं काम करणारीं माणसंच आम्हांला हवीं आहेत. स्वतःची अक्कल खर्च करणारे रिपोर्टर निदान आम्हांला तरी नको आहेत. तिथं आमचा आपला हा निर्बुद्ध बाळूच बरा ! "

एकूण दादाच्या दृष्टीनंही मी निर्बुद्ध होतों तर ! कीं उषेला खूष करण्यासाठीं तो तसं म्हणत होता ? सुबुद्ध असल्याचा मला केव्हांच अभिमान नव्हता. माझ्या बुद्धीची कसोटी लागायचे प्रसंग अजून यायचे होते. तरीही उषेनं मला निर्बुद्ध म्हणावं आणि दादानं तिच्या निर्णयाला होकार द्यावा, याची क्षणभर मला चीड आल्यावांचून राहिली नाहीं.

" हें पहा भावजी,—" असं वहिनी म्हणाली त्यावेळीं मी दचकलों नि म्हणालों, " आतां तूं तरी मला पैजार मारूं नकोस वहिनी ! "

" निर्बुद्ध माणसाला निर्बुद्ध म्हटलं तर कां वाईट वाटावं हें मला कळत नाहीं ! " उषा उद्गारली, " प्रत्येकाची आपणाबद्दल कांहींतरी कल्पना असते. त्या कल्पनेवर कुणी आघात केला तर त्याला वाईट वाटतं—पण कुणीतरी आणि केव्हांतरी तें त्याला सांगायाला हवं असतं !— "

" असं बोलूं नये उषे, " वहिनी म्हणाली, " रिपोर्टरचं काम करणाऱ्या माणसांत सुद्धां बुद्धिवान माणसं असतात—नव्हे बुद्धिवान माणसांखेरीज रिपोर्टरचं हें काम इतरांच्या हातीं दिलं जात नाहीं. जगाच्या राजकारणाच्या उलाढाली वर्तमानपत्रांच्या संपादकांपेक्षां आजचे हे रिपोर्टरच करताहेत. आणखी असं आहे,—" दादाकडे वळून ती म्हणाली, " माझ्या मनांत एक कल्पना आली होती. उषेसारखी तडफदार मुलगी—भावनेला बळी पडून तितक्याच तडफदार माणसाच्या हातीं गेली तर रोज खटके उडतील त्या संसारांत. प्रत्येक जण आपला वरचष्मा ठेवायला पहायचा ! एका वृत्तीचीं, एका तडफेचीं, एका तोलाचीं दोन माणसं विवाहानं बद्ध झालीं, कीं त्यांचा संसार सुखाचा होत नाहीं. म्हणूनच मी म्हणत होतें, कीं उषा आणि भावजी यांचं जर लग्न झालं—"

" ह्यॅड्‌त् !" उषा मोठमोठ्यानं हंसत उद्गारली, " हा मेणाचा पुतळा घेऊन मी काय करूं ? एवढीशी आंच लागली तर वितळून जायचा. मला लग्नच करायचं नाहीं—त्यांतून करावसं वाटलं तर दुसऱ्याच्या निवडीवर—निदान तुझ्यासारख्या व्यवहारशून्य वहिणी-च्या निवडीवर मी कधींच विसंबून राहायची नाहीं. "

" वेडी आहेस उषे, " वहिनी म्हणाली, " असले निर्बुद्ध नवरेच फार चांगले. अकलेची घमेंड तरी नाहींत मिरवीत बायकोसमोर. जसे ठेवावे तसे मुकाट्यानं राहतात. कधीं तक्रार करीत नाहींत. रोजच्या वापराला अशीं माणसं फार चांगलीं. एवढ्या बाब-तींत तरी माझं ऐक. शोधून असा नवरा सांपडायचा नाहीं तुला."

" तूं केलं असतंस का याच्याशीं लग्न ? " उषा तिरसटून म्हणाली, " असल्या बावळटाची बायको म्हणवून घेण्यांत तुला वाटला असता का अभिमान ?—" वहिनी नुसती हंसली असं पाहून दादाकडे वळून उषा म्हणाली, " आतां तुम्हींच पहा रावसाहेब, आपल्याला चांगलं स्थळ मिळालं म्हणजे बायकांची जात दुसऱ्यांच्या बाब-तींत खोड काढूं लागते—"

" खरं ना हें ? " वहिनीकडे वळून दादा म्हणाला.

" मला विचारलं का हें ? " वहिनी दादाकडे वळून म्हणाली.

" तर दुसऱ्या कोणाला ? " दादानं म्हटलं, " लग्न झालेलं जोडपं एकच आहे ना इथं ? "

" म्हणूनच म्हणत होतें–" वहिनीनं उत्तर दिलं, "–कीं उरलेल्या दोघांचं लग्न लावून दिलं कीं झालं. "

" मला वाटलं होतं–" दादा म्हणाला, "–तूं मोठी धोरणी आहेस ! बाळूबद्दल तुला कांहा वाटत नाहीं—मला वाटतं. पण मी कधीं बोलत नव्हतों. पुढं शिकायची त्याला अनुकूलता होती, नाहीं असं नाहीं, पण तो असा घरीं स्वस्थ बसून राहिला. मी हा असा फिरत्या नोकरीवरचा माणूस–तूं घरीं एकटी–तेव्हां तुला त्याची सोबत होईल म्हणून मीही दुर्लक्ष केलं. आतां तो कांहींतरी कामाला लागेल असं वाटतंय मला !—ही उद्यां बी. ए. होईल—बी. ए. होण्यापेक्षांही तिनं ज्ञानाच्या दृष्टीनं केवढी तरी कमाई केली आहे !—तुलासुद्धां लाजवलंय. अशा या मुलीला का या बाळूच्या गळ्यांत अडकवायची ? थट्टा केली असतीस तर गोष्ट निराळी होती. पण तसंही दिसलं नाहीं. निदान स्वतःकडे तरी पहायचं होतंस ! आपलं हें असं असतांना आपल्या धाकट्या बहिणीसाठीं बाळूचं स्थळ सुचवायला तुला कांहीं वाटलं पाहिजे होतं ! "

" एवढी थट्टासुद्धां समजत नाहीं ! " वहिनी हंसण्याचा प्रयत्न करीत म्हणाली. हृदयाला बाण लागला असतां होणाऱ्या वेदना गिळून माणूस ज्यावेळी हंसण्याचा प्रयत्न करतं, त्यावेळीं त्याची मुद्रा किती केविलवाणी होते हें वहिनीच्या त्या उद्गारांवेळीं दिसून आलं. त्या अप्रिय प्रसंगावर विरंजण घालण्यासाठीं मी खो खो करून मोठमोठ्यानं हंसलों तेव्हां दादानं विचारलं, " काय झालं रे एवढं हंसायला ? "

" तुम्हां लोकांचं मला आश्चर्य वाटतं ! " मी गंभीर होऊन म्हटलं, " विशेषतः या वहिनीचं ! ज्यांचं लग्न ठरवायचं त्यांना आधीं विचारायचं तरी ! उषाताईना विचारलं तर नव्हतंच—पण निदान मला तरी विचारायचं आधीं ! "

" तुला नव्हतं का विचारलं ? " दादा म्हणाला, " मला वाटलं, कीं ही तुझीच कल्पना म्हणून. "

" आतां काय म्हणावं तुला दादा ! " मी मोटमोठ्यानें हंसत हंसत म्हणालों," मला बायको पाहिजे आहे—नवरा नको आहे. वहिनीचं चुकलं तें इथंच—तिला वाटलं

मी उषाताईची बायको होऊन राहीन. कुलुंग्या कुत्र्यासारखा हंसेन, वागडेन, नाचेन, तिची करमणूक करीन, तिची सेवाचाकरी करीन ! हंः ! वहिनीचा डाव तुझ्या ध्यानांत आला नाहीं दादा. ती थट्टा नव्हती—वहिनी म्हणतेय तें नुसतं तुझ्या समजुतीसाठीं. उषाताईना ती चांगली ओळखते म्हणूनच तिनं माझं नांव सुचवलं. पण मी कांहीं अगदींच हा नाहीं म्हणावं. साफ नाहीं म्हटलं असतं तुम्हीं ठरवलं तरी. हंः ! वहिनी एवढी आंतल्या गांठीची असेल असं नव्हतं मला वाटलं. तिला वाटलं, भरताची मांडवी स्त्री–लक्ष्मणाची उर्मिला–तशा दोघी बहिणी आपल्या जावा जावा होऊन राहूं. दोघींनीं मिळून चांगलं राबवावं मला ! एकीनं नवरा म्हणून तर एकीनं दीर म्हणून. छान ! असला हा हिमालय पर्वत डोक्यावर घेऊन चिरडून जायला तयार होण्याइतका मी अगदींच वेडपा नाहीं म्हणावं ! ”

इतक्या लघळपणानं मी एवढं सारं कांहीं कसं बोललों— विशेषतः दादासमोर कसं बोललों—याचं माझं मलाच आश्चर्य वाटलं. वहिनी तर नुसती थक्क होऊन माझ्याकडे पहात राहिली होती. उषेच्या मनावरही कांहींतरी वेगळाच परिणाम झाला असावा. ती म्हणाली, “ एवढे चिरडीला कां आलांत ? मी कांहीं अगदींच नकार दिला नव्हता.”

“ वा वा ! ‘ कुणाला पाहिजे हा असला वेडपा ? ’ असं कायसंसं म्हटलं नाहींत का तुम्हीं ? ” मी म्हटलं.

“ म्हणजे माझा प्रस्ताव कांहीं अगदींच फुकट गेला नाहीं ! ” वहिनी म्हणाली, “ आज ना उद्यां दोघंही कुठंतरी अर्ध्या वाटेवर भेटायचा संभव दिसतो आहे मला. बरं का उषे, माझ्या म्हणण्यांत कांही तथ्य आहे. अगदींच उडवून देऊं नकोस तें. शांतपणानं विचार केलास तर माझा प्रस्ताव तुझ्या कल्याणाचाच आहे असं तुला पटल्यावाचून राहायचं नाहीं. आज नाहीं पटायचं कदाचित्—”

“ बरं बरं. पुढचं पुढं पाहूं ! ” दादा मधेंच म्हणाला, “ आजच कशाला ही नाहीं ती चर्चा. आतां बाळू कांहीं तरी उद्योगाला लागला आहे खास. आज काम क्षुल्लक दिसत असलं तरी उद्यां त्यांतून कांहींतरी निष्पन्न होईल अशी मला आशा आहे. वर्तमानपत्राच्या ऑफिसांत म्हणा, अगर आमच्या खात्याच्या दारावर म्हणा, आज त्यानं थाप मारली आहे. कुणी सांगावं, आज उद्यां यांतला एकादा दरवाजा उघडेल. आणि त्याच्याबरोबर त्याचं नशीबही उघडेल. बरं का बाळू, हा तुझा रिपोर्ट खरोखरच फार छान झाला आहे. वर्तमानपत्राप्रमाणें आमच्या खात्याकडूनही तुला याचा मोबदला मिळेल. ” असं म्हणून दादा तो रिपोर्ट घेऊन निघून गेला.

अवास्तव प्रकारानं सुरू झालेल्या या विषयाला वास्तव स्वरूप येतंय कीं काय अशी मला शंका येऊं लागली. त्या दिवसापासून माझ्याशीं वागायचं उषेचं धोरण बदललं. पदोपदीं माझा पाणउतारा करायची पूर्वीची पद्धत सोडून आतां ती मला राबवून घेऊं लागली. तिला झुलवण्यासाठीं मीही तिच्यासाठीं राबूं लागलों.

व्हिक्टोरिअन कालांतल्या एकाद्या दाक्षिण्ययुक्त नायकाप्रमाणें मीही तिच्या लहरीला मान तुकावूं लागलों. हळुहळू तीही माझ्यावर खूष होते आहे असं मला दिसूं लागलं. वहिनीनं म्हटल्याप्रमाणं 'वापरायला लायक' असलेल्या नवऱ्याला कसं वागवायचं याचा प्रयोग उषा करीत होती. आणि त्या कसोटीला उतरायचा मीही जिवापाड प्रयत्न करीत होतों. तें पाहून वहिनी मात्र घाबरून गेली असावी. एके दिवशीं ती मला म्हणाली, "अलीकडे हें काय चालवलं आहे भावजी ? पूर्वीची ती तुमची तत्वनिष्ठा गेली कुठं ? रोज सभांचे रिपोर्ट तुम्हीं आणून देतां आहांत—पोलिसांत शिरायचं आहे का तुम्हांला ?"

"कांहींतरी केलं पाहिजे ना ?" मीं गंभीरपणाचा आव आणून म्हटलं, "मला आतां संसारी बनलं पाहिजे. धर्माचे तुकडे मोडीत किती दिवस तुझ्या दारीं पडून राहूं ?"

"नि उषेबरोबर तुमचा हा जो लघळपणा चालला आहे—"

"थांब, थांब वहिनी. तुझ्यासारख्या सुशिक्षित स्त्रीच्या तोंडीं असले उद्गार शोभत नाहींत. मी 'प्रियाराधन' करतों आहें. बोलून चालून मी अशिक्षित माणूस—सुशिक्षित बायकोच्या पदरीं मला बांधायचं तूं ठरवलंस—आतां तिच्या वृत्तीला पात्र व्हायचा प्रयत्न मी नको का करायला ? नोकरी पाहिजे तशीच मला बायकोही पाहिजे. कुठली तरी मालवणी किंवा वेळगांवी अशिक्षित मुलगी बायको म्हणून पत्करण्यापेक्षां—नवरा बायकोचं जीवन गबाळपणानं घालवण्यापेक्षां—अशा सुशिक्षित, सुविद्य, सुसंस्कृत विदुषीचा कामसू नवरा होण्यांत मला भूषणच नाहीं का वाटायचं ?"

"असं का ?" वहिनीनं खोचून विचारलं, "मी अगदींच बावळी आहें असं का वाटलं तुम्हांला ? चंगलं ध्यानांत ठेवा भावजी, तुमचा डाव मी ओळखला आहे. उषा केव्हां जाणार म्हणून काल विचारीत होतां आणि आज तिच्या पातळांच्या निऱ्या चुणायचीदेखील तयारी दाखवतां आहां—यांत खरं किती अन् ढोंग किती तें चांगलं कळतं मला ! कशाला त्या घमेंडखोर पोरीला अशी खेळवतां आहांत ?"

" मी खेळवतों आहें ? तिला ? उषेला ? माझ्यासारख्या कितीजणांना आजपर्यंत तिनं खेळवलं आहे ! तीच सांगते तें ऐकलं आहेस ना ? तिला मी खेळवणार ? हं: ! आतां काय म्हणावं तुला वहिनी ! "

" तुमच्याशीं बोलण्यातच अर्थ नाहीं ! " असं म्हणून वहिनी रागारागानं निघून गेली.

माझ्या धोरणाचा अंदाज वहिनीला आला आहे असं पाहून मला समाधान वाटलं. कॉलेजांतल्या तरुणांना आपण आपल्या करंगळीभोंवतीं घिरट्या घालायला लावायचा दिमाख मारणारी ही मुलगी खरोखरच माझ्या कारवायीला बळी पडते आहे कीं काय असा मला प्रश्न पडला. दादानं माझ्यावर नजर ठेवण्यासाठीं एक प्रकारें तिची योजना केली होती. रिपोर्ट घेण्यासाठीं ज्या ज्या सभेला मी जात होतों त्या त्या सभेला ती हजर असे. रिपोर्ट लिहितांना मी माझ्या अनुकूलतेप्रमाणें लिहीत असें, पण दादानं ते रिपोर्ट ताडून पहाण्यासाठीं तिच्याकडे दिले तर ती त्यांत खोड काढीत नसे, याचं मला आश्चर्य वाटे.

मी दिलेला रिपोर्ट आणि दादाच्या कानीं आलेली हकीकत यांत एका सभेच्या वेळीं बरीच मोठी तफावत पडली. दादानं उषेला विचारलं तेव्हां उषेनं माझाच रिपोर्ट बरोबर असल्याचं सांगितलं.

दादाला प्रश्न पडला—त्याला सांगणारी व्यक्ति त्याच्या दृष्टीनं विश्वसनीय होती. अगदीं उघडपणें त्यानं मला तसं सांगून विचारलं तेव्हा मी म्हटलं, " उषाताईच्या शब्दावरसुद्धां तुझा विश्वास नाहीं का दादा ? "

" कुणीतरी तुम्हांला फसवलं. " उषा म्हणाली, " तुम्हांला बनवायचा प्रयत्न केला. कोण होता तो ? "

" कुणी हिंदुसभावादी होता का ? " मीं विचारलं.

दादानं कांहींच उत्तर दिलं नाहीं. माझ्या उद्‌गारांचं सूत्र पकडून वहिनीनं मल्लिनाथी करायला सुरवात केली. ती म्हणाली, " मोठे विलक्षण आहेत हे हिंदुसभावाले. कॉंग्रेस-वाल्यांचा त्यांनीं द्वेष कां करावा हेंच मला कळत नाहीं.असं काय आहे विशेष आमच्या कॉंग्रेसच्या धोरणांत, कीं तें त्याना आवडूं नये ?—" वहिनी बोलत असतांना अन्यमनस्क असलेल्या दादानं ' आमच्या कॉंग्रेसच्या ' या शब्दाबरोबर चट्‌कन् तिच्या-कडे रोखून पाहिलं. चेहऱ्यावरची एक रेषाही बदलूं न देतां वहिनी म्हणाली, " आमचे

कॉंग्रेसवाले या हिंदुसभावाल्यांच्या वाटेला जात नाहींत—त्यांना पाठिंबा देत नाहींत. कीं विरोधही करीत नाहींत—त्यांना हिशेबातच घेत नाहींत म्हटलं तर जास्त शोभेल. म्हणूनच मला वाटतं, ते आम्हां कॉंग्रेसवाल्यांचा द्वेष करतात—"

" जरा थांब," दादा म्हणाला, " कांग्रेसवाल्यांची तुला काय माहिती आहे ?"

" जितकी तुम्हांला तितकीच मला त्यांची माहिती आहे." वहिनी शांतपणें म्हणाली, " कॉलेजांत असतांपासून मी होतेंच कीं त्या चळवळींत. किती संप केले होते, किती निशाणं नाचवलीं होतीं, किती मिरवणुका काढल्या होत्या—खादीचे ताके विक्रीत चाळींचाळींतून हिंडलें होतें सुद्धां !"

एक क्षणभर सारीं स्तब्ध बसलीं होतीं.

" बरं का रावसाहेब," उषा म्हणाली, " मीं सुद्धां केलीं होतीं तीं ढोंगं."

" ढोंगं ?" दादा उद्गारला, " तीं ढोंगं वाटलीं म्हणूनच का आतां सोडलीं ?"

" असंच कांहीं नाहीं," उषा म्हणाली, " पण कॉंग्रेसचा आंखुड दृष्टीकोण आतां मला पटेनासा झालाय. आतरराष्ट्रीय भावना जसजशा बळावत चालल्या, तसतसा कॉंग्रेसचा हा कार्यक्रम मला अपुरा वाटूं लागला. जगांत यंत्रयुगाची परिणती झालेली असतां चरखे फिरवित बसणं मला वेडगळपणाचं वाटूं लागलं. भांडवलशाहीच्या कारवायीनं जगांत अनर्थ माजलेले दिसत असतांना भांडवलशाहीशीं चुंबाचुंबी करणारी ही कॉंग्रेस मला तिरस्करणीय वाटूं लागली–" अन् मग उषेनं भांडवलशाही, आंतरराष्ट्रीय चळवळ, विरोधविकासवाद, जडवाद आणि निरीश्वरवाद वगैरे बाबींवर व्याख्यान द्यायला सुरवात केली, त्यावेळीं वहिनी तिच्याकडे नुसती टकमक पहात राहिली. मी थक्क झालों. मात्र दादाच्या मनावर कसलाच परिणाम होत असल्याचं दिसून आलं नाहीं.

कॉंग्रेसची चळवळ चढती होती. समाजवादाला आज सरकारचा विरोध होता. समाजवादी लोक कॉंग्रेसच्या कक्षेंत राहून–क्वचित् स्वतःला कॉंग्रेसमन म्हणवून–आपल्या मतांचा प्रचार करीत होते. त्या दृष्टीनं पाहतां उषेचं बोलणं दादाला रुचलं नसावं असा मी अंदाज केला. दादानं तसं प्रत्यक्ष बोलून दाखवलं नाहीं आणि त्यानं तें बोलून दाखवलं नाहीं, म्हणून उषेनं त्याची पर्वाही केली नाहीं. सिनेमाच्या फिल्मसारखी तिची बोलण्याची पट्टी जी एकदां चालू झाली ती कांहीं केल्या थांबेना.

दादानं डोळे मिटून घोरायला सुरवात केली असं पाहून वहिनी उषेला म्हणाली " कुणाशीं बोलते आहेस उषे ? "

त्यावेळीं कुठं उषेचं लक्ष दादाकडे गेलं.

" असं आहे या पुरुषांचं, " उषा म्हणाली, " दुसऱ्याचं बोलणंच मुळीं ऐकून घेत नाहींत— "

" पण मी ऐकतों आहें ना लक्ष लावून ? " मीं म्हटलं, " आज किती माहिती मिळाली मला ! शंभर पुस्तकं वाचूनसुद्धां हा विषय मला इतका सहज कळला नसता. " वहिनीनं माझ्यावर डोळे वटारले हें पाहून मी म्हणालों, "अन् ही आमची वहिनी ! हिला कशांतच गोडी लागत नाही. स्वतः कांहीं करीत नाहीं, दुसऱ्याला कांही करूं देत नाहीं–नुसतीं नांवं ठेवते लोकांना–आणि म्हणे हिनं कॉंग्रेसची चळवळ केली होती ; हीच सांगते म्हणून खरं म्हणायचं एवढंच."

उषा मोठमोठ्यानं हंसली तेव्हां दादा दचकून जागा झाला आणि म्हणाला, " अरेच्या ! झोंपलों वाटतों मी ? काय म्हणत होतां त्या विरोधविकासवादाचं ?"

" आतां संपून गेला तो विषय. " वहिनी म्हणाली, " आतां पडा जाऊन वर. सकाळीं लौकर उठून जायचं आहे ना कुठं ? "

" हो, खरंच ! " असं म्हणून दादा उठून निघून गेला.

झोंपेचं ढोंग त्यानं बेमालूम केलं अशी माझी खात्री झाली.

" कशाला उगीच बडबडत बसलीस ? " वहिनी उषेला म्हणाली, " काय कळणार आम्हां लोकांना या विषयांत ? "

" म्हणजे कुणाला ? " मीं वहिनीला विचारलं, " कांग्रेसवाल्यांना कीं सरकारी नोकरांना ? "

" दोघांनाही ! " वहिनी म्हणाली, " दोघेही परिस्थितीचे गुलाम आहेत. विशिष्ट प्रकारच्या बंधनांत दोघांनींही स्वतःला जखडून घेऊन ठेवलं आहे. त्या बंधनाच्या मर्यादा दोघांनाही सारख्याच पाळाव्या लागतात. आजउद्यां कधीं कॉंग्रेसच्या हातीं सत्ता गेली तर याचं प्रत्यंतर मिळेल तुम्हांला ! "

इतक्या निश्चितपणें या विषयावर वहिनी ही पहिल्यानंच बोलली असं मला वाटलं.

" पण कॉंग्रेसच्या हातीं सत्ता जाईल तेव्हां ना ? " उषा म्हणाली.

" घोडा मैदान आतां दूर नाहीं ! " वहिनी म्हणाली आणि तशीच निघून गेली.

" मोठीं विलक्षण आहेत हीं दोन्हीं माणसं, " उषा उद्गारली, " ताईचं मला माहीत आहे. कोणत्याच विषयाला ती कधींच चिकटून रहात नाहीं. काल केसरिया नेसून मिरवीत होती, आज पोलिस इन्स्पेक्टरची बायको होऊन बसली आहे !—उद्यां कदाचित् हीसुद्धां एकादी सरकारी नोकरी पत्करील ! "

"आणि तुम्हीं ?" मीं विचारलं, "आणि तुम्हीं काय करणार बी. ए. झाल्यावर ?"

" तें अजून निश्चित केलं नाहीं मी अजून. " उषा मोठेपणाचा आव आणून म्हणाली, " लॉ टर्म्स भरायच्या कीं एम्. ए. ला जायचं, हें अजून ठरायचं आहे माझं. मी नोकरी करणार नाहीं कीं वकिलीही करणार नाहीं, हें मात्र माझं निश्चित ठरलं आहे. "

" मग काय करणार ? " मी भाविकपणें विचारलं, " लग्न करणार ? "

उषा हंसली आणि म्हणाली, " कदाचित् लग्नसुद्धां करणार नाहीं—कदाचित् करीनही—पण तसा जोडीदार मिळाला पाहिजे !—" ती पुन्हां हंसली आणि म्हणाली, " नोकरी किंवा लग्न, याशिवाय तुम्हां लोकांना दुसरं कांहीं सुचतच का नाहीं ? "

" नोकरी किंवा लग्न नव्हे ! " मीं म्हटलं, " नोकरी आणि लग्न या दोहोंशिवाय दुसरं काय दिसतं आहे कुणाला ? "

" आणि तुम्ही काय करणार आहांत ? "

" मी होय ? जगाच्या हिशेबीं मी एक क्षुल्लक प्राणी आहें. जोंपर्यंत दादा कांहीं तक्रार करीत नाहीं तोंपर्यंत हें असंच चालायचं असं आजवर मला वाटत होतं, पण तुम्ही आल्यापासून मी थोडा विचार करूं लागलों आहें. कांहींतरी केलं पाहिजे असं मला वाटूं लागलंय पण काय करावं, कसलं काम मला करतां येईल तें मात्र अजून मला ठरवतां आलं नाहीं. शिवाय आतां तुम्ही जाणार. कुणीं सांगावं—माझं मुळचं गाणं तुम्हीं गेल्यावर पुन्हां मूळपदावर येईल देखील. स्फूर्ति येते ती अंतरंगांतून येते असा यापूर्वी माझा समज होता—" असं म्हणून मी थांबलों.

मी पुढं कांहीं बोलत नाहीं हें पाहून उषेनं विचारालं, " मग आतां काय वाटतं ? "

" आतां काय वाटतं तें बोलण्याइतकं स्वातंत्र्य अजून माझ्या आंगवळणीं पडलेलं

नाहीं. मी एक परावलंबी नि परोपजीवी प्राणी आहें. स्वतःच्या पायावर उभं रहाण्या-इतकं सामर्थ्य माझ्या अंगीं नाहीं याची मला जाणीव आहे. अन् म्हणूनच दादा वहिनींच्या चांगुलपणावर मी विसंबून राहिलों आहें."

तें भाषण तेवढ्यावरच राहिलं. रात्र बरीच झाल्यामुळं उषा उठून निघून गेली. स्वतःशींच विचार करीत कितीतरी वेळ मी तिथं बसून राहिलों होतों. आश्रिताचं जीवन जगण्यांत माझं आजवरचं आयुष्य गेलं. वहिनीच्या चांगुलपणामुळं त्या जीवनांत खंड पडेल असं अजूनही मला वाटत नव्हतं. हें भलतंच काम दादानं माझ्या गळ्यांत बांधलं तेव्हांपासून मात्र माझ्या विचारांना एक प्रकारची चालना मिळाली. उषेच्या अस्तित्त्वामुळं त्या चालनेचं खळबळीत रूपांतर झालं. सीध्या मार्गानं जाणारा मी, त्या मला आतां वांकडेतिकडे डाव टाकण्याची बुद्धि होऊं लागली.

आज झालेला सारा प्रकार वहिनीला आवडला नसावा अशी मला शंका आली. माझ्या शेवटच्या भाषणानं उषेच्या मनावर सुद्धां जो परिणाम झाला असं मला वाटलं, तो फारसा इष्ट नसावा. दादाही माझ्याबद्दल साशंक झाला होता. डाव टाकण्याच्या या वृत्तीमुळं मी सर्वांनाच नावडता होणार कीं काय अशी शंका येऊन माझं मन उदास झालं.

ती सारी रात्र मी तळमळून काढली.





त्या वक्त्यावर खटला भरण्यांत आला. कोर्टांत त्याच्या भाषणाचा जो रिपोर्ट दाखल करण्यांत आला होता तो मी दिलेल्या रिपोर्टापेक्षां अगदींच वेगळा होता. माझा रिपोर्ट तंतोतंत बरोबर होता असं मी म्हणणार नाहीं. बरींच वाक्यं मीं त्यांत वगळलीं होतीं. पण ज्या रिपोर्टावरून हा खटला भरण्यांत आला तो रिपोर्ट अचुक होता असं कांहीं माझं मन मला सांगेना.

हा रिपोर्ट दिला कुणीं? तो रिपोर्ट कुणी घेतला हें सांगायचं कोर्टात जबानी देतांना दादानं अजिबात टाळलं. खटला चालतांना प्रतिपक्षानं विरोध न केल्यामुळं हा प्रश्न कुणी धसालाही लावला नाहीं. मला मात्र शेवटपर्यंत तें कोडंच राहिलं. त्या वक्त्याला नऊ महिन्यांची सक्तमजुरीची शिक्षा झाली.

उषा त्यावेळीं निघून गेली होती. या प्रकरणांत एक प्रकारें तिचा संबंध आलेला असल्यामुळं ती यावेळीं इथं असती तर बरं झालं असतं असं मला वाटलं. मुंबईला गेल्या-वर तिनं जर मला पत्र पाठवलं असतं तर कदाचित् मी तिला सुद्धां या खटल्याबाबतची हकीकत लिहून कळवली असती—अन् मग मलाही या बाबतींतलं तिचं मत कळून आलं असतं.

पण तसं कांहींच झालं नाहीं. वहिनीसुद्धां या बाबतींत कांहीं बोलली नाहीं. उषा आल्यावेळीं तिनं माझ्याशीं वागण्याचं धोरण जें बदललं होतं तें अजूनही तसंच कायम ठेवलं होतं. मला तें जाणवत होतं. तिलाही तें जाणवत असावं असं मला तिच्या एकंदर चालचलणुकीवरून वाटे. तरीही या शंकेचं निराकरण करून घ्यायचा प्रयत्न मी मुळींच केला नाहीं.

या खटल्याचा निकाल झाल्यापासून गावातील लोक हट्टाला पेटले. नवे नवे वक्ते येऊन ज्वलज्जहाल भाषणं करूं लागले. रिपोर्ट घेण्याचं काम मीं पूर्वीप्रमाणेंच चालू ठेवलं होतं; पण दादाकडे मी दिलेल्या रिपोर्टांचा मोबदला मला पूर्वीप्रमाणें मिळत नव्हता. कांहीं रिपोर्टांचा मोबदला मिळे तर कांहींचा मिळत नसे. एक खादीधारी गृहस्थ माझ्यासारखाच रिपोर्ट घेतो आहे असं पाहून मी त्याला विचारलं, तेव्हां मुंबईच्या दुसऱ्या एका दैनिकाचा आपण बातमीदार असल्याचं त्यानं सांगितलं. आणखीही एक दोन इसम रिपोर्ट लिहून घेत असत पण ते माझ्या माहितीचे होते. या माहीत आणि गैरमाहीत माणसांपैकीं दादाचा माणूस कोण याची निश्चित ओळख मला पटेना.

खटल्यामागून खटले भरले जात होते आणि प्रत्येक वक्त्याला कांहीं ना कांहीं शिक्षा होत होती, हें पाहून मी फार अस्वस्थ होत होतों.

अशा प्रकारें खटल्याचं सत्र सुरू झालं असतां त्या सभांना वहिनी हजर राहूं लागली हें पाहून मला आश्चर्य वाटलं. क्षणभर माझं मन साशंक झालं. दादाच्या सांगणीनंच ती येते असं एकदां मला वाटलं. मीं तसं विचारलं तेव्हां वहिनी म्हणाली,

" समजा, मी तशीच जातें आहें.—पण तशी जात असलें तर कुणी विचारलं म्हणून मी कबूल होईन असं कसं वाटलं तुम्हांला ? तुम्हीं कबूल केलं असतं का तसं ? नाहीं ना ? मग मला कां विचारतां ? "

" हल्लीं तुला असं काय झालंय् वहिनी ? " मीं काकुळतीला येऊन तिला विचारलं, " केव्हां कांहीं विचारलं तर केव्हांही तूं सरळ उत्तर देत नाहींस. असं काय केलंय मी ? " वहिनीच्या डोळ्यांना टच्कन पाणी आलं. ती क्षणभर स्वस्थ राहिली. बाजूला वळून पदरानं डोळे पुसून घेऊन मोठ्या मायेनं माझ्याकडे पाहून ती म्हणाली, " खरंच ! पूर्वी आपण मोठीं सुखांत होतों नाहीं ? ही कसली मेली चळवळ सुरू झाली नि सुखाच्या संसारांत बिब्बा पडला ! सारं कांहीं विसरून गेलें होतें मी—पण परवां ती एकाला शिक्षा झाली—खटला झाला त्यावेळीं त्याचं नांव कळलं म्हणून कोर्टांत गेलें होतें, पाह्यलं तर तो माझ्याबरोबरचा एक विद्यार्थी ! बरोबरचा कसला, मी फर्स्ट इअर झालें तेव्हां तो ज्युनिअर बी. ए. ला होता. अप्-टु-डेट पोषाख करणारा तो माणूस, पण आज खादी घालून पिंजऱ्यांत उभा राहिलेला पाहिला त्यावेळीं माझ्या काळजांत धस्स झालं. मीं मनाशीं म्हटलं, या माणसावर ही केस ? आम्हीं मुलं या माणसाची त्यावेळीं थट्टा करीत होतों. ' साहेब ' म्हणत होतों त्याला. हा असा अन् मी ही अशी ! म्हटलं काय उलथापालथी चालल्यायत या जगांत ! पूर्वीची वृत्ति उसळून उठली. परवां सभेला गेलें होतें त्यावेळीं व्यासपीठावर जाऊन बोलावं असं वाटून उठून उभीसुद्धां राहिलें—" एक मोठा आंवढा गिळून वहिनी क्षणभर स्तब्ध बसली. तिचे डोळे पुन्हां पाण्यानं भरून आले होते. अगदीं माझ्यासमोर डोळे पुसून घेऊन ती म्हणाली, " कशाला लपवूं तुमच्यापासून ? मघांशी लाज वाटली म्हणून तोंड फिरवून मी डोळे पुसले ! आतां त्याचीच लाज वाटते आहे मला. तुमच्यापासून कशाला चोरूं ? एवढाच काय तो मला आधार ! तिथं प्रतारणा कां करूं !—"

पुन्हां तिला उमाळा आला अन् त्यासरशीं तिच्या डोळ्यांतून आसवांच्या धारा वाहूं लागल्या. परिस्थितीचा परिणाम तिच्या मनावर झाला होता. तो परिणाम कुठंतरी बोलून दाखवणं अवश्य झालं होतं. असह्य झालेला अंतःकरणाचा भार एरव्हीं हलका झाला नसता. माझ्या प्रश्नामुळं तें व्यवधान दूर झालं आणि अंतरींचा उमाळा बाहेर आला.

वहिनीला उत्तर काय द्यावं हें मला सुचेना. तसं पाहिलं तर तिनं उत्तराची अपेक्षा कुठं केली होती ? ती बोलत होती नि मी ऐकत होतों. तरीही ती म्हणालीच, " कां ? बोलत कां नाहीं भावजी ? कांहीं होतोय का मनावर परिणाम ? "

विपरीत परिणामामुळं तरी तिचा आवेग ओसरेल या आशेनं मीं थोड्याशा कठोरतेनं म्हटलं, " कसला परिणाम व्हायचा ? माणसाचं चुकतं तें इथंच. भाजीवालीकडचीं वांगीं घेतांना आपण जितकी कसोशी करतों तितकीसुद्धां कसोशी लग्नाच्या वेळीं करीत नाहीं. तूं का अगदीं परकरी पोर होतीस, कीं कुणा दूरच्या नातेवाईकाच्या आश्रयावर जगलीं होतीस, कीं तुझ्या संमतिविरुद्ध हें लग्न ठरवलं होतं ? "

एक मोठा सुस्कारा सोडून वहिनी म्हणाली, " तुमचं म्हणणं बरोबर आहे भावजी. ' प्रौढ-विवाह ' हें नुसतं नांव राहिलें आहे आतांशा. बाकी सारे सोपस्कार होतात ते पूर्वींच्या बाल-विवाहासारखेच. बी. ए. झालेली मुलगी असली तरी तसेच पहायला येतात, तसाच चहा होतो, कळत न कळत पहायचासुद्धां विधी तसाच होतो. काप गेले तरी भोकं राहिलीं आहेत तीं हीं अशीं ! तसंच माझं झालं. लग्नाच्या दुसऱ्या दिवशीं खादीच्या साड्यांचं गाठोडं माहेरच्या खुंटीला लावून जॉर्जेटचं पातळ नेसून सासरीं आलें !—सासरीं म्हणजे नवऱ्याकडे ! सासू सासरा कोण होतीं इथं ? कुणी सक्ति केली नव्हती माझ्यावर. मलाच वाटलं अन् मीं कपडेबदल केला. आतां रडून काय उपयोग ? " असं म्हणून पुन्हा एक मोठा सुस्कारा सोडून हातावर कपाळ टेकून वहिनी स्वस्थ बसली.

ती कांहींतरी विचार करीत होती. बोलावंसं वाटे म्हणून माझ्याकडे पाहून बोलायला सुरवात करी आणि पुन्हां तशीच स्वस्थ बसे. अगदीं उघडउघड तें मला दिसून आलं म्हणून मीं म्हटलं, " कशाला ही मुस्कुटदावी करतेयस ? बोलून टाक ना एकदां काय तें. फेकून दे तो धोंडा. त्याशिवाय मन हलकं व्हायचं नाहीं. "

" खरं आहे तें. " वहिनी म्हणाली, " तुमच्यावर माझा विश्वास आहे. परिस्थितीच्या दडपणामुळं मी तुमच्याशीं क्वचित् प्रतारणा करीत असेन—पण तुम्ही माझा विश्वासघात करणार नाहीं याची मला खात्री आहे— " पुन्हां एक क्षणभर थांबून जमिनीकडे पहात ती म्हणाली, " त्याचं माझं लग्न ठरत होतं—"

" कुणाचं ? " मीं विचारलं.

माझ्या प्रश्नाचं सरळ उत्तर न देतां तिनं आपलं बोलणं चालू ठेवलं होतं—जणूं काय ती स्वतःशींच बोलत होती, " विलायती कपडे वापरतो, विलायती थाटांत रहातो म्हणून मीं त्याला नाकारलं. तो देखील असाच मला पहायला आला होता. चहाची ट्रे घेऊन मी गेलें तेव्हां त्याच्या चिरुटाच्या वासानं माझं डोकं भणभणलं.

कॉलेजांत त्याला सारेच ' साहेब ' कां म्हणत असत त्याचा सरळ सरळ प्रत्यय आला. त्यानं मला विचारलं, ' तुमची हॉबी काय ? ' ज्यावेळीं मीं म्हटलं, ' चरख्यावर सूत काढणं ! ' तेव्हां त्याचा सुंदर चेहरा वांकडा झाला. चहा घेऊन मी गेलें होतें ती सुद्धां खादीची साडी नेसूनच. त्याला तें रुचलं नसावं. मी आंत गेलें. पुन्हां मला बोलावलं तेव्हां मी बाहेर यायचं साफ नाकारलं. ' सुटलों या संकटांतून ! ' असं वाटल्यागत चेहरा करून तो निघून गेला होता !–आणि आतां तोच माणूस खादी घालून आरोपी म्हणून कोर्टासमोर उभा राहिलेला पाहिला ! खरोखरच त्यावेळीं मला धक्का बसला. मनांत कांहींतरी विलक्षण कल्पना आली. शिक्षा सांगितल्यानंतर त्याला लॉकअपमधें नेलं तेव्हां एकदां जाऊन त्याची भेट घ्यावंसं वाटलं. जाऊं कीं नको, जाऊं कीं नको, असं म्हणत म्हणतच मी लॉकअपपर्यंत जाऊन पोहोचलें. तिथले शिपायी ओळखत होते त्याचा फायदा घेऊन मी त्यांची भेट घेतली— "

" तूं भेटलीस त्याला ? " मीं आश्चर्य चकित होऊन विचारलं, " अन् दादाला कळलं तर ? "

" कळेलही कदाचित्," ती बेफिकीरपणानं म्हणाली, " मी त्याला भेटलें— त्यानं माझ्याकडे पाहिलं—त्यानं मला कोर्टातच ओळखलं होतं—माझ्याकडे पाहिलं आणि अत्यंत सोज्वळपणें तो म्हणाला, ' एकूण ही अशी उलटापालट झाली तर ! आतां काय आहे तुझी हॉबी ? ' डोक्यावर कुणी लाठीचा तडाखा मारला तरी देखील तो मला इतका जाणवला नसता. माझ्या तोंडून शब्द बाहेर फुटेना. तो म्हणाला, ' तुझ्यामुळं मी असा झालों. तूं मला झिडकारलंस म्हणून मी विचार करूं लागलों. विचार करतां करतां डोक्यांत प्रकाश पडला. आतां मी हा इथं आहें. अन् तूं—तूं कुठं आहेस ? माझे डोळे उघडायला कारणीभूत होणारी तूं, त्या तुझ्याच नवऱ्यानं आतां मला तुरुंगांत पाठवलं आहे ! ' अगदीं नकळत मला हुंदका आला. एक शब्दसुद्धां न बोलतां मी तशीच मागें फिरलें. ' तो कोण ? ' म्हणून लॉकअप्‌च्या शिपायानं विचारलं तेव्हां ' आहे असाच आमचा एक नातलग ' असं कांहींतरी उत्तर देऊन मी तिथून काढता पाय घेतला. तेव्हांपासून—" बोलतां बोलतां तिला उमाळा आला आणि ती ओक्साबोक्शीं रडूं लागली.

कसं मी तिचं सांत्वन करणार होतों ? तिनं मारलेला फटकाच पुन्हां तिच्यावर उलटला होता. काळीज फुटून रडूं येण्याजोगाच तो प्रसंग होता. कदाचित् तो माणूस टोंचून बोलला नसेल—अगदीं सहज सहज उद्‌गार आला तो त्यानं बोलून दाखवला

असेल—मुद्दाम तिला दुःख व्हावं अशा जाणिवेनं त्यानं ते उद्‌गार काढलेही नसतील—पण जो परिणाम झाला तो अगदीं यथायोग्य होता. वहिनीच्या जागीं मी असतों तर पश्चात्तापाच्या झटक्यानं मीही असाच जमिनदोस्त झालों असतों. मला वाटलं, झालं तें ठीक झालं !

" अशी आहे ही माणसाची जात ! " वहिनी एकदम माझ्याकडे पाहून उद्‌गारली.

" कशी ? " मीं हंसण्यावारी नेऊन विचारलं.

" हा थट्टेचा विषय नाहीं भावजी, " वहिनी गंभीरपणानं म्हणाली, " माझ्या काळजाला झालेली ही जखम किती भयंकर आहे याची नाहीं तुम्हांला कल्पना व्हायची ! आज दोनतीन दिवस सारखं मी माझ्या आयुष्याचं सिंहावलोकन करतेंय. जसजशी मी मागें पहातेंय तसतसं माझं मन भडकून उठतंय. बेफिकीरपणामुळं आपल्या हातून केवढा तरी मोठा गुन्हा झालाय—नकळत कां होईना, गुन्हा झाला आहे—याची जाणीव होऊन पश्चात्तापानं माझं सारं अंतःकरण पेटूं लागलंय. माझ्या-मुळं तो असा झाला ! माझं लग्न झालं हें त्याला माहीत होतं ! मग तो केव्हां असा झाला ? माझं लग्न व्हायच्या पूर्वी ? त्यावेळीं त्याला विचारायचं मला मुळीं भानच राहिलं नव्हतं. आतां तो तुरुंगांत गेला आहे. आतां मला त्याची भेट घेतां यायची नाहीं. आधीं असो कीं नंतर असो. माझ्या भाषणाचा त्याच्या मनावर परिणाम झाला, अन् ती मी ही अशी होऊन बसलेंय् ! तो त्या तुरुंगांत पडलाय—मी या तुरुंगांत पडलें आहें. स्वातंत्र्याच्या घोषणेसाठीं तो तुरुंगांत गेला अन् जाणूनबुजून पारतंत्र्य पत्करलं म्हणून मी या उघड्या दरवाजाच्या तुरुंगांत जन्माची बंदीवान होऊन पडलें आहें ! काय होणार आतां माझं ?—"

तिचं बोलणं संपलं नव्हतं. पण तितक्यांत दादा आला. तिच्या चेहऱ्याकडे नजर जातांच दचकून तो एकदम थांबला आणि म्हणाला, " काय झालं ? "

डोळे पुसून वहिनी उभी राहिली. अगदीं ताठरून कांहीं वेळ ती दादाकडे नुसती पहात होती. दादा अस्वस्थ झाला. माझ्याकडे वळून तो म्हणाला, " काय झालं ? "

" काय ? कुठं ! " मी चांचरत बोललों, " तसं कांहीं विशेष नाहीं ! "

माझी झालेली केविलवाणी स्थिति पाहून वहिनीला दया आली. दादाला उद्देशून ती म्हणाली, " बसा. सांगतें. "

झालेली सारी हकीकत तिनं जशी मला सांगितली होती तशीच दादाला सांगितली. मात्र ती हकीकत मला सांगतांना तिनं ज्या भाषेंत सांगितली होती, माझ्यासारखा श्रद्धाळू श्रोता मिळाल्यामुळं तिनं ज्या भावनेनं सांगितली होती, ती भाषा आणि ती भावना दादाला सांगतांना नव्हती. या प्रसंगामुळं तिच्या मनावर जो परिणाम झाला होता त्याचं माझ्याकडे केलेलं वर्णनही त्या हकिकतींत नव्हतं. तें एक कोरडं वर्णन होतं. म्हणूनच दादाच्या मनावर त्याचा तितकासा परिणाम झाला नाहीं. तो म्हणाला, " एवढंच ना ? मग त्याच्यासाठीं एवढं रडायला हवं होतं कशाला ? त्यानं बुद्धयाच तुरुंग पत्करला. तुरुंगांत जावं म्हणूनच त्यानं तसं भाषण केलं होतं. चांगला एम्. ए., पिएच्. डी. माणूस ( वहिनी चमकली ! ) असलं भाषण केलं तर त्याचा काय परिणाम होतो हें त्याला कळत का नव्हतं ? डिफेन्ससुद्धां दिला नाहीं बेट्यानं. अगदीं बेरडासारखा तुरुंगांत गेला ! अन् तूं मात्र रडते आहेस ! उगीच जाऊं नकोस असले खटले ऐकायला. " असं म्हणून दादा माडीवर निघून गेला. बाहेर वाट पहात असलेले चारदोन शिपाई हातीं कागदाचीं पुडकीं घेऊन त्याच्या मागोमाग माडीवर गेले.

" ऐकलंत ? " वहिनीनं मला विचारलं, " असं आहे हें ! "

" असं आहे ना ? " मी सुस्कारून म्हणालों, " आतां कशाला त्याची खंत करायची ? हें असंच चालायचं. आतां त्याला कांहीं उपाय नाहीं. "

" उपाय नाहीं का ? अं ! " वहिनी एकदम दांतओंठ खाऊन म्हणाली, " बायका म्हणजे कांहीं अगदींच शेळ्यामेंढ्या नाहींत म्हणावं ! " झटक्यासरशीं ती आंत निघून गेली. मी नुसता पहात राहिलों.

रोज नवे नवे वक्ते येत होते, बेफाम बोलत होते, त्यांच्यावर खटले भरले जात होते आणि शेवटीं ते तुरुंगांत जात होते. दादाचा माझ्यावरचा विश्वास उडाला होता कीं काय कोण जाणे, माझ्याकडचे रिपोर्ट आपल्याला नकोत असं त्यानं एक दिवस सांगि-तलं. तें ऐकून वहिनी हंसली. दादाच्या तें नजरेला आलं आणि तो वहिनीला म्हणाला,— " त्या कामासाठीं आतां लघुलिपीवाला स्वतंत्र पगारी माणूस नेमण्यांत आला आहे. आतां कांहीं त्या कामाबद्दल आमच्या खात्याकडून पैसे मिळायचे नाहींत. उगीच फुकटा उपद्व्याप करायला बाळूला कशाला सांगूं ? कोणतंही काम फुकट करूं नये.—फुकट केलं कीं त्याला किंमत रहात नाहीं, एवढं एव्हांपासूनच मला बाळूला सांगून ठेवायचं आहे. लेखनाची त्याला आवड आहे पण या लेखनाच्या क्षेत्रांत लेखकाकडून फुकट

काम करून घेणारीं माणसं फार. म्हणूनच मीं म्हटलं—बाळू, कीं तुझे रिपोर्ट आतां मला नको म्हणून. तसं कांहीं मनांत आणूं नकोस हं. आजवर छान काम केलंस तूं. जरूर लागली, मोबदला मिळायची संधि असली, तर पुन्हांसुद्धां तुला हें काम सांगेन मी. "

बाहेर जातांजातां दादा हें असं बोलून गेला होता. रस्त्यावरून तो दृष्टीआड होईपर्यंत वहिनी सारखी त्याच्याकडे पहात राहिली होती. मी कांहींच बोललों नव्हतों, तरीही वहिनी म्हणाली, " काय वाटलं भावजी ? "

" काय वाटायचं ? " मीं अगदीं निरीच्छपणानं म्हटलं, " हें काम द्या म्हणून मी सांगायला गेलों नव्हतों—"

" तें मला माहित आहे. पण आतां हे जें बोलले त्याचं काय वाटतं तुम्हांला ? "

" तसं पाहिलं तर इतकं कांहीं बोलायला नको होतं. नि इतकं लांबलचक बोलायची दादाची संवयही नाहीं, एवढंच ! "

" एवढंच कां ? या एवढ्यांतच कितीतरी येतंय. अशावेळीं बोलतांना माणूस इतका काकुळतीला येऊं लागला कीं जरा संशय येऊं लागतो ! "

" तसंही असेल. त्यांत काय बिघडलं ? "

" काय बिघडलं म्हणे ! " वहिनी दांतओंठ खाऊन म्हणाली, " किती खोटं बोलत होते ! अगदीं उघड उघड मला दिसत होतं. संशय येऊन मीं पाहिलं म्हणून त्यांनी एवढी लांबण लावली. नाहींतर कांहीं जरूरी नव्हती एवढं काकुळतीला यायची. तुम्हीं कांहीं तक्रार केली नव्हती. मग कशाला एवढं केविलवाणं तोंड करून बोलायचं तें ? "

वहिनीच्या बोलण्याला काय उत्तर द्यावं हें मला सुचेना. अलिकडे तिची वृत्ति बदलत असल्याचं मला स्पष्ट दिसत होतं. ती गोष्ट माझ्या मनाला लागत होती. ही संधि साधून मी म्हणालों, " असं पहा वहिनी, तुझी नजर हल्लीं बिघडली आहे. तो कोणसा एम्. ए., पिएच्. डी. आला होता ना—त्याला शिक्षा झाल्यापासून तुझं डोकं बिघडलंय्. दादाच्या चालचलणुकीकडे पहायची तुझी दृष्टी तेढी झालीय —"

" अगदीं बरोबर आहे," वहिनी उल्हासून म्हणाली, " तुम्हांला तरी एवढं कळलं हें भाग्य माझं. तुमच्या रिपोर्टांबद्दल हे माझ्याकडे तक्रार करीत होते—ऐकलंत ?— यापूर्वीं मीं तुम्हांला सांगितलं नव्हतं, आतां सांगतें. ' बाळूचे रिपोर्ट बनावट असतात '

असं यांनींच माझ्याकडे म्हटलं होतं. तें काय त्यांना आठवलं नाहीं? अन् आतां माझ्यासमोर धडधडीत असं हें खोटं बोलून गेले. मला काय वाटेल याची पर्वासुद्धां केली नाहीं. कसा आदर राहील माझ्या मनांत! 'बायको' या व्यक्तीबद्दल तुम्हां पुरुषांच्या कांहीं ठाम कल्पना असतात. नवऱ्यानं कांहींही केलं तरी बायकोनं त्याच्यावर पांघरूण घातलं पाहिजे असा दंडक आहे ना तुम्हां पुराण-पुरुषांचा? अन् आम्ही बायकासुद्धां पाळीत आलों आहोंत तो दंडक, म्हणूनच असं बेछूट खोटं बोलायला त्यांना कांहीं वाटलं नाहीं!" जळजळणाऱ्या संतापामुळं तिच्या तोंडून पुढं शब्द निघेना.

"जाऊं दे!" मीं म्हटलं, "आपण कशाला तिकडे लक्ष द्या! आपलं चाललं आहे तसंच चालूं द्या."

"असं तुम्हीं म्हणा हवं तर!" वहिनी चिरडीला येऊन म्हणाली, "मला आतां हें असह्य होत चाललंय."

"तसं वाटून घेण्यांत कांहीं अर्थ नाहीं." पोक्तपणाचा आव आणून मीं म्हटलं, "हें असं आहे अन् हें असंच चालायचं. त्याला कांहीं उपाय नाहीं."

"असं पुरुषांनीं म्हणावं—निदान आत्तांच्या पुरुषांनीं म्हणावं. आम्हीं बायका आजवर असं म्हणत आलों तिथंच आमचं चुकलं. आत्तांसुद्धां असंच म्हणत राहूं तर तुम्ही पुरुष आणखी शिरजोर होत जाल."

त्यावर मी कांहींच बोललों नाहीं. वहिनीला मोठी चीड आली होती. पण त्यांतून कांहींच निष्पन्न होणार नाहीं याची मला खात्री होती. खरं पाहिलं तर या प्रकरणीं तिला चीड यायचं कांहीं कारण नव्हतं. तो माझा प्रश्न होता; आणि मला तर त्याबद्दल कांहींच वाटत नव्हतं. मग त्या बाबतींत हिनं डोकं पिकवून कां घ्यावं? मी कांहीं तिच्याकडे तक्रार केली नव्हती—कीं याप्रकरणीं न्यायही मागितला नव्हता—कीं मध्यस्थीही करायला सांगितली नव्हती.

तिला चीड आली ती एकाच कारणामुळं—त्याच्या भाषणाचा तिनं संशय घेतला.—दादा जें कांहीं बोलला तें माझ्यासाठीं नव्हतं, तिच्यासाठीं होतं,—तिच्या शंकेला तें उत्तर होतं. सारं कांहीं तिला माहीत असतां तिच्या शंकेचा फायदा घेऊन त्यानं माझ्या डोळ्यांत धूळ टाकली. उद्यां ती कांहीं बोलेल तर आधींच त्याच्यावर सारवण घालून ठेवलं—ही जी आगाऊ पुरावा बनवायची दादानं तयारी केली त्याचाच राग वहिनीला आला.

त्या दिवशीं मीं तो विषय पुढें वाढूं दिला नाहीं. मला स्पष्ट दिसून आलं, कीं सुखानं संसार करीत बसायची पूर्वीची वृत्ति सोडून वहिनी आतांशा विचार करूं लागली होती. त्यामुळं आजवर चालत असलेल्या आमच्या सुखाच्या संसारांत व्यत्यय येत होता. दादावर त्याचा कांहीं परिणाम होत नव्हता. त्याला ती जाणीवच नव्हती. त्याच्या दृष्टीनं यापूर्वी घर जसं चालत आलं होतं तसंच तें आतांही चालत होतं. वहिनी त्याच्याकडे तक्रार करीत नव्हती—त्याला प्रश्न करीत नव्हती—आणि उत्तराची अपेक्षाही त्याच्याकडून करीत नव्हती. इतर कोणत्याही ' गृहस्थ ' माणसाप्रमाणें तो ' घरचा पाहुणा ' होता. इतर कुणाही गृहस्थाप्रमाणें घरीं काय चालत असे याची त्यालाही दाद नसे. आमच्या या संसारांत मीच काय तो एक मुलखावेगळा होतों. कर्तेपणाची योग्यता आली असूनही घरबशा होऊन राहिलों होतों, म्हणूनच मला हें जाणवत होतं—दादाला कांहींच जाणवत नव्हतं, ही खूणगांठ बांधून मी स्वस्थ बसलों.

वहिनी नुसती ज्वालामुखीसारखी धुमसत होती. हा थंडा पर्वत केव्हांतरी भडकणार असं मला पदोपदीं वाटत होतं—शेवटीं तेंच खरं झालं.

एके दिवशीं वहिनीनं जाऊन अशाच एका सभेंत ज्वलज्जहाल भाषण केलं. दादाचा माणूस नित्याप्रमाणं रिपोर्ट घ्यायला आला होता. त्याची बिचाऱ्याची मला कींव आली. सभा संपतांच त्यानं मला गांठलं. तो म्हणाला, " आतां मी काय करूं बाळासाहेब ? वहिनीसाहेबांनीं असा हा तोंडाचा पट्टा सोडला. सारीं माणसं त्यांना ओळखतात. मीं कांहींतरी लिहून पाठवलं तर कुणीतरी चुगली करायचा अन् शेवटीं माझी नोकरी जायची. आतां तुम्हीच सांगा, मी काय करूं ? "

" मी काय सांगूं ? " मीं म्हटलं, " मी कांहीं हल्लीं हें काम करीत नाहीं. मी तुमच्या जागीं असतों तर खरा खरा रिपोर्ट देऊन मोकळा झालों असतों. मग तिकडे ते दादा आहेत आणि तें भाषण आहे. त्यांचं ते पाहून घेतील." असं म्हणून मीं तिथून पाय काढला.

तो माणूस मला गांठायचा प्रयत्न करीत होता पण झपाझप पावलं उचलीत मी घरीं येऊन पोहोचलों. अजून वहिनी घरीं आली नव्हती. व्याख्यान संपल्यावर बऱ्याच माणसांनीं तिला घेरल्याचं मला दिसून आलं होतं. त्या माणसांबरोबर चर्चा करीत ती कदाचित मागं राहिली असावी.

माझं मन उद्विग्न झालं होतं. झालेली हकीकत दादाला कळणार यांत शंकाच नव्हती. पण त्याचा परिणाम काय होणार याचीच मला चिंता लागून राहिली होती.

वराच वेळ वहिनी आली नाहीं म्हणून तिला शोधण्यासाठीं मी घराबाहेर पडलों व्याख्यानाच्या जागीं आलों तों जमलेल्या मंडळींची पांगापांग झाली होती असं मला दिसून आलं. मुंबईहून आलेले प्रमुख व्याख्याते ज्या ठिकाणीं उतरले होते तिथं गेलों. तेही अजून घरीं येऊन पोहोंचले नव्हते.

पुन्हां घरीं जावं म्हणून निघालों तों वाटेंत कुणी ना कुणी तरी ओळखी अनोळखी माणूस रस्त्यांत थांबवून मला विचारीत होता. प्रत्येकाला कांहीं ना कांहीं उडवाउडवीचीं उत्तरं देतां देतां माझा जीव बेजार झाला होता. प्रत्येक जण वहिनीची तारीफ करीत होता. हें झाकलं माणिक इतके दिवस आपल्या गावांत असतां अजून आपल्याला पत्ता लागला नाहीं, म्हणून प्रत्येक कळकळीचा कॉंग्रेसवाला आश्चर्याचे उद्‌गार काढीत होता. पण हें झाकलं माणिक आजवर एका सरकारी अधिकाऱ्याच्या घरांतच झांकून पडलं होतं, ही गोष्ट कुणीच ध्यानीं घेत नव्हतं. किंबहुना बुद्ध्याच ते तिकडे दुर्लक्ष करीत होते.

घरीं येऊन पोहोंचायला बरीच रात्र झाली. उशीर झाला म्हणून वहिनी रागं भरेल या भीतीनं हळुच घरांत शिरत होतों, तोंच दादा आणि वहिनी बोलत असल्याचा आवाज कानीं आला. मी तिथंच थबकलों. माझी छाती धडधडत होती. आरडाओरडा करायचा दादाचा स्वभाव नव्हता. तेव्हां त्या दोघांचं भांडण जुंपेल असं वाटायलाच नको होतं. जें भाषण मला बाहेरून ऐकूं येत होतं त्यावरून प्रकरण विकोपाला गेलं नाहीं असं मला दिसलं.

आंत येऊन पहातों तों दादा आणि वहिनी अगदीं खेळीमेळीनं बोलत होतीं. विषय व्याख्यानाचाच होता. दोघेंही त्या विषयाची चर्चा करीत होतीं. मी पुन्हां थक्क झालों.

मला पहातांच दादा म्हणाला, " काय बाळू, कसं काय झालं आजचं व्याख्यान ? रिपोर्ट घेतलाच असशील तुझ्या वर्तमानपत्रासाठीं ? हिच्या भाषणाचासुद्धां घेतला आहेस ना ? "

" हो. साधारण टांचणं केलीं आहेत, " मी चांचरत म्हटलं, " फार छान बोलली आज वहिनी. "

" प्रत्येक जण मला आज हेंच सांगत होता. " दादा म्हणाला, " तोंड फाटेपर्यंत हिची स्तुति करीत होते सारे लोक. अन् माझंच अभिनंदन करीत होते—जसा कांहीं मीच बोललों होतों ! अशी आहे ही गम्मत ! "

दादानं धोरण काय आंखलं होतं याचा मला अंदाज येईना. मी आपल्याशींच घुटमळत होतों तोंच दादा म्हणाला, " पाहूं तीं तुझीं टाचणं. "

" त्यावरून कांहीं कळायचं नाहीं, " मीं म्हटलं, " मी मोडींत लिहून घेत असतों—आणि तें सुद्धां घाईघाईनं. जेवल्यावर नक्कल करतों नि मग दाखवतों—" असं म्हणून मी एकदम काढता पाय घेतला.

तेवढ्या वेळांत वहिनी कांहीं बोलली नव्हती. मी निघून गेल्यावर त्यांचं भाषण पुन्हां सुरू झालं. पण तें कान लावून ऐकण्याचा मीं प्रयत्न केला नाहीं.

त्या भाषणाबद्दल त्या दिवशींच्या वक्त्यावर खटला भरण्यांत आला. त्या खटल्यांत वहिनीच्या भाषणाचा उल्लेख कुठंच आला नाहीं. त्या बिचाऱ्याला शिक्षा झाली आणि त्याच्यापेक्षांही जहाल भाषण करणारी वहिनी मात्र सहीसलामत निसटून गेली. दादानं कसली कारवायी लढवली ती त्याची त्यालाच माहीत.

या खटल्यांत आपण गुंतून जाणार अशी वहिनीची अटकळ होती. पण तसं कांहीं न झाल्यामुळं ती फार अस्वस्थ झाली. या प्रकरणीं दादानं तिला कोणत्या प्रकारं वाग-वलं तें मला कळणं शक्य नव्हतं. तिचं नावं वगळण्यांत आलं तें तिच्या संमतीनं कीं दादाच्या इच्छेनं, याचाही मला पत्ता लागला नव्हता.

त्या वक्त्याला शिक्षा झाल्याची बातमी वर्तमानपत्रांतून येईपर्यंत चालत असलेल्या खटल्याची मला आणि वहिनीला दाद लागली नव्हती. मॅजिस्ट्रेटसाहेब फिरतीवर अस-ल्यामुळं खटला कुठंतरी बाहेरच्या खेड्यांत चालला आणि म्हणूनच आम्हांला कांहीं कळलं नाहीं. खटल्याचा निकाल ऐकला तेव्हां वहिनी म्हणाली, " भाग्यवान् बिचारा ! असं असतं हें—कांहीं माणसांचं दुर्भाग्यच असं असतं कीं खाईत म्हणून उडी घ्यायला जावं तों तिथं मखमली गालीचा पुढं येतो ! एकूण काय, हें भाग्य कांहीं माझ्या नशिबीं नव्हतं. "

या खटल्याच्या बाबतींत दादानं घरीं एक चकार शब्द देखील काढला नाहीं.

अशा प्रकारें वहिनीची तंबी फुकट गेली. मीं तसं म्हटलं तेव्हां वहिनी म्हणाली, " एवढ्यानंच कांहीं झालं नाहीं. अजूनही वेळ आहे ! अजूनही संधि आहे ! "





ऑक्टोबरच्या सुटींत उषा आली. येण्यापूर्वी तिनं वहिनीला कांहीं कळवलं नव्हतं. हें तिचं येणं दादाला मात्र अनपेक्षित नव्हतं असा मला संशय आला. ती आल्याबद्दल त्यानं आश्चर्य प्रकट केलं नाहीं.

पुन्हां आमचं घरचं वातावरण बिघडूं लागेल कीं काय असं मला वाटूं लागलं. नुसत्या बातमीदाराच्या क्षेत्रापलीकडे जाऊन मी आतां वाङ्मयाच्या दालनांत प्रवेश केला होता. मधून मधून माझी एकादी लघुकथा, प्रचलित विषयावरील माझा एकाद-दुसरा लेख नाणावलेल्या साप्ताहिकांतून प्रसिद्ध होऊं लागला होता. लोक मला 'साहित्यिक' म्हणूं लागले होते. गावांतल्या वाङ्मयमंडळाचा मी उपाध्यक्ष होऊं शकलों होतों, हें सांगितलं म्हणजे माझा दर्जा किती वाढला होता याची कल्पना येईल.

त्या दिवशीं वाङ्मयमंडळाची सभा संपवून मी घरीं आलों तेव्हां उषा म्हणाली, "हें पहा बळवंतराव—(आतां तिच्या हिशेबीं मी 'बळवंतराव' झालों होतों, 'बाळाभाऊ' राहिलों नव्हतों!) तुम्ही आपल्या त्या लघुकथाच लिहा. इतर विषयांत उगीच लुडबुड करूं नका. राजकारण म्हणजे सोपी गोष्ट नव्हे. दैनिकाचा बातमीदार होऊन कांहीं राजकारण येत नसतं!"

"मी तरी काय करूं?" मी म्हटलं, "लिहायची हुक्की येते म्हणून कांहींतरी लिहितों. सहज एकदां पाठवलं—प्रसिद्ध झालं. पुन्हां पाठवलं—पुन्हां प्रसिद्ध झालं. आतां लागली चटक. जें लिहून पाठवतों तें प्रसिद्ध करतात. मग मीं कां लिहूं नये?"

"तें खरं," उषा म्हणाली, "त्यांना काय, पानं भरून काढायचीं असतात. पण आपण जें कांहीं लिहितों तें किती साधार असतं हें आपलं आपण पाहिलं पाहिजे. परवां तुम्हीं १९३५ च्या राज्यघटनेसंबंधीं लिहिलंत—"

"कां? कांहीं चुकलं होतं का त्यांत?"

"नाहीं. तसं चुकलं नव्हतं; पण मतं चुकलीं होतीं. राज्यकारभाराचा मक्ता कांहीं

काँग्रेसलाच दिलेला नाहीं. पहिल्यापासून या घटनेला काँग्रेस विरोध करते आहे. अन् आतां काँग्रेसनं अधिकार हातीं घ्यावा असं म्हणण्यांत काय अर्थ आहे ? ”

“ तर कुणी घ्यावा तो अधिकार ? मवाळांनीं ? लोकांचा विश्वास आहे का त्यांच्यावर ? तुम्हीं समाजवादी लोक विश्वास टाकाल का त्यांच्यावर ? ”

“ आमचा विश्वास कुणावरच नाहीं. काँग्रेसवर तर नाहींच नाहीं. आम्हांला कामकरी शेतकऱ्यांचं राज्य हवं आहे—”

“ तें मिळेपर्यंत तुम्हीं स्वस्थ बसणार का ? ”

“ अर्थात् नाहीं. संपूर्ण क्रांती होईपर्यंत आम्हीं सारखे प्रचार करीत राहणार. वर्गकलहाचं तत्व साऱ्या जनतेला समजावून देणार. दोन वर्गातला हा जो संघर्ष आहे त्याची पुरेपूर जाणीव झाल्याशिवाय व्यावहारिक राजकारण सुरू करतां यायचं नाहीं. ”

“ पण आज जी राज्यघटना पदरांत पडली आहे तिचं काय ? ती कुणीतरी राबवली पाहिजेच ना ? ती राबवायची कुणी हा आजचा प्रश्न आहे. ”

“ ती राज्यघटना आम्हांला नको आहे. केव्हांच आम्हीं ती धिक्कारून टाकली आहे. ही राज्यघटना राबवली तर तींतून श्रमजीवी वर्गाच्या कल्याणाची एकही गोष्ट निष्पन्न व्हायची नाहीं. ”

“ श्रमजीवी म्हणजे काय ? ” वहिनी मधेंच म्हणाली.

“ आतां काय सांगावं ! ” उषा उद्गारली, “ अन् ही मराठी घेऊन बी. ए. झाली आहे म्हणे ! ”

“ महानुभावांच्या वाङ्मयापासून तों हरिभाऊ-वामनराव जोशी यांच्या कालापर्यंतचं वाङ्मय मीं वाचलं आहे. त्यांत हा शब्द कुठंच दिसत नाहीं. ”

“ श्रमजीवी म्हणजे ‘ वर्कर ’ ! ” उषा म्हणाली.

“ कसला वर्कर ? ” वहिनीनं विचारलं, “ तुमचा विरोध आहे तो पांढरपेशा वर्गाला—भांडवलवाल्यांचा वर्ग—बुर्ज्वा कीं कांहींसं म्हणतां ना तुम्हीं त्यांना—ते बुर्ज्वा लोक कांहींच का श्रम करीत नाहींत ? ऑफिसांतले कारकून काय आयतोबा असतात ? भांडवलवाले व्यापारी काय आ वासून बसलेले असतात ?—हातपाय हालवल्याशिवाय का त्यांच्या घरांत पैशाचा पाऊस पडतो ? कारकून घ्या—भटजी घ्या—शेटजी घ्या—प्रत्येकजण जगण्यासाठीं कांहीं ना कांहीं श्रम करतोच आहे. मजूर म्हटलं तर काय

बिघडलं ? ' मजूर ' या शब्दामागं. जी भावना आहे ती ' श्रमजीवी ' या शब्दामागं नाहीं. श्रमजीवीसारखे प्रतिष्ठित शब्द प्रचारांत आणण्याची वृत्ति हीच बूर्ज्वा वृत्ति ! "

" तें तुला कळायचं नाहीं. " उषा चिडीला येऊन म्हणाली, " नव्या तत्वज्ञानामुळं जीं नवीं आंदोलनं सुरू झालीं आहेत, ज्या नव्या जाणिवा त्यांतून उत्पन्न झाल्या आहेत, त्यांच्यासाठीं ही नवी परिभाषा हवीच. पूर्वी प्रचारांत असलेल्या जुन्या शब्दांमुळं जी जुनेपणाची जाणीव होते, ती आम्हांला नको आहे. "

" हें नुसतं वेड आहे, " वहिनी उद्गारली, " स्वतःची अवास्तव प्रतिष्ठा माजवण्यासाठीं तुम्हां लोकांनीं बनवलेलं हें नुसतं ढोंग आहे. जुन्या शब्दामागल्या जुन्या भावना कधींही नाहींशा व्हायच्या नाहींत. मजूराला मजूर म्हणणं तुम्हाला कमीपणाचं वाटतं, हाच तुमचा पांढरपेशेपणा ! प्रत्यक्ष आंगमेहनतीचीं कामं केल्याशिवाय नसांनसांतून खेळलेला हा पांढरपेशेपणा नाहींसा व्हायचा नाहीं. पांढरपेशाच्या नजरेनं तुम्हीं मजुरांकडे पाहतां, म्हणून तुम्हीं त्यांना श्रमजीवी म्हणतां. मजूर म्हणवून घ्यायला मजुरांना मुळींच लाचारी वाटत नाहीं. उगीच कां हा तुमचा पांढरपेशेपणा त्या बिचाऱ्या मजुरांवर लादतां ? "

" पोलिस शिपायाच्या बायकोला जागतिक राजकारणाचं बीज कळायचं नाहीं. " उषा चिडून म्हणाली, " तूं कशाला आमच्या चर्चेत तोंड घातलंस ? मी बोलत होतें बळवंतरावांबरोबर—"

" बाळाभाऊचे बळवंतराव झाले, ही सुद्धां तुझी बूर्ज्वा वृत्ति–" खवचटपणानं वहिनी म्हणाली.

उषा चिडली आणि एक शब्द सुद्धां न बोलतां रागानं पाय आपटीत तिथून निघून गेली.

" अशी आहे ही गंमत ! " वहिनी मला म्हणाली, " कोणत्याही पक्षाचा खुळा अभिमान धरला म्हणजे माणूस असा हटवादी बनतो. मग बुद्धिवाद पटत नाहीं त्याला ! " मी कांहींच बोलत नाहीं असं पाहून वहिनी पुन्हां म्हणाली, " साहजिक आहे—उषेला नांव ठेवलेलं तुम्हांला खपायचं नाहीं ! "

" हें पहा वहिनी, " मी शांतपणें म्हणालों, " उगीच कांहींतरी अंदाज बांधूं नकोस. मी माझी लायकी ओळखतों. माझी लायकी काय आहे हें माझ्यापेक्षां जास्त चांगलं ओळखते ही उषा. भलतीच हांव धरून बसण्याइतका मी मूर्ख नाहीं. "

" हें आपलं नुसतं बोलायचं म्हणून बोलतां," वहिनी म्हणाली, " उषा आली त्या दिवशीं तुमचा चेहरा कसा खुलला होता तें मी पाहिलं नाहीं कीं काय ? "

" खुलला असेलही ! " मीं म्हटलं, " पण चेहरा खुलायला अनेक कारणं असतात हें तूं ध्यानांत घेत नाहींस वहिनी. उषा ज्या दिवशीं आली—"

" अजून माझ्याच गोष्टी चालल्या आहेत वाटतं ? " उषा पुन्हां आंत येऊन म्हणाली, " हें पहा सुलूताई, मी इथं आलें आहें ती विश्रांतीसाठीं. आधीं अभ्यासापायीं दगदगलेली मी–त्यांतून तीं आमचीं स्टडीसर्कल्स्—त्यातल्या त्यांत कांहींना कांहीं तरी सोशल वर्कचा लकडा असतोच माझ्यामागं—एव्हांपासून ती संवय पाहिजे आहे ना ?—त्या साऱ्या दगदगीला कंटाळून मी इथं आलें. इथं तरी ते वादविवाद नकोत. आमच्या स्टडी-सर्कल्समधें सुद्धां वादविवाद असतात पण त्यांत हें तुझ्यासारखं विरोधी माणूस नसतं कुणी. वाद असतात ते आमच्या तत्वज्ञानाचे—त्यांतल्याच बारीकसारीक भेदांचे—ते पत्करतात. हा विरोध मला आवडत नाहीं. अन् विरोधी माणसाला तोंड द्यायची मला संवयही नाहीं. कळलं ?

" कळलं ! " वहिनी म्हणाली, " चांगलं कळलं कीं, हा तुझा खेळ आहे, अभ्यास नव्हे. स्वतःच्या ज्ञानाची कसोटी लावण्यासाठीं विरोधाला तोंड द्यायची अभ्यासू माणसाला आवड असते. स्वतःचं मत किती मजबूत झालं आहे तें कळायला विरोधाची जरूरी असते. असल्या या विरोधामुळंच बुद्धीला विकास येतो. तुम्हां विरोध—विकासवादी लोकांनीं तरी विरोधाला भिऊन चालायचं नाहीं. नाहींतर आहेतच आमचे हे भावजी—तूं पुराण सांग अन् म्हाताऱ्या विधवेसारखे बसतील हे ऐकत. "

" हो, हो खरं आहे तें, " उषा उद्गारली, " असलींच माणसं मला आवडतात–"

" आतां ऐका भावजी ! " असं म्हणून वहिनीनं मला डोळा घातला. कांहींच न कळल्याचा आव आणून मी गंभीर होऊन बसलों होतों.

" हो, हो मी पुन्हां सांगतें, " उषा म्हणाली, " मला असलींच माणसं आवडतात. असल्याच माणसांचा सहवास मला आवडतो. भाविक श्रोता पाहिजे आहे मला—बोधामृताचे डोज पाजणारा तुझ्यासारखा गुरुजी नको आहे. समजलं ?

" किती फरक झालाय तुझ्यांत हा उषे ! " वहिनी वात्सल्यानें म्हणाली, " पूर्वीं किती सालस होता तुझा स्वभाव–किती अभ्यासू होतीस–वाचनाची तुझी आवड पाहून मला मोठा आनंद होई. हातीं पडेल तें पुस्तक त्यावेळीं तूं वाचीस होतीस. मला वाटतं

आतां तुझं वाचन अगदीं एकांगी झालंय. कांहीं वाचतेस कीं नुसतीच बोलत असतेस याचाच मला प्रश्न पडलाय."

"हें पहा ताई," उषा म्हणाली, "वडिलकीचा हक्क गाजवायची तुझी संवय मी पूर्वी चालूं देत होतें—तीच संवय होती मला. तुझं लग्न झाल्यापासून ती संवय सुटली. आतां त्या घरांत मीच वडील आहें—समजलीस ?—मीच वडील आहें. त्या तुझ्या वडिलकीची जागा मीं घेतली आहे. यापुढं तुझा तो पूर्वीचा जोर मी चालूं द्यायचो नाहीं."

हात जोडून उभा राहून मीं म्हटलं, "कृपा करा बायांनों, आतां अशा भांडूं नका. माझा गरीबाचा जीव गुदमरून जातो या भांडणांमुळं. रोज तुम्हांला असंच भांडायचं असेल तर मला तसं सांगा, मी असाच कुठंतरी हवापालट करून येईन. तुम्हांला स्वच्छ सांगतों, भांडणाची मला संवय नाहीं. भांडणामुळं माझा जीव कासावीस होतो. खटकाखटकी पाहिली कीं माझा थरकांप होतो. मी नुसता श्रोता आहें खरा पण शांततेच्या काळचा श्रोता आहें. एवढं ध्यानांत घ्या आणि मला संभाळून घ्या !"

माझं तें सोंग पाहून वहिनी सारखी हंसत सुटली. उषा मात्र गंभीर होऊन बसून राहिली होती. मी तिच्याकडे वळून म्हणालों, "असं पहा उषाताई, मी एक जिज्ञासू माणूस आहें. खेड्यापाड्यांतून वाढलेला असल्यामुळं तुमच्या या पुष्कळशा गोष्टी मला कळत नाहींत. मला शहरांत राहायचं आहे. तिथं वावरायचं आहे. शहरच्या राहाणीला अनुरूप होण्याइतकं ज्ञान मला मिळवायचं आहे. तुम्हांला काय बोलायचं असेल तें माझ्याकडे बोला आणि वहिनी,—" वहिनीकडे वळून मी हात जोडून म्हणालों, "आपल्या ज्ञानाचा फायदा उषाताई जेव्हां मला देत असेल तेव्हां कृपा करून तूं तिथं बसत जाऊं नकोस."

त्या दिवशीं ती बैठक तेवढ्यावरच थांबली.

त्या दिवसापासून वहिनी खरोखरच माझ्या वाटेला येईनाशी झाली. माझ्यासारखा श्रद्धाळू श्रोता मिळाल्यामुळं उषेला मोठं अवसान येत होतं. बरोबर आणलेलीं बरींचशीं पुस्तकं उषा मला वाचायला देत असे. मी तीं लौकर लौकर वाचीत असें आणि वाचून परत केलीं कीं उषा माझी परीक्षा घेत असे.

दादाला हल्लीं फार काम होतं. आमच्या बैठकींत बसायला त्याला क्वचितच वेळ मिळे. वहिनीनं एका प्रकारें आम्हां सर्वांना बहिष्कार घातला होता. पूर्वीप्रमाणें

दादाच्या सुखसोयीकडे देखील ती क्वचितच लक्ष पुरवीत असे. तें काम आतां उषेनं पत्करलं होतं. दादाच्या जेवणखाणाची व्यवस्था पहाण्यापासून तों त्याच्या बुटाला पॉलिश केलं आहे कीं नाहीं हें पाहण्यापर्यंत, प्रत्येक कामावर उषेची नजर असे.

वहिनी तिकडे ढुंकूनसुद्धां पहात नसे. तासाचे तास कांहींसुद्धां न करतां ती एकटीच आपल्या खोलींत इझीचेअरवर पडून रहात असे. तें पाहून माझ्या नाटकी-पणाचा मलाच कंटाळा आला.

एके दिवशीं मीं तिला म्हटलं, " असं काय झालंय तुला वहिनी ? कांहीं न करतां अशी पडून कां राहातेस ? " उषा त्या दिवशीं बाहेर गेली होती म्हणूनच मला वहिनीशीं बोलतां आलं.

" तर काय करूं ? " वहिनी म्हणाली, " तुम्हां लोकांना मी आवडत नाहीं, त्यांना कामापुढं फुरसत नाहीं, वाचीन म्हटलं तर पुस्तकं नाहींत, आत्त्याबाई जेवण करताहेत, इतर कामाला गडी आहेत, शिपाई आहेत. काय काम आहे मला ? सांगा—मीं काय करावं असं तुमचं म्हणणं आहे. "

" कांहीं तरी कर पण अशी स्वस्थ उदासवाणी बसून राहूं नकोस ! " मीं म्हटलं, " माझ्यानं तें पाहवत नाहीं. निदान बोलत तरी बैस. "

" कुणाबरोबर बोलूं ? " वहिनी चिरडीला आल्यासारखं करून म्हणाली, " उषेनं तें तसं सांगितलं आहे, तुम्हीं तिच्याबरोबर बोलत बसलेले असतां, हे घरीं झोपायला येतात हेंच भाग्य, मग बोलूं कुणाबरोबर ? आत्त्याबाईबरोबर ? गड्याबरोबर ? शिपायाबरोबर ? "

" तुला मूल झालं पाहिजे होतं—" मीं गंभीरपणानं म्हटलं, " म्हणजे तें घेऊन खेळवीत बसली असतीस . "

वहिनी नुसती केविलवाणी हंसली.

" आतां चार कुत्रींमांजरं तरी पाळ. तेवढाच विरंगुळा होईल तुला. "

" माणसांचं धार्जिणं नाहीं तिथं कुत्रींमांजरं पाळून तरी काय होणार आहे ? मनमोकळेपणानं बोलायला एक तुम्ही होतां, त्या तुमची गाडीसुद्धां आतां दुसऱ्या रुळावर गेलीय. कशाला माझ्या दुःखावर डागण्या देतां ? " बोलतां बोलतां तिच्या डोळ्याला टच्कन पाणी आलं. मीही गहिंवरलों.

वहिनीला उषेचा मत्सर वाटत होता का? मी उषेला खेळवीत होतों—बुद्धिपुरस्सर खेळवीत होतों. गेल्या खेपचा अनुभव माझ्यासमोर होता, दादापासून शक्य तेवढं करून तिला दूर ठेवावं हाच माझा उद्देश होता हें वहिनीला कळायला हवं होतं. सध्यां दादाला पूर्वीच्याइतकी फुरसत नसे खरी, पण तेवढ्यांतल्या तेवढ्यांत दादाशीं पुढं पुढं करण्यांत उषा जी तत्परता दाखवी, उषेच्या त्या लघळपणामुळं दादावर होत असलेला जो परिणाम मला दिसून येई, त्यामुळंच मी तिला अशी गुंतवून ठेवीत होतों. वहिनीचं तिचं पटलं नसतं. मीं तिला गुंतवून ठेवलं नसतं तर उषेनं रोज वहिनीशीं भांडणं केलीं असतीं. त्यावेळीं सारं कांहीं माझ्या मनांत आलं पण वहिनीला हें सांगायचं कसं? नुसता तिचा मत्सर वाटत असल्यामुळं माझ्या वागणुकींतली खोंच तिच्या ध्यानीं येत नव्हती अशी मला शंका आली.

या गोष्टी बोलून दाखवणं शक्य नव्हतं.—इष्ट नव्हतं. तिची तिलाच जाणीव होईपर्यंत कांहींच उक्त करायचं नाहीं असं ठरवून मीं म्हटलं, "थोड्या दिवसांसाठीं उषा इथं आली आहे. आतां लौकरच ती निघून जाईल. ती कांहीं ना कांहीं विषय काढून बोलत बसते. तो विषय तिला आवडता असतो पण तुला तो पटत नाहीं. हातीं चाकू घेऊं पहाणाऱ्या हटवादी मुलाला चकवण्यासाठीं जसा खुळखुळा त्याच्या हातीं देतात तसाच प्रकार मीं चालवला आहे याची मला क्षमा कर. यापेक्षां जास्त उघड करून बोलायला मला धीर होत नाहीं."

वहिनीला एकदम रडूं कोसळलं. कोणत्या भाषेनं तिचं सांत्वन करावं हेंच मला कळेना. ओलावलेल्या डोळ्यांनीं मी नुसता तिच्याकडे पहात राहिलों.

थोडा वेळ गेला. डोळे पुसून वहिनी म्हणाली, "भरल्या घरांत एकलकोंडं राहाण्याचा प्रसंग फार वाईट. कुणालाच आपली जरूरी नाहीं, सर्वांच्याच दृष्टीनं आपण एक अडगळ आहों असं वाटूं लागलं, कीं हाडामासाच्या माणसाचा जीव बेजार होतो. अगदीं कोंडमारा झाला आहे माझा. पुन्हां तरी एकादी सभा भरेल! अस्सं भाषण करीन—"

"हं, हं वहिनी," मीं एकदम म्हटलं, "असला कांहीं अविचार मनांत सुद्धां आणूं नकोस. त्यावेळचं होऊन गेलं—कशीतरी वेळ निभावली—आतां तसं कांहीं केलंस तर उगीच प्रकरण विकोपाला जाईल. त्या प्रकरणीं दादाला आंतून टपका आला आहे असं कुणीतरी मला सांगितलं. खरं असेल किंवा खोटंही असेल—पण तो प्रसंग पुन्हां

आला तर दादा हट्टाला पेटेल. तुला तुरुंगांत जावं लागेल—दादाच्या हस्तें तुरुंगांत जावं लागेल.—"

" तेंच हवंय मला ! " असं दांतओंठ खाऊन म्हणून वहिनीनं डोळे मिटले. जणूं काय तो सारा देखावा ती आपल्या झांकल्या दृष्टीपुढं आणून पहात होती.

" तेंच नको आहे मला ! " मी उद्गारलों, " बदनामी होईल साऱ्या जगभर ! "

" भेकड ! " वहिनी तिरसटून म्हणाली, " त्यांचेच भाऊ कीं नाहीं तुम्ही ! अन् म्हणे लेखक होणार—द्रष्टे होणार—जगाचे मार्गदर्शक होणार. नोकरीच्या अन्नावर वाढलेल्या माणसाची बुद्धि ही अशीच असायची ! "

" अन तूं ? " मीं म्हटलं, " तूं सुद्धां तेंच अन्न खाते आहेस. "

" हो—म्हणूनच अशी मुर्दाड झालेंय ! " वहिनी तिरस्कारानं म्हणाली, " आज या पिंजऱ्यांत अशी अडकून पडलें आहें. नाहींतर भराऱ्या मारल्या असत्या साऱ्या जगभर. उषेचा मला मत्सर वाटतो तो एवढ्यासाठींच. तिचीं मतं मला पटत नाहींत—पण ती कांहींतरी करते आहे—विद्यार्थी असूनसुद्धां कांहीं तरी करते आहे ! मुर्दाड अन्न खात माझ्यासारखी कुणा धनगराच्या कुरणांतली शेळी मेंढी होऊन पडलेली नाहीं !—" उद्वेगाच्या भरांत अवसान सुटून तिचे शब्द अडखळूं लागले. क्षणभर स्वस्थ राहून एक मोठा आंवढा गिळून ती म्हणाली, " माझ्याच तालमींत ती तयार झाली आहे. ती म्हणाली तें खोटं नव्हे—सारखी वडीलकी गाजवीत होतें मी तिच्यावर. मी नेऊन फिरवीत होतें तिला चोहींकडे. त्या सभा, त्या मिरवणुका, तें पिकेटिंग, ती सारी बिनदंग्याची दंगल—प्रत्येक ठिकाणीं मी तिला माझ्याबरोबर घेऊन जात असें. त्याचाच परिणाम झालाय तिच्यावर. तो परिणाम जायचा नाहीं. जन्माला खिळून राहाणार ती जाणीव. एक चूक झाली माझी—मी तिला स्वातंत्र्य दिलं नाहीं. हातीं धरून माझ्याबरोबर वागवलं. आतां तीच संवय लागलीय तिला. हात धरायला कुणीतरी वडील माणूस पाहिजे—कुणी तरी वरचढ पाहिजे. त्या संवयीमुळंच मला वाटतं, ती कुणीतरी वरचढ व्यक्तीच्या आहारीं गेली आहे अन् अशी झाली आहे. ती माझीच चूक मला भोंवते आहे. "

आम्हीं बोलत असतां उषा आली आणि तिच्या मागोमागच दादा आला. ती दोघें बरोबर आलीं, कीं दोन बाजूनं येणाऱ्या दोघांची दारांत गांठ पडली हें सांगणं कठीण होतं. मला मात्र वाटलं, कीं तीं दोघं बरोबर आलीं. ' कुठं गेली होतीस

उषा ? ' असं दादानं जेव्हां विचारलं तेव्हां तें ढोंग आहे असं माझ्याप्रमाणेंच वहिनीलाही वाटलं असावं.

कशाला ही लबाडी ? चोरी करायला इथं कांहीं कारण नव्हतं. घरांतली मुलगी, रस्त्यांत भेटली, ती बरोबर आली, तर त्यांत काय बिघडलं ? कुणातरी परक्याबरोबर आली असती तर गोष्ट निराळी होती. एकूण काय, दादाचा तो उद्गार मला कांहीं आवडला नाहीं.

कांहीं न बोलतां उषा आंत निघून गेली. खुर्चीवर बसून पायांतले बूट काढून बाजूला ठेवीत दादा म्हणाला, " तुला कळलं सुलू, आज एक खादीवाला आला आहे गावांत. उद्यां कदाचित् त्याची व्याख्यानं सुरू होतील. त्या माणसाचा आमच्याकडे आलेला इतिहास कांहीं चांगलासा नाहीं. तो खादीवाला आहे एवढ्यासाठींच त्याच्या सभेला जाशील, म्हणून तुला नुसती सूचना देऊन ठेवतों. " एवढंच बोलून दादा आंतल्या खोलींत निघून गेला.

दादा गेल्यावर वहिनीनं अर्थपूर्ण नजरेनं माझ्याकडे पाहिलं. मी विशेष कांहीं बोललों नाहीं. पण वहिनीचा मनोभाव माझ्या ध्यानीं आला.

दादा निघून गेल्यावर उषा आंत आली. बाहेर जातांना केलेले कपडे बदलून ती आली होती.

" काय, आज कुठं आहे मोर्चा ? " मीं तिला विचारलं.

" वाटेल तिथं–" उषा तिरसटून म्हणाली, " तुम्हांला कशाला पंचाईत ? मी कांहीं तुमची बायको नव्हें. "

" पण दादानं देखील तुला तेंच विचारलं ? " मीं म्हटलं.

" अन् मीही त्यांना उत्तर दिलं नाहीं. " उषा म्हणाली.

" हो खरंच, " मीं म्हटलं, " तें माझ्या ध्यानांतच आलं नाहीं. वहिनी कुठं बाहेर गेली तर दादा कांहीं तिला विचारीत नाहीं—विचारलं तर मीच विचारतों—तसं मीं तुम्हांला विचारलं. इथं नवराबायकोचं नातं आलं कुठं ? "

" माफ करा, " उषा म्हणाली, " मीं तसं उत्तर दिलं याचं मला आतां वाईट वाटतं. कांहींतरी कल्पना घोळत होत्या डोक्यांत—भंडावल्यासारखी झालें होतें—तेव्हां गेलें बोलून कांहींतरी. माफ करा हं. "

मी आश्चर्यचकीत झालों. एकदम हिची लहर कशी फिरली ? कां एवढी काकुळतीला आली ? दादाचं नांव घेतलं म्हणून ? दादाबरोबरच ती आली हें माझ्या नजरेला आलं असं तर तिला वाटलं नाहीं ?

" हें बघ उषे," वहिनी म्हणाली, " असं एकदम डोकं पिकवूं नये. भावजी होते म्हणून ठीक. दुसरा कुणी असता तर त्यानं मनाला लावून घेतलं असतं. त्यांना असं म्हटलं असतंस तर त्यांनाही वाईट वाटलं असतं."

" पण त्यांना मीं मुळीं उत्तरच दिलं नाहीं ! " उषा पुन्हां चिडल्यासारखं करून म्हणाली.

" तेंही बरं केलं नाहींस." वहिनी म्हणाली, " विचारल्या प्रश्नाचं उत्तर द्यायला काय जातं ? "

उषेच्या चेहऱ्यावर हंसण्याची लकेर चट्कन येऊन निघून गेली. माझी खात्रा झाली, दादाबरोबरच गेली होती ती.

" रावसाहेबांना नाहीं कांहीं वाटायचं," उषा म्हणाली, " ते चांगलं ओळखतात मला."

" असं ? " वहिनी भुंवया वर चढवून म्हणाली, " मोठं आश्चर्य आहे. इतक्या थोड्या सहवासांत त्यांना तुझी ओळख पटली ? माझंच दुर्भाग्य म्हणायचं—माझीच ओळख अजून त्यांना पटत नाहीं."

उषा आतां उघड उघड हंसली आणि म्हणाली, " लग्नाच्या प्रत्येक बायकोला असंच वाटतं. माझ्याबरोबरच्या ज्या ज्या मुलींनीं लग्नं केलीं आहेत, त्या त्या हीच तक्रार करीत असतात. लग्नापूर्वी दोघंही कशीं कबुतरासारखीं घुमत असतात घुं घुं करीत ! अन लग्न होतांच कां हें असं होतं ?"

" लग्न झाल्याशिवाय तुला तें कळायचं नाहीं," वहिनी म्हणाली, " कल्पित कथानक वाचून आपण—पुरुष आणि बायका दोघंही—पहिल्यानं कांहींतरी आडाखे ठरवीत असतों. कांहीं तरी काल्पित कथा वाचलेल्या असतात. घर केलेलं नसतं, चोरून भेटी होत असतात, तोंपर्यंत त्या कल्पित कथांसारखंच आपलंसुद्धां चाललंय असं वाटतं. पण लग्न केलं, घर संसार थाटला, शिरावर जबाबदारी पडली, कीं सारं वातावरण बिघडतं. ज्यांनीं अनुभवलं आहे, त्यांचा हा अनुभव आधीं हिशेबीं घे ! तुलासुद्धां लग्न करायचं आहे—"

" कोण म्हणतं असं ? " उषा उद्गारली.

" मी म्हणतें, " वहिनी म्हणाली, " लहानपणापासून तुझी वृत्ति सारखी पडताळून पहात असलेली तुझी बहीण—मी म्हणतें. मला फसवतां यायचं नाहीं तुला. कदाचित् भावजी फसतील—"

" छे, छे, मुळींच नाहीं. " मीं मधेंच म्हणालों, " मी तर आशा धरून बसलोंय ! "

" कसली ? लग्नाची ? " वहिनीनं माझ्याकडे वळून म्हटलं, " हिनं दिली आहे वाटतं आशा ? "

मी उषेकडे पाहिलं. तिचा चेहरा निर्विकार होता. मीं म्हटलं, " ती कांहीं बोलली नाहीं, पण मीच आपला आशाळभुतासारखा वाट पहातोंय तिच्या होकाराची. "

" होकार नकार द्यायला कधीं विचारलं होतं का मला ? " तितक्याच निर्विकार मुद्रेनं उषा म्हणाली.

" कसं विचारूं ? " मीं वहिनीकडे पहात म्हटलं, " मनाला वाटलं तरी कांहीं अविचारानं बोलतां येत नाहीं. ही उद्यां बी. ए. होईल. मीं कॉलेजचं नुसतं तोंडसुद्धां पाहिलेलं नाहीं ! ही मुंबईची—शहरची, मी हा असा गांवढळ. कळूनसवरून कसं विचारूं ? "

" आतां हें विचारल्यासारखंच झालं आहे, " वहिनी उषेकडे वळून म्हणाली, " काय ग, आतां सांग ना. "

उषा हंसली आणि म्हणाली, " खरंच विचारते आहेस कीं माझी थट्टा करते आहेस ?—माझी नव्हे यांची—बळवंतरावांची. "

" त्यांनीं इतक्या जिव्हाळ्यानं विचारल्यावर मी कशी थट्टा करीन ? " वहिनी म्हणाली, " संसारांतला जोडीदार म्हणजे पत्त्यांच्या खेळांतला भिडू नव्हे. तो कांहीं जरूरी प्रमाणें वाटेल तेव्हां बदलतां यायचा नाहीं— "

" होय ना ? " उषेनं एकदां माझ्याकडे पाहून नंतर वहिनीकडे वळून म्हटलं, " एवढं कळतं ना तुला ? मग आतां मला स्पष्ट कां बोलायला लावतेस ? "

दोघीनांही चांगला दिसेल एवढा मोठा सुस्कारा टाकून मीं म्हटलं, " असंच उत्तर मिळेल असं मला वाटलं होतं. तरीही मी आशा सोडणार नाहीं. जबरदस्त आशावादी असणं हा मोठा गुण आहे, असं कुठल्याशा ग्रंथकारानं म्हटलं आहे—"

तितक्यांत दादा आंत आला आणि खुर्चीवर बसून बूट चढवीत चढवीत म्हणाला, " हें पहा, मला आतां गेलं पाहिजे. रात्रीं जेवायला येतां येईल कीं नाहीं याची खात्री नाहीं. थोडी पोळीभाजी ठेवून दे झांकून. अन् हें पहा बाळू, उद्यांच्या सभेचा रिपोर्ट घ्यायचं काम तुलाच करायला पाहिजे. मोबदला मिळेल तुला. आमचा तो रिपोर्टर जरा आजारी आहे. " असं म्हणून कुणाच्याही होकाराची अपेक्षा न करतां खाडखाड बूट वाजवीत दादा निघून गेला.

माझ्याकडे वळून वहिनी म्हणाली, " एकूण उद्यां तुमची कसोटी आहे, बरं का भावजी. "

" कां ? " मी अगदीं रुक्षपणें विचारलं.

" तें कळेल उद्यां ! " वहिनी म्हणाली आणि तशीच उठून घरांत गेली. वहिनीच्या उद्‌गाराचा माझ्या मनावर मोठा विलक्षण परिणाम झाला. दादाचा हा कांहींतरी डाव आहे, उद्यांच्या सभेंत वहिनीनं कांही बोलूं नये अशी तिला ही उपरोधिक सूचना आहे, असंच मला वाटलं.

माझी मुद्रा गंभीर झाल्याचं पाहून उषा मोठमोठ्यानं हंसली. मी आणखी अस्वस्थ झालों. दोघांनीं मिळून केलेला तर हा बेत नसेल ?





दुसऱ्या दिवशीं सभा झाली, वहिनी सभेला गेली, जें बोलायचं तें बोलली आणि मी त्या सर्वांचा रिपोर्टही घेतला. दादाकडे गेलेल्या रिपोर्टाबद्दल मला पैसे देऊन त्यानं माझ्याकडून पावती घेतली.

वर्तमानपत्राकडे जो रिपोर्ट पाठवला होता त्यांतील मुख्य वक्त्याचं भाषण तेवढं प्रसिद्ध झालं. अमुक, तमुक आणि सुलेखा हेगडे यांचीही भाषणें झालीं असा नुसता निर्देश तेवढा वर्तमानपत्रांत आला. मुख्य वक्त्याखेरीज बाकीच्या वक्त्यांच्या भाष-

णाचा मुळीं रिपोर्टच न आल्यामुळं, वहिनीचं भाषण जहाल होतं म्हणून तें द्यायचं संपादकानं टाळलं कीं इतरांच्या भाषणांचं त्यांना महत्वच वाटलं नाहीं, याची कल्पना मला आली नाहीं.

वहिनीच्या भाषणाचा माझा रिपोर्ट यथातथ्य होता. तो वाचल्यानंतर दादा वहिनीला कांहीं बोलला कीं नाहीं हें मला कळायला मार्ग नव्हता. माझ्यासमोर असं तो काहींच बोलला नाहीं.

उषा मात्र बोलली. पण दादा त्यावेळीं हजर नव्हता. ती म्हणाली, "काय बोललीस तें. माणसानं कडक बोलावं—नाहीं असं नाहीं—पण या तुझ्या बोलण्याला कांहीं धरबंदच नव्हता. तोंडाला येत होतं तें भकत सुटली होतीस. ते तुमचे कोणी देव कीं दगड आले होते, त्यांचं बोलणं काय अगदीं मिळमिळीत होतं ? पण ते कसे प्रत्येक शब्द तोलून मापून बोलत होते ! हा तुझा अविचार एक दिवशीं रावसाहेबांना भोंवेल मात्र !"

"त्यांचा काय संबंध ?" वहिनी म्हणाली, "माझी मी जबाबदार आहें. नवऱ्याचीं आणि बायकोचीं मनं एकच असलीं पाहिजेत असा कांहीं कुठं कायदा नाहीं. कुणी सांगावं, त्यांचीं मतंसुद्धां कदाचित् माझ्यासारखींच असतील. सरकारी नोकर असल्यामुळं ते कदाचित् बोलून दाखवीत नसतील. ज्याला म्हणून कांहीं थोडी बुद्धि आहे, थोडं काळीज आहे, परिस्थितीची जाणीव आहे, त्याचीं मतं यापेक्षां निराळीं असणं शक्य नाहीं. एखाद्या विशिष्ट पक्षाच्या अभिमानानं विषयप्रतिपादनाची परि-भाषा इकडे तिकडे थोडीशी बदलत असली, तरी हिंदी म्हणवणाऱ्या प्रत्येक माणसाचं अंतरंग, मी बोललें त्यापेक्षां निराळी भाषा बोलेल असं मला केव्हांही वाटायचं नाहीं."

"अगदीं पुरवी थाट आणलास ताई," उषा हंसून म्हणाली, "तुझा टोमणा मला कळला. कम्युनिस्टांकडे माझा ओढा आहे हें कांहीं मी नाकबूल करीत नाहीं. आमचे कितीतरी कम्युनिस्ट तुरुगांत गेले आहेत, जात आहेत, जाऊन आले आहेत, आणि यापुढंही जातील. बायकासुद्धां आहेत त्यांत. उद्यां त्या पक्षांत मी गेलें तर मलाही कदाचित् तुरुंगांत जावं लागेल. पण तुझं आजचं भाषण मात्र बाव-दूक होतं–आचरट होतं—म्हणूनच कदाचित् तुरुंग गाठावा लागेल. तुला मी बोललें ती एवढ्यासाठींच, कीं तुझ्या आचरटपणाची झळ रावसाहेबांना लागतां कामा नये."

"कां लागूं नये ?" वहिनी म्हणाली, "मला ते पहायला आले होते त्यावेळीं

नखशिखांत खादी होती माझ्या अंगावर. तेवढ्यावरून त्यांना कळायला पाहिजे होतं. संपूर्ण खादी वापरणारे पुरुष बरेच आहेत आपल्यांत—पण संपूर्ण खादी वापरणाऱ्या बायका मात्र अगदींच विरळा ! त्या विरळा बायकांतली मी एक, हें त्यांना कळायला हवं होतं. कळून सवरून त्यांनीं माझ्याशीं लग्न केलं, हें कदाचित तुला माहीत नसेल—"

" पण लग्न होतांच तूं आपला पोषाख बदललास ! " उषा म्हणाली, " पोषाख बदलला तेव्हां वृत्तीही बदलली असं त्यांना कां वाटूं नये ? "

" अवश्य तसं वाटावं,—" वहिनी म्हणाली, " पण तें लग्न झाल्यानंतर ! लग्न व्हायच्या पूर्वीं मी जशी होतें तशी असतांनाच त्यांनीं मला पत्करलं होतं. त्यांना वाटलं होतं, कीं लग्न झाल्यावर मी बदलेन—वठणीला येईन—आणि तसं झालं असं जेव्हां त्यानीं पाहिलं तेव्हां त्यांना आपला हा जय झाला असंही वाटलं असेल. हंः ! किती आशाळभूत असतो माणूस ! स्वतःबद्दल किती गैरसमज होत असतो कुणाकुणाचा ! बाहेरचा पोषाख बदलला तरी अंतरंग बदलत नाहीं. सर्वांनाच कळत नाहीं हें. लबाड आणि स्वार्थसाधू माणसं खादी घालून कॉंग्रेसच्या गोटांत शिरलींच आहेत कीं नाहीं ! उलटपक्षीं मी तशी असेन असं कां वाटलं नाहीं यानां ? "

उषा उगीच राहिली. बराच वेळ कुणीच कांहीं बोललं नाही.

तो विषय तेवढाच राहिला. इकडल्या तिकडल्या इतर गोष्टी निघाल्या असं पाहून मीही उठून तिथून निघून गेलों.

दादाच्या वृत्तींत कांहींच फरक झाला नव्हता. आमच्या समोर तरी त्यानं त्या बाबतींत कधीं कांहीं बोलणं केलं नाहीं. प्रकरण तिथंच संपलं असं मला वाटलं.

रजा संपल्यामुळं उषा निघून गेली. आमचा संसार सुरळीतपणें चालला होता. कुठंच कांहीं व्यंग नव्हतं. पण हीं शांतता वादळापूर्वींची होती याची मला कल्पना नव्हती.

एके दिवशीं घरीं रोज येणारा पोलिस शिपाई वॉरंट घेऊन आला. तो ओळखीचाच असल्यामुळं तो आल्याचं मला कांहीं वाटलं नाहीं. वॉरंटाची गोष्ट कशी काढावी याची त्याला पंचाईत पडली होती. दादा त्यावेळीं गांवीं नव्हता. कुठल्यातरी दरवड्याच्या चौकशीसाठीं कुठल्याशा खेड्यांत गेला होता.

भीत भीत त्यानं वॉरंट मला दाखवलं. माझ्या काळजांत धस्स झालं. पायापासून मस्तकापर्यंत भिरभिरी आली. मी जवळ जवळ किंचाळलों, " वहिनी ! "

' काय झालं ! ' म्हणत ती धांवतच बाहेर आली. दुसरा कुणी असता तर पोलिस शिपाई पाहून घाबरला असता. आमच्या घरीं रोज पोलिस शिपायांची वर्दळ असल्यामुळं तिला कांहीं वाटलं नाहीं. थरथरत्या हातानं मीं वॉरंट तिच्या हातीं दिलं. तें वाचतांच ती आपल्याशींच हंसली आणि शिपायाला म्हणाली, " आत्तांच तुमच्या-बरोबर आलं पाहिजे का रामजीबुवा ? बिछाना, कपडे वगैरे कांही बरोबर घ्यायला हवेत का ? "

रामजीबुवा नुसता आ वासून पहातच राहिला. तेव्हां वहिनी पुन्हां म्हणाली, " एकटेच आलां आहांत का तुम्ही ? "

" जामिनबिमिन कांहीं—" असं कांहींतरी रामजीबुवा तोंडांतल्या तोंडांत पुटपुटला.

" कोण देणार जामिन ? " वहिनी हंसून म्हणाली, " ते गेले आहेत गांवीं. हें आहे वॉरंट. माझी स्वतःची कांहीं इथं कुणाशीं ओळख नाहीं. चला, जाऊं झालं ! " असं म्हणून ती आंत गेली.

मी ताठ होऊन बसलों होतों. माझं मस्तक सुन्न झालं होतं. विचार करण्याची शक्तीसुद्धां माझ्या मस्तकांतून नाहींशी झाली होती. कांहींतरी भयंकर प्रकार घडला आहे आणि आतां यापुढं आणखीही कांहींतरी भयंकर होणार आहे, एवढीच जाणीव कुठंतरी जागी होती.

बिचारा रामजीबुवा सुद्धां तसाच ताठ होऊन उभा होता. दिवसांतून दहावेळ जिच्यापुढं तो लवून मुजरा करीत आला होता, तिलाच आतां पकडून न्यावं लागणार असं वाटून का तो सुन्न झाला होता ? तो कांहींच बोलला नाहीं. मींही त्याला कांहीं विचारलं नाहीं.

वहिनी कपडे करून बाहेर आली तेव्हां मी सर्द झालों. तिची साडी खादीची होती, ब्लाऊज खादीचं होतं, बांधून घेतलेले कपडे खादीचे होते कीं काय कोण जाणे, पण ते ज्या रुमालांत बांधले होते तो रुमाल खादीचा होता. घाईघाईनं गुंडाळलेल्या वळकटींतून डोकावणारी चादर, पासोडीसुद्धां खादीचीच होती.

कुठून आणली तिनं ही खादी ? हा पूर्वीचा साज तिनं जपून ठेवला होता, कीं पुढल्या अपेक्षेनं आतां ही नवी तयारी केली होती ?

" बरं भावजी, येतें मी ! " माझ्याकडे वळून ती म्हणाली, " आतां केव्हां परत येणार आहें कोण जाणे ! घरावर नजर ठेवा अन् त्यांच्या व्यवस्थेकडे तुम्ही स्वतः जरा जास्त लक्ष द्या. "

" थांबा मी येतों—" असं मी म्हटलं तेव्हां ' कांहीं नको ' म्हणून हातांत बोचकं घेऊन ती वळकटीला हात घालीत होती, तोंच रामजीबुवानं वळकटी तिच्या हातांतून काढून घेतली.

दोघंही निघून गेलीं. झपाटल्यागत मी पहात राहिलों होतों. काय झालं तें माझं मलाच कळेना.

ती दृष्टीआड झाली तेव्हां माझं चित्त ठिकाणावर आलं. तिनं काय वाटेल तें सांगितलं पण तिच्याबरोबर न जाण्यांत मीं चूक केली असं आतां मला वाटूं लागलं.

पण मी जाऊन तरी काय करणार होतों ? मला तिथं कोण ओळखत होतं ? दादाची ती बायको असल्यामुळं तिथलीं माणसं तिची काळजी घेतील, कांहीं कमी पडूं देणार नाहींत, असा पोक्त विचार करून मी स्वस्थ राहिलों.

आतां दादाला कळवायचं ! मला वाटलं, त्याला काय कळवायचं ? त्याला कळणारच. त्याचींच माणसं तीं, तीं कशीं कळवल्याशिवाय राहतील ?

दुसरी एक शंका आली—दादा इथं नाहीं असं पाहून त्याच्या वाईटावर असलेल्या दुसऱ्या कुणातरी अधिकाऱ्यानं तर ही भानगड केली नसेल ? तसं असेल तर दादाला कळवायची जबाबदारी माझ्यावर येत होती. दादाच्या कचेरींत जावं असं माझ्या मनांत आलं. पण आत्याबाई घरांत नव्हत्या. त्या पुराणासाठीं देवळांत गेल्या होत्या. त्या येईपर्यंत थांबलों.

झालेली हकीकत आत्याबाईनीं ऐकली त्यावेळीं त्या मट्कन् खालीं बसल्या आणि रडूं लागल्या. सांत्वनाचे चार शब्द बोलून मी कपडे करून बाहेर पडलों.

दादाच्या कचेरींत यापूर्वी मी कधींच गेलों नव्हतों. कुणाकडे जावं, कुणाला विचारावं याचीच मला पंचाईत पडली. रोज घरीं येणाऱ्या शिपायांपैकीं एकजण भेटला. तो कुणातरी एका अधिकाऱ्याकडे मला घेऊन गेला. दादाला कळवायची व्यवस्था करतों, असं त्यानं आश्वासन दिलं तेव्हां घरीं निघून आलों.

दादाचं खातंच अशा प्रकारचं होतं, कीं त्यांतल्या माणसाचं मन कोणत्याही प्रसंगानं सहसा बावरून जात नाहीं. मी असं नुसतं ऐकत होतों—आतां त्याचा प्रत्यय आला. झाल्या प्रकाराचा दादाच्या मनावर यत्किंचितही परिणाम झाल्याचं मला दिसलं नाहीं. आल्याबरोबर त्यानं अगदा सहज विचारावं तसं विचारलं, " काय रे, घाबरली होती का ती ? "

" छे, छे. मुळींच नाहीं, " मीं म्हटलं, " उलट मीच घाबरलों. ती अगदी तयार होती जायला. जशी कांहीं वाटच पहात होती वॉरंटाची. "

माझं उत्तर न ऐकल्यंस करून दादा वर माडीवर जात होता त्याला अडवून मीं म्हटलं, " जरा थांब दादा. यांत मला नाहीं ना कुठं गुंतवणार ? "

" तें कांहीं माझ्या हातीं नाहीं. " माझ्याकडे न पाहतां दादा म्हणाला, " या केसमधें माझा कांहीं संबंध नाहीं—"

दादा एकदम निघून गेला.

काय हें माणसाचं मन ! दादा आला म्हणजे या बाबतींत काय करायचं तें ठरेल अशा कल्पनेनं मी वाट पहात राहिलेला–आतां तो आला आणि असा निघून गेला ! मी एवढा तळमळत होतों आणि दादाला— प्रत्यक्ष तिच्या नवऱ्याला—कांहींच का वाटत नव्हतं ?

दादा आल्यानंतर दोनतीन दिवसांत त्याची माझी मुळींच गांठ पडली नाहीं. तो केव्हांतरी येई आणि केव्हांतरी निघून जाई. क्वचित् जेवीतसुद्धां नसे घरीं. मला वाटलं, तो कांहींतरी खटपटींत असावा—वहिनीला सोडवायचा प्रयत्न करीत असावा. किती झालं तरी सरकारी माणूस. त्यांतून पोलिस खात्यांतला—गुपितं बाळगायची संवय जन्माला खिळलेली—म्हटलं, माझ्याकडे सुद्धां बोलत नसेल कांहीं !

कशीबशी जिवाची समजूत करून घेत होतों. मॅजिस्ट्रेटच्या कचेरीकडे जायची छाती होत नव्हती. जीव सारखा तळमळत होता. विचारायचं कुणाला ? मधून मधून घरीं शिपायी येत पण त्यांना सुद्धां विचारण्याची चोरी वाटे. प्रत्यक्ष भाऊ अधिकारी असतां शिपायांना विचारायचं कसं ?

घराबाहेर जायचंच मी हल्लीं बंद केलं होतं. कुणी कांहीं विचारलं तर त्याला उत्तर द्यायची पंचाईत झाली असती—आणि मग माझ्या पदरीं एक बावळेपणा आला असता किंवा बेमुर्वतपणा तरी आला असता.

उषेला पत्र लिहावं असं एकदां चट्‌कन मनांत आलं—पण तिचा पत्ता माहीत नव्हता. दादाला पत्ता विचारला तेव्हां तो म्हणाला, "तिला कशाला कळवतोस ? उगीच तिच्या अभ्यासांत व्यत्यय येईल. शिवाय मला तिचा पत्ताही नीटसा माहित नाहीं. एल्फिस्टन कॉलेजांत जाते वाटतं ती !" असं कांहींतरी तुटक बोलून दादा निघून गेला.

पत्ता माहीत नाहीं म्हणाला–आणि एलफिस्टन कॉलेजचा उल्लेख केला—तो कशाला केला ? कॉलेजच्या पत्त्यावर मी पत्र पाठवावं असा का त्याचा उद्देश होता ? प्रत्यक्ष कांहीं सांगायचं नाहीं, नुसतं सूचक बोलायचं ही पोलिस खात्याची हातोटी का ?

आणि म्हणे उद्यां कळेल आपोआप ! उद्यां म्हणजे केव्हां ? वहिनीला शिक्षा झाल्याची वर्तमानपत्रांत बातमी येईल तेव्हां ?

किती घट्ट काळीज असावं लागतं सरकारी माणसाचं ! मी तसा निढावलेला नव्हतों म्हणून असा तळमळत होतों. घरच्या घरीं वसल्या बसल्या माझा कोंडमारा होत होता. मनाशीं विचार करुन मी एकदाचं ठरवलं आणि कॉलेजच्या पत्त्यावर उषेला पत्र लिहिलं.

दुसरे दिवशी मला साक्षीचं समन्स लागलं. माझ्या काळजांत चर्र झालं. शेवटीं या लोकांनीं मला गुंतवलंच या खटल्यांत !

काय करावं हें कांहींच सुचेना. रिपोर्ट माझ्या हातचा होता. तो नाकबूल करणं शक्य नव्हतं. मोबदल्याचे पैसे घेऊन मी पावती दिली होती. कोर्टात जाऊन मी काय सांगूं ? वहिनीच्या विरुद्ध का साक्ष देऊं ?

नुसत्या भीतीमुळं आजपर्यंत मी कोर्टांत गेलों नव्हतों. आतां आपोआपच जाणं बंद झालं. साक्षीदार या नात्यानं कोर्टात हजर राहायला मला बंदी होती. नेमलेल्या तारखेला मला कोर्टात जावं लागत होतं खरं पण तिथं बाहेर बसावं लागे. असे दोन तीन दिवस गेले. इतर साक्षीदार असल्यामुळं मला उगीच बाहेर बसून राहावं लागे.

पहिल्यानंच माझी साक्ष कां घेऊन टाकली नाहीं ? कां माझा असा छळ चालला होता ? तसं पाहिलं तर माझीच साक्ष महत्वाची, त्या मलाच कां सर्वांच्या मागं ठेवण्यांत आलं ? ही योजना मुद्दामच केली होती का ?

आंत कोर्टाचं काम चालत असतांना बाहेर बसून राहाणं मला दुःसह होत होतं.

सारखीं ओळखीचीं माणसं भेटत होतीं. नाहीं नाहीं ते प्रश्न विचारून भंडावून सोडीत होतीं. त्यांना उत्तरं देतांना माझा जीव बेजार होत होता. वहिनीला केव्हां काय शिक्षा होईल ती होवो पण आज मला होत असलेली ही शिक्षा बेसुमार होती. प्रत्येक तासाला माझा जीव टेकीला येत होता.

शेवटीं एकदां माझ्या नांवाची हांक पडली. कठड्यांत जाऊन उभा राहिलों त्यावेळीं माझा जीव घामाघुम झाला होता. जीभ टाळ्याला चिकटली होती. नांव, वय, धंद्याच्या प्रश्नांतून कसाबसा पार पडलों. नंतर माझ्या हातचा रिपोर्ट मला दाखवण्यांत आला आणि तो मीच लिहिला असल्याचं मीं कबूल केलं.

नात्यागोत्याचे वगैरे कांहीं आडवेतिडवे प्रश्न विचारल्यावर माझी साक्ष संपली. पुढं आरोपीचा बचाव सुरू झाला.

आपण दोषी असल्याचं वहिनीनं कबूल केलं तें ऐकून मी थक्क झालों. दादानं वकील द्यायची व्यवस्था केली होती, पण बचाव देण्याचं तिनं स्वतःच नाकबूल केल्यामुळं त्याला स्वस्थ बसावं लागलं.

वहिनीला तीन महिन्यांच्या साध्या कैदेची शिक्षा सांगण्यांत आली.

तसं पाहिलं तर इतरांच्या मानानं ही शिक्षा मुळींच कडक नव्हती. दादाला तो धक्का बसला असावा असं मला वाटलं. त्या दिवशीं तो घरीं आला त्यावेळीं मुकाट्यानं जाऊन माडीवर बसला. तो जेवला नाहीं तसाच मीही जेवलों नाहीं.

माझं पत्र गेलं होतं तरीही उषा कांहीं आली नाहीं याचं मला आश्चर्य वाटलं. तिनं माझ्या पत्राचं उत्तरसुद्धां पाठवलं नाहीं. जिव्हाळ्याचा प्रश्न बाजूला ठेवला तरी हा सभ्यपणा झाला नाहीं असं मला वाटलं.

तिथल्या तुरुंगांतून वहिनीला दुसऱ्या तुरुंगांत पाठवण्यांत येणार आहे असं दादानं मला सहज सांगितलं म्हणून मी तिला भेटायला गेलों. जातांना मी कांहीं पुस्तकं बरोबर नेलीं होतीं.

जातांना मी भीतभीतच गेलों होतों. पण वहिनीची भेट होतांच माझी सारी भीति मावळून गेली. अगदीं हंसतमुखानं ती भेटायला आली होती. दादा तिला भेटायला गेला नव्हता असं मला तिथंच कळलं.

मीं वहिनीला विचारलं, "सुटल्यावर घरींच येणार आहेस ना?"

"अर्थात्!" वहिनी म्हणाली, "दुसऱ्या कुठं जाणार?"

मीं चांचरत चांचरत म्हटलं, " दादा तुला इथं भेटायलासुद्धां आला नाहीं. शिक्षा भोगून तूं परत येणार—तेव्हां म्हटलं—"

" मी घरींच येणार ! " वहिनी म्हणाली, " त्यांनीं घरांत घेतलं नाहीं तर पुढचं पुढं पहातां येईल. पण तसं व्हायचं नाहीं. माझी खात्री आहे, ते कांहीं इतके दुबळे नाहींत. "

जड पावलांनीं मी तुरुंगाबाहेर पडलों. मनांत विचारांचं सारखं काहूर उठलं होतं. भलभलत्या कल्पना मनांत येत होत्या. मी एक बेकार माणूस होतों. वडील भावाच्या कृपाछत्राखालीं मी राहिलों होतों. पुढं मी काय करणार याची आज मला कल्पना नव्हती. घरीं मला आधार होता तो वहिनीचा. तात्पुरता कां होईना, पण तो आधार तुटल्यामुळं दादाचं मन बदलेल कीं काय अशी मला शंका वाटूं लागली. तीन महिन्यांची मुदत म्हणजे फारशी मोठी नव्हती पण ती तीन युगांएवढी होणार असं मला वाटूं लागलं.

तसंच झालं. एकेक दिवस मला वर्षासारखा वाटत होता. वाचण्याकडे सुद्धां मन लागत नव्हतं. दुसरं काय करणार ? वाङ्मयमंडळांत खाजगी चर्चा होत असत तेवढाच काय तो जिवाला विरंगुळा.

तितक्यांत नाताळच्या सुट्टींत उषा आली. मला आश्चर्य वाटलं. मीं विचारलं तेव्हां ती म्हणाली, " येऊन मी काय करणार होतें ? पोलिस अधिकारी असलेला तिचा नवरा—त्याच्यापेक्षां मी जास्त काय करणार होतें ? पत्राचं उत्तर पाठवलं नाहीं म्हणून तुम्ही म्हणतां—उत्तरांत काय लिहायचं हाच प्रश्न होता;—तोंच शिक्षेची बातमी वर्तमानपत्रांत वाचली. तिनं बचावच केला नाहीं असं जेव्हां वाचलं तेव्हां आलें नाहीं तें बरंच केलं असं वाटलं. बचाव न करायचं हें कॉंग्रेसी वेड मला कांहीं पसंत नाहीं. शिवाय आपण दोषी असल्याचं कबूल केल्यावर बचाव तरी कसला करायचा ? मला वाटतं, चुकतं तें इथंच. भाषण कदाचित जहाल असेल पण तें वस्तुस्थितीला धरून होतं ना ? मग कां बचाव करूं नये ? रावसाहेबांनीं चांगला वकील दिला होता त्याचा कां फायदा घेऊं नये ? हीं असलीं खुळं मला मुळींच आवडत नाहींत. असल्या माणसांबद्दल सहानुभूति कसली बाळगायची ?—" बचाव न देण्याच्या तत्वाबद्दल ती कितीतरी बोलत होती पण तो तिचा बुद्धिवाद माझ्या कानांत शिरला नाहीं.

माझ्या मनःस्थितीशीं मी उषेची मनोवृत्ती पडताळून पाहूं लागलों. माझ्या भावना-

त्मक बुद्धिवादाला तिचं तें म्हणणं पटेना. तिचा बुद्धिवाद कोरडा होता—तार्किक होता—सहृदयतेच्या भावनेला तो पटण्याजोगा नव्हता—निदान मला तो पटत नव्हता.

दादा घरीं येतांच त्यानं मोठ्या हंसतमुखानं उषेचं स्वागत केलं हें पाहून सुद्धां मला आश्चर्य वाटलं. बोलत बोलत ती त्याच्यावरोबर माडीवर निघून गेली. मला वाटलं, काय हें !

वहिनी तुरुंगांत गेल्याबद्दल उषेला कांहींच का वाटलं नाहीं ? माझा जीव असा तळमळत होता आणि ही तर पाठची बहीण ! अगदीं हंसत खेळत ती गप्पा मारायला गेलेली पाहून मला मोठं चमत्कारिक वाटलं.

बराच वेळपर्यंत ती वर बोलत होती. मी सहसा कधीं वर जात नसें. आतां गेलों असतों तर मुद्दाम गेल्यासारखं वाटलं असतं. उषा काय बोलते तें ऐकण्याची मला जिज्ञासा होती, तरी मी मन आवरलं.

ती खालीं आली ती हंसतच आली. हंसत हंसतच तिनं मला वहिनीच्या खटल्याची हकीकत विचारली. हकीकत सांगत असतांना आठवण येऊन मला गहिंवर येत होता असं पाहून ती म्हणाली, " एवढे अगदींच हे कसे तुम्ही बळवंतराव ? बायकां-सारखे—पण बायकांसारखे तरी कसं म्हणूं—मला त्याचं कांहीं वाटत नाहीं अन् तुम्ही नुसती हकिकत सांगतांनासुद्धां रडकुंडीला येतां ! हें कांहीं मर्दपणाचं लक्षण नव्हे."

" तसं म्हणा हवं तर ! " मीं डोळे पुसून म्हटलं, " माझं मन हें असं आहे. तें कांहीं मला आवरतां येत नाहीं. साऱ्या गोष्टी प्रत्यक्ष पाहिलेल्या असल्यामुळं आठ-वणीनंसुद्धां चट्कन मनावर परिणाम होतो त्याला माझा इलाज नाहीं. इथं घरांत राहणारीं आम्हीं दोनच माणसं, त्यांतून मी हा असा रिकामा घरीं बसलेला, म्हणूनच घर कसं अगदीं खायला येतं. "

" तुम्ही असं म्हणतां—" उषा म्हणाली, " मग रावसाहेबांनीं काय म्हणावं ? त्यांना नाहीं का घर खायला येत ? पण ते कसे अगदीं माणसासारखे बोलले ! एवढा सुद्धां परिणाम होऊं दिला नाहीं त्यांनीं मनावर. असा मर्दपणा पाहिजे माणसाच्या अंगीं ! अन् तुम्ही त्यांचे सख्खे भाऊ !—"

" तें असं आहे, " मीं म्हटलं, " दादाचं मन तयार झालंय. त्याची नोकरीच अशी आहे, कीं मन मारून टाकल्याशिवाय त्याच्या हातून कांहींच व्हायचं नाहीं. असा कुठं किती वेळ तो वहिनीबरोबर बोलत बसे ? बोलत बसें काय तो मी, त्यामुळं हें असं होतं. "

" अस्सं होय ? " उषा उद्‌गारली, " सुशिक्षित आणि अशिक्षित यांच्यातला भेद मला आतां कळला. शिक्षणामुळं माणसाचं मन जसजसं प्रगल्भ होतं तसतसा तो भावनेच्या आहारीं कमी कमी जाऊं लागतो. पुढं तर तो भावनेच्या पार होतो, अन् बुद्धिवादावर जगत असतो. बौद्धिक उन्नतीखेरीज माणसाच्या अंगीं माणुसकी येऊं शकत नाहीं. " असं म्हणून कांहींतरी भक्कम सिद्धांत सांगितल्याचा आव आणून ती स्वस्थ बसली.

त्यानंतर मीही कांहीं बोललों नाहीं. मला तिनं अशिक्षित ठरवलं होतं. सुशिक्षिताची व्याख्या काय असं तिला विचारावं असं मनांत येत होतं खरं पण मी उगी राहिलों. तिच्याशीं वादविवाद करण्यांत कांहीं अर्थ नव्हता. बुद्धिवादाची तिची व्याख्या माझ्यापेक्षां निराळी होती. मीं तिच्याशीं वादविवाद केला असता तरीही तिला माझं म्हणणं पटलं नसतं. भावनेच्या पार होणं म्हणजे काय? भावनात्मकता नाहींशी होणं कीं भावनेच्या उरावर पाय देऊन पलीकडे जाणं ? आयुष्यांतले धक्के खातांना माणसानं मन कठोर केलं पाहिजे खरं. पण मन कठोर 'करणं' आणि मन कठोर 'असणं' यांत फरक आहे असं मला वाटलं. रक्ताचं नातं म्हणावं तर या प्रत्यक्ष पाठच्या बहिणीला कांहीं सुद्धां वाटलं नाहीं. तसं पाहिलं तर माझं रक्ताचं नातं नव्हतं--पण मला वाटलं. रक्ताच्या ओढीपेक्षां सहवासाची ओढच मोठी दुःसह असते. म्हणूनच ना बापाचं घर टाकून नवऱ्याच्या घरीं जाणारी मुलगी हंसतमुखानं संसार थाटीत असते !

पुन्हां असं वाटलं, यांत कांहीं तिचा स्वार्थ तर नसेल ना ?

कसली भलती कल्पना आली ही माझ्या मनांत ! छे, छे ! ही मूर्ख असली तरी माझा दादा कांहीं तसा नाहीं.

एक आठवडाभर ती इथं होती. बहुधा तिची बैठक दादा घरीं असेल त्यावेळीं त्याच्या माडीवर असे—दादा घरीं नसे त्यावेळीं ती फिरायला जाई. ती सहसा मला टाळीत असे. शेवटीं मीं स्पष्टपणें तिला विचारलं तेव्हां ती म्हणाली, " खरं सांगूं ? मला तुमचा राग आला आहे. प्रामाणिकपणाच्या तुमच्या खोट्या कल्पनेमुळं आज ताई तुरुंगांत गेली आहे. तुम्हीं तिला तुरुंगांत पाठवली. तुमचा रिपोर्ट—"

" हो ! रिपोर्ट माझा खरा पण दादाला नको होतं का कळायला ? या गोष्टी माझ्यापेक्षां त्याला जास्त चांगल्या कळत होत्या. डोळे झांकून त्यानं कांहीं तो रिपोर्ट माझ्याकडून घेतला नव्हता. चांगला लक्षपूर्वक वाचला होता. त्यांत दुरुस्ती करायला

त्यानं सांगितलं असतं तर काय विघडलं असतं ? त्या रिपोर्टीचे परिणाम काय होतील हें माझ्यापेक्षां दादालाच चांगलं कळत होतं. मी नुसता त्याचा हुकूम बजावला. दोषच कुणाचा म्हणायचा असेल तर तो दादाचा. पण मी तसंही म्हणत नाहीं. दोष आहे तो वहिनीचा. कळूनसवरून तिनं कां हा अविचार करावा ? "

" आतां कसं बोललांत ! " उषा म्हणाली, " रावसाहेब हेंच म्हणाले. त्यांच्या हातीं काय होत ? "

" का बरं ? " मीं जरा चिडून म्हटलं, " रिपोर्ट माझ्याकडून दुरुस्त करून घेणं हें तरी दादाच्या हातीं होतं ? "

" कर्तव्याबद्दलच्या त्यांच्या कल्पना फार कठोर आहेत. "

" मी त्यांचाच भाऊ आहें. कर्तव्याच्या बाबतींत दादा कठोर असला तर तो चांगला कां, आणि मी तसा न राहिलों तर मी दोषी कां ? तो एक अधिकारी आहे आणि मी एक रिकामटेकडा आहें म्हणून का मी दोषी ठरतों ? "

उषा नुसती हंसली आणि उगीच राहिली.

" आतां कां गप्प राहिलांत ? " मी म्हटलं, " उगीच मी एवढा वाद घालीत नाहीं. तुमचं मन माझ्याविषयीं कलुषित व्हावं हें मला बरं वाटायचं नाहीं. शिक्षणाच्या दृष्टीनं तुमच्यापेक्षां माझा दर्जा कमी आहे खरा पण वयानं मी मोठा आहें—अनुभवानं मोठा आहें. तुम्हींच कबूल केलं आहे, कीं मला कांहीं भावना आहेत. तो तुमचा अंदाज अगदीं बरोबर आहे. माणूस भावनावश असला म्हणजे अशक्याला हात घालायची त्याला हांव सुटते. तशीच कांहीं अशक्य हांव मीं धरली आहे म्हणूनच माझ्याबद्दल तुमचा गैरसमज व्हायला नको आहे.—" ती कांहीं उत्तर देते कीं काय हें पाहण्यासाठीं मी क्षणभर थांबलों आणि ती स्तब्ध बसली आहे असं पाहून मी म्हटलं, "आज वहिनी असती तर बरं झालं असतं. यापेक्षां जास्त स्पष्टपणें मला बोलतां आलं असतं. आज मी रिकामा बसून राहिलेला असलों तर त्याला कारण वहिनी—आणि उद्यां कांहीं कर्तबगारी दाखवण्यासाठीं वहिनी आल्यानंतर मी कुठं निघून गेलों तर त्याला कारण—" असं म्हणून मी थांबलों.

" कोण ? " उषा गंभीरपणानें म्हणाली, " मी का ? "

" हो ! " असं म्हणून मीं डोळ्यांत प्राण आणून तिच्याकडे पाहिलं.

क्षणभर ती अस्वस्थ झाली. पुन्हां एक क्षणभर माझ्याकडे रोंखून पाहून तिनं मान फिरवली. माझ्या भाषणाचा तिच्या मनावर परिणाम झाला असावा.

एक मोठा सुस्कारा सोडून ती म्हणाली, " जनसेवेसाठीं सारं आयुष्य वाहायचं असं आज मला वाटतंय. कुणी सांगावं, कदाचित उद्यां माझं मन बदलेल. जनसेवेच्या माझ्या कल्पना ताईपेक्षां निराळ्या आहेत. ती देशसेवा म्हणते—मी जनसेवा म्हणतें. तुम्हांला माझ्या मतांची थोडीबहुत तरी कल्पना असेल. संसारांत पडायचंच असलं तर त्या माझ्या मताचं पोषण होईल असाच एकादा जोडीदार मी पाहीन—मग तो गिरणींतला एकादा कामगार असला तरी देखील मला कांहीं वाटणार नाहीं. इथं दर्जाचा प्रश्न नाहीं. प्रश्न आहे तो ध्येयाचा—आयडिऑलॉजीचा ! कळलं ? "

एक क्षणभर थांबून मीं म्हटलं, " ठीक आहे. मी हें ध्यानांत ठेवीन. वहिनी परत आल्याबरोबर एकदां तिच्याशी चर्चा करून पुढं काय करायचं तें पाहीन. तुमचीं मतं मला माहीत आहेत—ती आयडिऑलॉजी मला पटलेली आहे. शब्द कळले, तत्त्वं पटलीं, तरी तीं कृतींत उतरायला परिस्थिति उत्पन्न व्हावी लागते—किंवा उत्पन्न करावी लागते. मी तुम्हांला एवढंच सांगून ठेवतों, कीं तुमच्या कसोटीला उतरण्यासाठीं मी जिवाचं रान करीन ! "

ती फार खुष झाल्यासारखी दिसली. दुसऱ्या दिवशीं ती जाणार होती. संध्याकाळीं ती दादाबरोबर फिरायला गेली होती. दोघंही परत आली तेव्हा दादा म्हणाला, " तूं मुंबईला जायचं ठरवलं आहेस म्हणे बाळू ? "

मीं घुटमळत उत्तर दिलं, " हो ! असा कांहींतरी विचार करतों आहें. मी वहिनी यायची वाट पहातोंय. "

दादा नुसता हंसला आणि निघून गेला.

" एकूण मुंबईला यायचं तुमचं ठरलं आहे तर ? " उषा म्हणाली, " खरोखरच तुम्हांला कांहीं करायचं असेल तर मला सांगा—मी तुम्हांला योग्य माणसांची गांठ घालून देईन. "

" थँक यू ! " म्हणून मीं उगीच राहिलों.

माझं मलाच चमत्कारीक वाटत होतं. मी विस्तवाशीं खेळ खेळत होतों. या मुलीबद्दल मला एवढासुद्धां जिव्हाळा वाटत नव्हता. मी तिच्याशीं जें जें कांहीं बोललों त्यांत सत्याचा अंश मुळींच नव्हता. मी नुसता अंदाज घेत होतों. वहिनीच्या गैरहजिरींत

दादाबरोबर ती उगीच घसट करूं पहाते आहे असं मला वाटल्यामुळं, मीं हा डाव टाकला होता. तो लागू पडला असा मला संशय आला. आयडिऑलॉजीच्या वेडानं भारून जाऊन ती कुणाही लफंग्या माणसाच्या गळीं पडेल अशी मला भीति वाटली.

यावेळीं वहिनी असती तर किती बरं झालं असतं !

दुसऱ्या दिवशीं उषा मुंबईला गेली. जातांना मी तिला पोंचवायला गेलों होतों. पूर्वीच्या वचनाची तिनं जातांना एकदां उजळणी केली, जनसेवेच्या व्रतावर एक लहानसं व्याख्यान दिलं, जगाचं राजकारण हादरून सोडण्याचं सामर्थ्य असलेल्या महान् व्यक्तींशीं माझी ओळख करून देण्याचं पुन्हां एकदां कबूल करून, माझ्याकडे पाहून तोंडभर हंसत ती निघून गेली.

तो प्रकार पाहून मी मात्र अगदीं खिन्न झालों.





शिक्षा भोगून वहिनी परत आली. तिला आणायला दादा स्टेशनवर गेला होता. ती येणार असल्याचं त्यानं मला कळवलं नव्हतं. ती अचानक आल्याचं पाहून मी चकित झालों. बरोबर दादा होता हें पाहिल्यामुळंच मला जास्त आश्चर्य वाटलं.

एक प्रकारें माझी निराशा झाली. तुरुंगातून सुटून आल्यानंतर वहिनीची दादाशीं होणारी भेट मला पहायची होती. त्यावेळीं परस्परांच्या मनावर काय परिणाम होतात याची पूर्ण कल्पना यावी म्हणून मी या दिवसाची वाट पहात राहिलों होतों—पण तो योग कांहीं साधला नाहीं.

घरीं येतांच वहिनी म्हणाली, “ एकूण तुम्ही मुंबईला जाणार तर, भावजी ? ”

“ असं म्हणतोंय्. ” मी लांब तोंड करून म्हटलं, “ जमेल तेव्हां खरं ! ”

दादानं तिला सांगितलं असावं आणि दादाला उषेनं सांगितलं असावं.

" तुमचं आणि उषेचं यावेळीं मी नव्हतें म्हणून बरं जमलं वाटतं ? " असं वहिनी म्हणाली त्यावेळीं मनांतल्या मनांत मी ओशाळून गेलों. एव्हांच खरी गोष्ट तिला सांगणं शक्य नव्हतं.

मी तुरुंगातल्या गोष्टी काढल्या. त्या हकिकती सांगतांना वहिनी अगदीं रंगांत आली. दादासुद्धां लक्ष लावून ऐकत होता. दादाच्या मनावर कसलाच परिणाम झाल्याचं दिसून आलं नाहीं. जशी कांहीं वहिनी माहेरीं जाऊन आली होती ! दोघांच्या मधें कोणत्याच प्रकारचं मनोमालिन्य उत्पन्न झाल्याचं मला दिसून आलं नाहीं.

बारकाईनं पहातांना मला दिसून आलं, कीं त्या दोघांचं हें ढोंग होतं. दोघांच्याही मनांत अढी होती. पण माझ्यासारख्या अगदीं निकटच्या माणसाला सुद्धां ती न दिसूं देण्याची तीं दोघंही खबरदारी घेत होतीं. मला वाटलं, कसला हा ढोंगी संसार ! असणं आणि दिसणं या दोहोंतला भेद जगाला कळत नाहीं. असतं कसं हें जग पहात नाहीं—जगाला तें दिसूं शकत नाहीं. दिसतं कसं एवढंच जग पहातं आणि म्हणूनच कसं दिसावं एवढ्याचीच माणूस काळजी घेत असतो. जसं नाहीं तसं दिसायचा प्रयत्न केल्यामुळं माणसाच्या मनाला यातना नाही का व्हायच्या ? या एवढ्या यातना सहन करायच्या कशासाठीं ? नुसतं जगाला फसवण्यासाठीं ? पण अशा रीतीनं मनाच्या डांचण्या सहन करून उत्कृष्ट रीतीनं जो जगाच्या डोळ्यांत धूळ टाकूं शकतो त्यालाच जग सज्जन म्हणतं. आमचा दादा या प्रकारचा सज्जन होता.

पण असला हा ढोंगी सज्जनपणा प्रस्थापित करायला वहिनी प्रवृत्त होईल असं मला वाटलं नव्हतं. मीं अगदीं सरळ सरळ तसं विचारलं तेव्हां ती म्हणाली, " तर मग काय करूं ? त्याला कांहीं उपाय का आहे ? तात्विक दृष्ट्या आम्हीं दोघं दोन टोकांवर आहोंत. दैवयोगानं हीं दोन टोकावरचीं दोन माणसं एका जागी आलीं आहेत. परस्पर भिन्न असलेल्या या वृत्तीला जर आम्हीं बळी पडलों तर काय होईल ? रोज भांडणं होतील. त्यांत कुणाला सौख्य लाभेल ? तुमच्यासारख्या तिसऱ्या माणसाचं जिणं-सुद्धां त्यामुळं दुःखाचं होईल म्हणून हें असं वागावं लागतं. यातना होतात काय त्या ज्याच्या त्यालाच—आजूबाजूचीं माणसं तरी सुखी होतात ! जगाच्या रिकाम्या उठा-ठेवी तरी थांबतात ! आतां हेंच पहा, मीं तुरुंगांतून परत आल्यावर काय होतं तें पाह-ण्यासाठीं सारे लोक टपून बसले होते. आतां झालीं कीं नाहींत त्यांचीं तोंडं बंद ? तेवढ्याच थांबल्या कीं नाहींत गांवच्या उठाठेवी ? हें सारं स्थिरस्थावर झाल्यामुळं

मनाला जें एक समाधान वाटतं, त्यापायीं त्या यातनांची जाचणूक देखील हळुहळू वितळून नाहींशी होते. हें ढोंग खरं, पण या ढोंगापायीं जर सर्वांचंच बरं होतं आहे तर त्या ढोंगाला ढोंग कां म्हणावं ? हा व्यवहार आहे—खरा शहाणपणा आहे. ढोंगाला ढोंग म्हणणं हा जगाच्या व्यवहाराच्या दृष्टीनं मूर्खपणा आहे. ”

“ वाः वहिनी, छान ! ” मीं म्हटलं, “ कोर्टांत बचाव करायचं टाळलंस पण हा कोर्टा-बाहेरचा बचाव छान केलास !—” वहिनी नुसती हंसली असं पाहून मी म्हणालों, “ या लंब्याचवड्या व्याख्यानानं माझी समजूत पटली असं तुला वाटत असेल तर तें खोटं आहे. मला वाटतं एल्‌एल्. बी. झाली असतीस तर तुझी वकिली चांगली चालली असती. तुला स्पष्ट सांगतों, असल्या अचाट बुद्धिवादाला फसण्याइतका मी व्यवहारी नाहीं. ”

“खोटं कशाला बोलतां ?” वहिनी म्हणाली, “तुम्हीं नाहीं कधीं अशीं ढोंगं केलीं ? ”

दादाशीं आजवर झालेली माझी वागणूक मला आठवली. अगदीं अलिकडेच उषेला फसवायचा मी कसा प्रयत्न केला होता तेंही आठवलं. वहिनीचा युक्तिवाद बरोबर होता. तरीही मी म्हटलं, “ माझी गोष्ट वेगळी. मी काहीं तुम्हां दोघांसारखा सुविद्य माणूस नाहीं. मी आपला एक भावनेच्या आहारीं जाणारा खुळाभोळा माणूस आहें. मींही ढोंग केलं असेल—नाहीं म्हणत नाहीं—पण माझं तें ढोंग भावनात्मक होतं. तुमचं हें ढोंग बौद्धिक आहे. बौद्धिक ढोंग हें भावनात्मक ढोंगापेक्षां जास्त वाईट असतं, असं नाहीं तुला वाटत ? ”

“ इथं ढोंगाची डिग्री पहायची नाहीं भावजी, ” वहिनी शांतपणें म्हणाली, “ ढोंग हें केव्हांही ढोंगच. ढोंगावरच आधारलं आहे हें जग ! शहाण्यापासून मूर्खापर्यंत प्रत्येक-जण एकमेकाला फसवीत असतो, अन् या फसवण्याच्या क्रियेलाच . जगाची रहाटी म्हणतात. ”

“ थांब, पुन्हां सांग. मला लिहून घेऊं दे.” मीं थट्टेनं म्हटलं, “एकाद्या लेखांत देईन घुसडून ! ” बुद्ध्याच मीं हें विषयांतर केलं आणि भाषणाचा ओघ वाङ्मयाकडे वळवला.

त्यानंतर गांवांत तसल्याच जहाल सभा होत होत्या पण त्यानंतर त्यांत भाग घ्यायला वहिनी पुढं सरसावली नाहीं. लोक म्हणत, ‘ तीन महिन्यांच्या शिक्षेनं बाई घाबरली. नवरा फौजदार आहे कीं नाहीं—त्यानं कान पिरगाळले वाटतं. या शिकलेल्या

बायका पहिल्या पहिल्यानं उगीच टुरटुर करतात आणि केव्हांतरी एकदम कच खातात. यांना कशाला हवी ही देशभक्ति ? यांनीं आपलं चूल आणि मूल संभाळीत घरीं बसावं !'

असं लोक म्हणतात म्हणून सांगितलं तेव्हां वहिनी म्हणाली, " त्यांचं म्हणणं अक्षरशः खरं आहे. एक शब्दसुद्धां खोटा नाहीं. मला पुष्कळ वाटतं पण त्याचा काय उपयोग ? पुन्हां व्याख्यान द्यायला गेलें, पुन्हां शिक्षा झाली, तर यांची नोकरी जाईल. एकाच्या अपराधासाठीं दुसऱ्याला शिक्षा कां करायची, याचा विवेक सरकार करीत नाहीं. आम्हीं दोघांनींही याचा विचार पूर्वीच करायला हवा होता. तो त्यावेळीं केला नाहीं—आतां केला—एकानं कुणीतरी पड खाल्ल्याशिवाय यांत तडजोड झाली नसती. मी पड खाल्लीं नाहीं तर त्यांची नोकरी जाईल. आणि मी तरी पड कां खाऊं नये ? या चळवळींतून एक बाई घटली तर देशाचं कांहीं नुकसान होत नाहीं. लढाईच्या मोर्च्यावरून एक शिपाई पळून गेला तर दुसरा तिथं उभा राहील ! मी असं समाधान करून घेतें आपल्या मनाचं ! "

त्या वर्षी पंडित जवाहरलाल नेहरू यांच्या अध्यक्षतेखालीं झालेली फैजपूरची कॉंग्रेस चांगलीच गाजली. साऱ्या हिंदुस्थानांत प्रचार करण्यासाठीं पंडितजींनीं पळता दौरा काढला. सोसाट्याच्या वाऱ्याप्रमाणं मुक्कामावरून मुक्काम गाजवीत व्याख्यानं देत ते हिंडत होते. सारं हिंदुस्थान खडबडून जागं झालं होतं. असेंब्लीची निवडणूक जवळ आली होती. कौंसिलप्रवेशावरचा बहिष्कार दूर करून निवडणुकी लढवण्यासाठीं कॉंग्रेस पुढं सरसावली होती. पंडितजींच्या व्याख्यानांचा परिणाम होऊन कायदेमंडळांत सर्वत्र कॉंग्रेसचं वर्चस्व प्रस्थापित होणार असं दिसूं लागलं होतं. पंडितजींच्या दौऱ्याच्या त्या हकीकती मी आणि वहिनी मिटक्या मार मारून वाचीत होतों. माझा उल्हास सार्वत्रिक होता पण वहिनीच्या त्या उल्हासांत स्वार्थाचा वांटा फार मोठा होता. ती म्हणे, " उद्यां कॉंग्रेसचं बहुमत झालं, कॉंग्रेसचं मंत्रिमंडळ अस्तित्वांत आलं, मग हे काय करतात तें मला पहायचं आहे. म्हणूनच मी एवढी हुरळलेंय ! "

" असं कधी विचारलं होतंस का दादाला ? " मीं म्हटलं.

वहिनी हंसली आणि म्हणाली, " असले प्रश्न विचारायचे नसतात. काय होतं तें नुसतं मुकाट्यानं पहायचं असतं. विचारलं कीं त्यांतली गंमत गेली. "

दादाला या गोष्टीचा पत्ताच नव्हता. तो आपला आपल्या कामांत चूर होता. आतां

ते तसले खटले थांबले होते. चोरी, दरवडे, मारामाऱ्यांवरच त्याला समाधान मानून घ्यावं लागत होतं. आमचा संसार सुखांत चालला होता. तितक्यांत बी. ए. ची परीक्षा पास होऊन आराम करण्यासाठीं उषा आमच्याकडे आली.

वातावरण पुन्हां बिघडणार कीं काय असं मला वाटूं लागलं.

उषा आली ती सारखी कॉंग्रेसवाल्यांना शिव्या देत होती. कॉंग्रेसनं लढाऊ धोरण सोडलं म्हणून दोष देत होती. मला आश्चर्य वाटलं. उषेच्या हिशेबीं कॉंग्रेसच्या कपाळचा दोष कांहीं टळत नव्हता. खादी, ग्रामोद्योगाची चळवळ होती तेव्हां यांत्रिक प्रगतीची कड घेऊन ती भांडत असे. आतां कायदे-मंडळांत प्रवेश करायचं कॉंग्रेसनं ठरवलं तेंही तिला पटत नव्हतं.

तिचा जोर होता तो जागतिक राजकारणावर. वहिनीचं म्हणणं होतं, कीं ' आमचं राजकारण ' म्हणायलाच जिथं मुळीं वाव नाहीं तिथं जगाच्या उठाठेवी आम्हांला काय करायच्या ? त्या दोघांची ती चर्चा सुरू झाली कीं माझं मस्तक भणभणूं लागे आणि मी म्हणें, " या जगाच्या उठाठेवी करण्यापेक्षां आपण आपली वाङ्मयचर्चाच करूं— ' कलेसाठीं कला, ' ' कला आणि जीवन, ' ' मानसशास्त्र आणि सौंदर्यशास्त्र ' असल्या कांहींतरी उच्च विचारसरणीच्या चर्चा करा ना ! त्यांत कांहीतरी मानसिक उन्नति तरी साधेल. राजकारणाचा कोंडा कुटित बसण्यांत ना भाकरी ना चाकरी. त्यापेक्षां कांहीं वाङ्मयाबद्दल बोला, कांहीं भाषा–शुद्धीची चर्चा करा, कांहीं नवीन शब्द काढा, विज्ञानाची परिभाषा ठरवा. आतां हें असं झालंय, तूं आधींच बी. ए. झालेली आहेस वहिनी, ही उषा सुद्धां आतां बी. ए. झालीय, तुझ्यासारखी फर्स्टक्लासांत आलीय. एकाद्या आय. सी. एस. कलेक्टरशीं ही आतां लग्न करील, अन् हा आतांचा राजकारणाचा भुसा त्यावेळीं वाऱ्याबरोबर उडून जाईल. "

" तुम्हीं काय समजतां बळवंतराव ? " उषा चिडून म्हणाली, " लग्न म्हणजे कांहीं सर्वस्व नव्हे. राजकारणांतसुद्धा रोमान्स आहे––"

" कोरडा रोमान्स ? " वहिनी उद्‍गारली, " कीं अडगळींतला रोमान्स ? "

" तूं गप्प रहा ताई, " उषा म्हणाली, " तुझं लग्न झालंय. या बाबतींत बोलायचा तुला अधिकार नाहीं. "

" मग मला अधिकार आहे तर ? " मीं म्हटलं, " हो, एवढं तरी एक बरं आहे. "

" कसला अधिकार? " उषा उद्गारली, " निरुद्योगी घरीं बसणाऱ्या घरकोंबड्यांना कोणात्याच बाबतींत बोलायचा अधिकार नाहीं. "

" असं म्हणूं नका उषाताई. " मीं गंभीरपणाचा आव आणून म्हटलं, " मी कांहीं-तरी करीत होतों म्हणून ना वहिनी तुरुंगांत गेली ? आणखीसुद्धां चारदोन माणसांना तुरुंगांत पाठवायचं श्रेय मला लाभलं आहे. या बाबतींत दादापेक्षां माझी योग्यता कांहीं कमी नाहीं. त्यानं फार तर खटले करायची शिफारस केली असेल, फार तर कोर्टात खटले चालवले असतील, पण त्या साऱ्या कर्तबगारीचं मूळ माझ्या रिपोर्टात होतं हें विसरूं नकोस ! " बोलत असतांना मी मधूनमधून वहिनीच्या चेहऱ्याकडे पहात होतों. निर्विकार चेहऱ्यानं ती माझं बोलणं ऐकत होती.

" त्यांत कांहीं मोठासा पुरुषार्थ नाहीं, " उषा म्हणाली, " तसलं तें भाडोत्री काम कुणीही केलं असतं. तशाच कांहीं चळवळींत तुम्हीं प्रत्यक्ष भाग घ्याल, शेंकडों माणसांत मिसळून आपलं व्यक्तित्व प्रस्थापित कराल, तेव्हांच तुम्हांला या बाबतींत बोलायचा अधिकार येईल. "

" तुम्हीं तसं कांहीं केलंय वाटतं ? " मीं विचारलं.

वहिनीकडे पाहून उषा हंसली आणि म्हणाली, " तें मुंबईला येऊन पहा. "

त्या दिवशीं तो विषय तेवढाच राहिला. राजकारणाचा आणि रोमान्सचा काय संबंध आहे तें मला शेवटपर्यंत कळलं नाहीं.

पंडितजींच्या दौऱ्याचा परिणाम झाला. मुंबई प्रांतात कॉंग्रेसचं बहुमत झालं. पण कॉंग्रेसच्या वतीनं मागण्यांत आलेलीं आश्वासनं देण्याचं सरकारनं टाळल्यामुळं तात्पुरतं सरकारी मंत्रिमंडळ नेमण्यांत आलं. साताऱ्याचे कूपर मुख्य मंत्री झाले, म्हणून या मंत्रिमंडळाला ' कूपर मंत्रिमंडळ ' असं म्हणण्यांत येऊं लागलं

याच वेळीं दादाची बदली पुण्याला झाली. मुंबई प्रांताच्या सरकारची बैठक त्यावेळी पुण्यालाच होती. कायदेमंडळाचीं अधिवेशनं अजून भरूं लागलीं नव्हतीं. कॉंग्रेसच्या गोटांत अजून कांहींतरी खळबळ चालू होती. मुंबईचा ' पुढारी ' नेमण्याच्या बाबतींत वाद उपस्थित झाले होते. नारिमन हे पुढारी व्हायचे पण त्यांच्याविरुद्ध कांहीं तक्रारी निघाल्यामुळं कॉंग्रेसच्या गोटांत बाचाबाची सुरू झाली होती.

पुण्याला आल्यावर मला हायसं वाटलं. अगदीं समुद्रांतच जरी नाहीं, तरी विहिरींतून बाहेर निघून मोठ्याशा तलावांत आलों असं मला वाटूं लागलं. 'आतां तुमची कूपमंडूकवृत्ति नाहींशी होईल.' असं उषा म्हणाली तें मला खरं वाटूं लागलं.

मला वाटतं, दादानं मुद्दामच पुण्याला बदली करून घेतली असावी. मुंबई नाहीं तर निदान पुणं—दुधाची तहान ताकावर भागली असं वहिनीला वाटलं. पुण्याला आल्यावर कर्वे हायस्कूलमधें शिक्षकिणीची नोकरी पत्करण्याचा वहिनीचा प्रयत्न सुरू झाला होता. तें दादाला कळलं तेव्हां तो एकदम उखडला. तो म्हणाला, "कशाला हवी आहे तुला नोकरी? आपल्याला कांहीं कमी नाहीं. आहे या परिस्थितींत आपणांला चागलं सुखासमाधानानं रहातां येतंय. मी इथला एक अधिकारी, माझी बायको शाळेंत मास्तरकी करते आहे असं दिसलं, तर चारचौघांत माझा दर्जा कमी होईल."

"मग एम्. ए. च्या टर्म्स भरूं का इथं?" वहिनीनं विचारलं.

"कशाला?" दादा वसकन म्हणाला, "कशाला एम्. ए. व्हायचं? मास्तरकी-साठींच ना? कीं नुसती माझी बरोबरी करण्याकरतां तुला एम्. ए. व्हायचं आहे?—" वहिनीचे डोळे इंगळासारखे लाल झाले होते. तिचे ओंठ थरथरत होते. दादाचं तिकडे लक्ष नव्हतं म्हणून तो म्हणाला, "— कॉलेजांत जायला आतां कांहीं तूं लहान नाहींस. आपलं नशिबच खोटं, नाहींतर यावेळीं तुला दोन मुलं व्हायचीं. मग ही एम्. ए. च्या टर्म्स भरण्याची गोष्ट तूं काढली नसतीस!"

वहिनीच्या रागाचा पारा एकदम खालीं उतरला. शल्य कुठं खुपत होतं तें आतां माझ्या ध्यानीं आलं.

"मग हिनं करावं काय?" उषेनं विचारलं.

"इच्छा आहे तिथं मार्ग आहे." दादा म्हणाला, "हिच्यासारख्या कितीतरी पदवीधर बायका या पुण्यांत आहेत. त्या काय करताहेत तें त्यांना जाऊन विचार. त्या करीत असतील तेंच हिनं करावं. नर्स आणि मास्तरणीचं काम हें विधवांसाठीं आहे—अखंड-कुमारींसाठीं आहे. तुझ्यासारख्या घरंदाज बायकोचं तें काम नव्हे."

दादा निघून गेल्यावर वहिनी म्हणाली, "असं आहे हें आम्हां बायकांचं जिणं!"

"थांब," उषा म्हणाली, "नुसतं बायकांचं म्हणूं नकोस. लग्न झालेल्या बायकांचं म्हण हवं तर."

" असं कां म्हणतां उषाताई ? " मीं म्हटलं, " लग्न झालेल्या साऱ्याच बायकांचे नवरे कांहीं असे नसतात. माझ्या बायकोला कांहीं मीं असं म्हटलं नसतं—" वहिनी हंसली असं पाहून मीं म्हटलं, " हंसूं नकोस वहिनी—"

" कशाला ही चर्चा हवी भावजी ? " वहिनी म्हणाली, " तुम्हांला पूर्वीची हकीकत माहीत नाहीं. एम्. ए. होईपर्यंत मी लग्न करणार नाहीं असं मी म्हटलं, तरी थांबायची तयारी होती यांची. लग्न झाल्यानंतर माणूस कसा बदलतो हें लग्न न झालेल्या मुलीला कळायचं नाहीं, कीं लग्न न झालेल्या मुलालाही कळायचं नाहीं. "

" मग बोलणंच खुंटलं ! " मीं म्हटलं, " आम्हां दोघांनाही या बाबतींत चर्चा करतां येत नाहीं !–तरी पण असं पहा वहिनी, या तुझ्या बहिणीला माझ्याशीं लग्न करायला सांग अन् मग दोन्हीं नवऱ्यांची कसोटी पहा म्हणावं दोघीही. "

" आतां एवढं पाह्यल्यावर ? " उषा म्हणाली " छेः ! "

" मी आतां कॉलेजांत जायचा विचार करतों आहें वहिनी. " मीं म्हटलं, " नोकरी करण्यापेक्षां तें बरं. चारसहा वर्षं जरा गमतींत तरी काढतां येतील. आणि तुमचं तें काय ' कॉलेज–लाइफ ' म्हणताना तेंही पाह्यला मिळेल. "

" पुरे झाला हा पाचकळपणा. " उषा म्हणाली, " पुरे करा हा विषय. उगीच कोळसा उगाळावा तितका अधिक काळा व्हायचा. "

मीही मग उगीच राहिलों. कितीतरी वेळ आम्ही मुकाट्यानं बसून राहिलों होतों. विषय क्षुल्लक खरा पण त्यानं वातावरण अगदीं विघडून गेलं होतं. मला देखील तें जाणवल्यावांचून राहिलं नाहीं.

पुण्याला आल्यापासून वहिनीच्या डोक्यांत या दोन कल्पना चांगल्याच घोळत असाव्यात. रिकामपणीं घरीं बसणं तिला आवडत नव्हतं. बायकांचं ' सोशल वर्क ' म्हणून जें एक ढोंग आहे त्याचा तिला मुळांतच तिटकारा होता. नोकरी करण्याची तिला पहिल्यापासूनच हौस होती. त्यांतूनही शिक्षकाचं काम तिला फार आवडत असे—पूर्वी ती मास्तरीणच होती कीं नाहीं ! एकादी स्वतंत्र शिक्षण संस्था काढून ती लौकिकाला आणून दाखवावी अशी तिची महत्त्वाकांक्षा होती. कितीतरी वेळ तिनं तसे उद्गार माझ्याजवळ काढले होते. म्हणूनच एम्. ए. व्हावं असं तिला वाटत असे. दादानं मुळांतच असा मोडता घातल्यामुळं ती एकदम हताश झाली असं मला वाटलं.

नव्या राजवटीमुळं पुण्याच्या वातावरणांत नवी खळबळ सुरू झाली होती. अर्थ-

मंत्री जमनादास मेहता हे पूर्वीपासूनच पुणेंकरांचे दोस्त असल्यामुळं लोकशाही स्वराज्य पक्षाला आतां जोर येईल असं प्रत्येकजण म्हणत होता. आपल्या पगाराची निम्मे रक्कम पक्षाला देईन अशी नामदार जमनादासांनीं घोषणा केल्यामुळं सारेच त्यांच्यावर खूष झाले होते. (तशी त्यांनीं दिली कीं काय हें अजूनपर्यंतही कुणाला कळलेलं नाहीं !) कॉंग्रेसच्या गोटांत मात्र अजून कांहींतरी कारवाई सुरू असल्यामुळं बरेच लोक अस्वस्थ झाले होते.

आतां माझ्यांतला रिपोर्टर खडबडून जागा झाला. हीच संधी योग्य आहे असं मला वाटलं. मुंबईच्या दैनिकांचे रिपोर्टर इथं हजर होतेच. पुण्याला बरींच दैनिकं होतीं. त्यातल्या कुणाच्या तरी एकाच्या दिंडीदरवाजांतून घुसायचा मी बेत ठरवला.

इथं मिळून मिळून काय मिळणार होतं ? पण मिळकतीची मला पर्वा नव्हती. मला काम पाहिजे होतं—माझं आवडतं काम मला पाहिजे होतं.

आणि एका दैनिकाच्या कचेरींत मला तें मिळालंही.

शेवटीं एकदांचा कॉंग्रेस आणि सरकारचा समेट झाला. साडेतीन महिन्याचं औट घटकेचं साम्राज्य संपवून कूपर मंत्रिमंडळ मावळलं. बाळासाहेब खेर प्रधानमंत्री झाले. नारीमनच्या प्रकरणीं बराच मतभेद माजला होता खरा, पण बाळासाहेबांसारख्या अजातशत्रू सज्जन माणसाची निवड झाल्यामुळं सर्वांचंच समाधान झालं.

अधिकारग्रहणाच्या दिवशीं ती गंमत पहायला मी गेलों होतों—त्या ओवाळण्या, त्या पंचारत्या, ते टिळे वगैरे प्रकार पाहून पुणेकर खूष झाले खरे पण मला तो प्रकार आवडला नाहीं. हें जें एक धार्मिक वातावरण या समारंभामुळं उत्पन्न झालेलं दिसलं तें कॉंग्रेसच्या ब्रीदाच्या विरुद्ध होतं. सुदैवानं मुसलमान मंत्र्याची निवड झाली नव्हती म्हणून बरं—झाली असती, तर या टिळे-पंचारतीच्या प्रकरणीं त्यानं काय केलं असतं तें पाहतां आलं असतं. गिल्डर हे पार्शी असले तरी त्यांचे आचार आम्हां हिंदूंच्या सारखेच असल्यामुळं अर्थातच त्यांना कांहीं वाटलं नाहीं.

अधिकारग्रहणाचा समारंभ पाह्यला वहिनी आणि उषा दोघीही आल्या होत्या. दोघींच्या मनावर दोन प्रकारचे परिणाम झाले. प्रत्येक गोष्टीकडे तुच्छतेनं पहायची उषेची जी वृत्ति होती तिला अनुसरून, या समारंभाचं तिला कांहीं चोज वाटलं नाहीं.

वहिनीला मात्र अगदीं गहिंवर आला होता. तो प्रसंग पहात असतांना तिच्या डोळ्यांतून सारखीं आसवं टपकत होतीं म्हणून उषा तिची थट्टा करीत होती. आतां

सुद्धां ती हकीकत सांगतांना तिचा गळा दाटून आला होता. ती म्हणाली, " तुला तें कळायचं नाहीं उषे. माझ्यासारखी तूं तुरुंगांत जाऊन आलेली नाहींस. हीं माणसं-देखील काल तुरुंगांत जाऊन आलेली आहेत. ज्या शिपायांनीं काल यांना तुरुंगांत नेऊन ठेवलं होतं तेच शिपाई आज यांच्यापुढं पासष्ट डिग्रीचा अँगल करून मुजरा करीत असलेले पाहिले, तेव्हां केवढं कौतुक वाटलं मला ! पण ही मुजऱ्याची पद्धत त्यांनीं बंद केली आहे म्हणे. यापुढं पट्टेवाले, शिपाईसुद्धां नमस्कार करूं लागले आहेत—चांगला ब्राह्मणासारखा नमस्कार करूं लागले आहेत. तसंच हें पहा उषे, दरमहा तीन हजार मिळायचा मोह लाथाडून पांचशें रुपयांवर हे लोक काम करणार आहेत. दरमहा दोनतीनहजारवाले काळे गोरे सेक्रेटरी—पोलादी चौकटीचे ते आधार-स्तंभ—या पांचशें रुपये पगारदारांच्या हाताखालीं काम करणार आहेत—यांच्या हुक-मतींत काम करणार आहेत या नुसत्या कल्पनेनंच माझं हृदय भरून येतं !– " बोलत असतांना तिचा गळा आणखी दाटून आला आणि डोळ्यांतून आनंदाश्रूंची झरणी लागली.

पुन्हां पुन्हां ती त्या समारंभाचं वर्णन करीत होती. कांहींतरी अभूतपूर्व अशी गोष्ट घडून आली आहे असं तिला वाटत होतं. पुष्कळांनाच असं वाटत होतं. मला मात्र तें तसं वाटलं नाहीं. राज्यघटनेच्या या नव्या कायद्याप्रमाणें मंत्रिमंडळाचे अधिकारसुद्धां मर्यादित होते असं सारे जाणक लोक म्हणत असल्यामुळं मला समाधान वाटत नव्हतं. कॉंग्रेसपक्ष हा विरोधी पक्ष राहून सरकारी पक्षाशीं विरोध करीत राहिला असता तर जरा विशेष मजा आली असती, असं एक तमासगीर या नात्यानं मला वाटे.

तरीही तो वहिनीचा उल्हास पाहून क्षणभर मला तिच्या आनंदाचा सहभागी होणं बरं वाटलं. आधींच उषा विरोध करीत होती, तिथं मीही तसंच कांहीं खुसपट काढलं असतं तर वहिनीच्या आनंदावर विरजण पडलं असतं, म्हणून मी उगीच राहिलों.

दादा काय—बोलूनचालून नोकर पडला. जें सरकार असेल तें त्याचं सरकार होतं. मग तें सिव्हिलियनांचं आहे, कूपरचं आहे, कीं खेरांचं आहे, याची त्याला तमा नव्हती. काल ज्या माणसांना आपण तुरुंगांत नेऊन पोंचवलं तींच माणसं आज कायदेमंडळांत बसून प्रांताचा कारभार चालवतील, त्यानीं सोडलेले हुकूम आपणांला पाळावे लागतील, हें पाहून वाईट वाटण्याइतकी मनाची क्षुद्रवृत्ति सरकारी नोकराच्या ठायीं नसते. निर-निराळ्या वृत्तींचे निरनिराळे साहेब रोज बदलत असल्यामुळं वरची हुकमत बदलल्याचा किंवा तींत थारेपालट झाल्याचा परिणाम त्याच्यावर होण्याचं कांहीं कारण नव्हतं. ज्या

रुळावर गाडी जाईल त्या रुळावरून ती हांकवायची, ही सरकारी नोकरांची वृत्ति दादाच्याही ठायीं होती. म्हणून प्रस्तुतच्या थोरेपालटामुळं त्याला आनंद झाला नाहीं कीं दुःखही वाटलं नाहीं.

निदान तो तसं कांहीं उघडपणें दाखवीत नव्हता. अंतःकरणांत कांहींही वाटत असलं तरी तें बाहेर न दिसूं देण्याची नित्याची पोलिशीवृत्ति त्यानं यत्किंचित बदलूं दिली नव्हती.

उषा मात्र कांहीं ना कांहीं खुसपट काढून वहिनीला चिडवायचा प्रयत्न करीत होती. त्या तिच्या खजाळेपणाचा वहिनीवर मुळींच परिणाम होत नव्हता.

घरीं खादीचे ताके येऊन पडले, दादानं खादीचे कपडे केले, एवढ्यावरच वहिनी बेहद्द खूष झाली होती. असला हा 'अत्याचार' आपल्या घरीं कधीं घडेल, असं यापूर्वी तिला कुणी सांगितलं असतं तरी खरं वाटलं नसतं.

मला आतां रोज ऑफिस सुरू झालं होतं. मला रोज असेंब्लीच्या बैठकीला जावं लागे आणि नंतर छापखान्यांत येऊन बसून रिपोर्ट लिहून द्यावे लागत त्यामुळं घरीं मी फारच थोडा वेळ असें. उषादेखील बरीचशी गांवांत भटकत असे. रात्रीं मात्र आम्हीं सारीं एकत्र जमूं—क्वचित् काम असलं तर काय तो दादाच गैरहजर असे. त्याच्या दिनचर्येंत तसा कांहींच फरक झाला नव्हता.

एकाद्या शनवारीं मी लौकर घरीं येत असें. रविवार हा आम्हां लोकांना घरीं गैरहजर असण्याचा आणि गांवांत भटक्या मारण्याचा सत्तेचा दिवस होता. म्हणून शनिवारीं घरीं लौकर आलों आणि वहिनी घरीं असली, तरच खाजगी बोलणं बोलण्या-जोगी संधि मला मिळत असे.

तसं पाह्यलं तर आतां खाजगी बोलायचं असं कांहीं राह्यलं नव्हतं. सारा विरोध मावळला होता—

पण तसं तरी कसं म्हणूं? उषेचा साम्यवाद प्रत्येक बाबतींत आम्हांला विक्षेप करी. नोकरी करायची नाहीं, एम्. ए. च्या टर्म्स भरायच्या नाहींत असा दादाचा हुकूम सुटल्याचं शल्य वहिनीला अजून डांचत होतं. खाजगी बोलायला एवढे दोन विषय तरी खास होते.

बी. ए. होऊन उषा फर्स्ट क्लासमधें आली होती. तिनं एम्. ए. च्या टर्म्स भरायला पुण्यांतच सुरवात केल्यामुळं आतां ती मुंबईला जाण्याचा संभव नव्हता. ही गोष्ट

दादाच्या संमतीनंच झाली होती. इतर खर्च तिचा तीच चालवीत असे—एका माणसाचं जेवण कांहीं दादाला जड नव्हतं, तरीही या बाबतींत वहिनीची संमती घेतली नसावी असा मला संशय होता, त्याचं त्या दिवशीं निराकरण झालं.

तो शनिवारचा दिवस होता. मी कपडे काढून एक पुस्तक घेऊन बसलों तोंच वहिनी माझ्यासाठीं चहा घेऊन आली. नित्याप्रमाणें चहा ठेवून न जातां ती तिथंच बसली असं पाहून मींही थोडंसं ओढून आणायचा आव आणला. चहा आणला तरी पुस्तकावरची नजर हालवली नाहीं

" आतां घ्या ना तो चहा," वहिनी म्हणाली," थंड होईल! कसलं पुस्तक आहे तें? काय एवढे गढून गेलांहां त्यांत?"

डाव्या हातांत पुस्तक घेऊन वाचीत उजव्या हातानं एकेक घोट घेत मी तसाच राहिलों.

" ऐकूं येतंय का मी विचारतें तें?" वहिनीनं जरा आवाज चढवून विचारलं.

" काय म्हटलंस?" मी पुस्तकावरची नजर वळवून विचारलं, " फार छान आहे पुस्तक."

" काय आहे तें?"

" एंगेल्सचं सोशॅलिझम."

" असं का? छान! हें प्रियाराधन चाललंय वाटतं?"

" असंच कांहीं नाहीं! आतां या वृतपत्रव्यवसायांत पडलों आहें——नव्यानव्या लेखकांचीं जीं जीं नांवं ऐकूं येतात तीं तीं एकदां वाचून टाकायचीं म्हणतों."

" बरं बरं, वाचा." असं म्हणून वहिनी तशीच बसून राहिली.

चहा घेऊन झाला, तरीही पुस्तकांत गढून गेल्याचा आव मी तसाच कायम ठेवला होता. वहिनीही तशीच बसून राहिली होती. बराच वेळ झाला तरी ती जात नाहीं असं पाहून मीं पुस्तकावरून वर पाहून म्हटलं," काय आहे वहिनी?"

" शेवटीं तुमचं लक्ष गेलं म्हणायचं," वहिनी एक सुस्कारा सोडून म्हणाली, " कुणींच माझी कदर करीत नाहीं. यांना नोकरी आहे, तुम्हांला नोकरी आहे, उषा तिकडे गांवभर उनाडते आहे—"

" मग तूंही जा की ओळखी करायला!" मी हंसून म्हटलं, " ती कांहीं बंदी केली नाहीं कुणी तुला!"

" हो. तें खरं आहे ! " वहिनी माझ्याकडे न पाहतां म्हणाली, " ती कांही बंदी केलेली नाहीं. पण मी कुठं जाऊं ओळखी करायला ? उषेचीं कॉलेजं आहेत–तीन चार कॉलेजांत जावं लागतं तिला. तिथं प्रत्येक ठिकाणीं होताहेत तिच्या ओळखी. एकदोनदां तिच्याबरोबरही जाऊन पाहिलं—पण तें असं होतं, तिच्या मैत्रिणींना मी बरोबरीची वाटत नाहीं. आपल्या मेळाव्यांत मला घ्यायला त्या कांहीं तयार नाहींत! मग जाऊं कुठं ? इथं चांगलीशी लायब्ररीसुद्धा नाहीं. तसे बायकांचे म्हणायला क्लबदेखील नाहींत. संध्याकाळीं फिरायला जाईन म्हटलं तर एकटंच जाणं मला आवडत नाहीं,— "

" मग मी येऊं का ? "

" तुम्ही ! " वहिनी मोठ्यामोठ्यानं हंसत म्हणाली, " तुम्ही ? माझ्याबरोबर ? अन् या पुण्यांत ? अन्नूनं दिवस काढायचे आहेत मला इथं ! "

" हो, तेंही खरंच, " मी उद्गारलों, " इकडे जिल्ह्यासारखंच आहे—"

" छे, त्याहून वाईट. तें तुम्हांला कळायचं नाहीं. मी आज सांगणार होतें तें तेंच–" असं म्हणून वहिनी थांबली. मी जास्त कांहीं न विचारतां उगीच राहिलों असं पाहून आणखी थोडा वेळ थांबून ती म्हणाली, "—तेंच सांगणार होतें. परवां उषेच्या कांहीं मैत्रिणी आल्या होत्या इथं. त्यांचीं त्यांचीं बोलणीं चालली होतीं. मी कांहीं त्यांच्या घोळक्यांत सामील झालं नव्हतें. मी आंत आहें असं पाहून त्यांचीं तोंडं सुटलीं. उषेबरोबर हे रोज फिरायला जातात म्हणून त्या पोरी तिची टिंगल करीत होत्या. एकीनं तर अगदी सरळ विचारलं, 'अन् तुझ्या ताईबरोबर तो रिपोर्टर जातो वाटतं ?' माझं मस्तक भणाणलं—" असं म्हणून ती पुन्हां थांबली.

आणखी थोडा वेळ गेला आणि तिनं पुन्हां बोलायला सुरवात केली, "–तरी बरं मी न् तुम्ही कधीं एकदां सुद्धां बरोबर गेलों नाहीं. फारच बोलत होत्या त्या–! "

" काय बोलत होत्या ? " मीं हळूच विचारलं.

" तिच्या न् त्यांच्या गोष्टी—" वहिनी रागानं लाल होऊन म्हणाली, " असा पाचकळपणा चालवला होता एकेकीनं ! असं वाटलं, कान पिरगळून एकेकीच्या एकेक थोबाडींत द्यावी. त्यांच्या थट्टेची उषेला चीड येत नव्हती. उलट ती त्यांना उत्तेजन देत होती तें पाहून माझं मस्तक भडकलं. आजवर केव्हांही हीं दोघं बरोबर आलीं नाहींत. ही आधीं येते आणि ते मग केव्हांतरी येतात म्हणून खोटं म्हणावं, तर

उषा कांहीं तसं त्या पोरींना म्हणाली नाहीं. त्या गेल्या तेव्हां मीं उषेला विचारलं, तर कांहींच न बोलतां ती नुसती हंसत सुटली. मग म्हणाली 'त्यांनाच विचार की !' अन् त्यांना विचारायची मला कांहीं छाती झाली नाहीं.—"

आम्ही बोलत असतांना दादा एकदम आला. आम्हां दोघांकडे पाहून त्याची चर्या एकदम बदलली. कांहींसुद्धां न बोलतां तो आपल्या खोलींत गेला.

त्याच्या पाठोपाठ वहिनीही आंत गेली. मी तिथंच बसून विचार करूं लागलों.





राजकीय वातावरण सर्वत्र शांत होतं. आतां सर्वत्र आबादीआबाद होणार असं कित्येकांना वाटत होतं, तर मंत्रिमंडळाला विरोध कसा करायचा याकरतां कित्येक बैठका भरवीत होते. कायदे मंडळाच्या बैठकी सुरळीतपणें सुरू होत्या.

रिपोर्टरच्या कामाबरोबरच आतां मी थोडं संपादकीय कामही करूं लागलों होतों. आमच्या पत्राचे संपादक जरी स्वतः कम्युनिस्ट होते तरी कॉंग्रेसविरोधी नव्हते. अधिकार हातीं येतांच मंत्रिमंडळानं पुष्कळशा कम्युनिस्टांना तुरुंगांतून सोडून दिलं होतं. कॉंग्रेस-संस्थांवरची बंदी उठवतांना 'कामगार वाङ्मय' सारख्या काम्युनिस्टांनीं चालवलेल्या किरकोळ संस्थांवरची बंदीही उठवण्यांत आली होती. कम्युनिस्ट लोक खादी चढवून कॉंग्रेसच्या गोटांतून हिंडतांना दिसूं लागले होते. या दोन पक्षांमधला प्रत्यक्ष दुजाभाव बहुतेक मिटल्यासारखा झाला होता.

मंत्रीमंडळाला विरोध होता काय तो लोकशाही स्वराज्य पक्षाचा. आणि या पक्षाचे असेंब्लींतील सभासद हाताच्या बोटावर मोजण्याइतके सुद्धां नव्हते. मुस्लिम-लीगवाल्यांचा विरोध होताच, तसाच त्यांच्या जोडीला आंबेडकरांचाही पक्ष होता. या पक्षानं स्वतंत्र-मजूर पक्ष असं नांव घेतलं होतं. पण मजुरांचा आणि त्यांचा कितीसा जिव्हाळ्याचा संबंध होता

हा प्रश्नच होता. या स्वतंत्र-मजूर पक्षांत कांहीं 'प्रागतिक' म्हणवणारे घुसले होते—पण ते सुद्धां नांवापुरतेच. प्रत्यक्ष मजूरवर्ग काँग्रेस मंत्रिमंडळावर नाखूष नव्हता. मजुरांसाठीं काय करावं याची चर्चा मंत्रिमंडळांत सुरू होती. मजूरखात्याचे मंत्री खुद्द प्रधानमंत्रीच असल्यामुळं आणि गुलझारीलाल नंदांसारखे मजुरांचे कैवारी त्यांचे पार्लमेंटरी सेक्रेटरी असल्यामुळं, मजुरांच्या क्षेत्रांत कांही ना काहीं थोरपालट होईल अशी पुष्कळांची अपेक्षा होती.

रिपोर्टर या नात्यानं पुष्कळशा राजकारणी माणसांचा परिचय मला होऊं लागला. वृत्तपत्रीयक्षेत्रांत असलेलीं आणि सर्वसामान्य लोकांच्या दृष्टीनं फारशीं महत्त्वाचीं वाटत नसलेलीं माणसं, राजकारणांत किती तरबेज होतीं याचा अनुभव मला येऊं लागला होता. त्यांच्या सहवासानं आतां मला या क्षेत्रांतलं ज्ञान बरंच होऊं लागलं होतं. तरीही या बाबतींत अधिकारानं चर्चा करण्याइतकं सामर्थ्य माझ्याठायीं आलं नव्हतं.

मुंबईप्रांताची बैठक पुण्याहून मुंबईला गेली आणि माझं काम कमी झालं. आतां मी उपसंपादक म्हणून काम करूं लागलों होतों. आतां रिपोर्टरचं काम करून दादाला बातमीपत्रं देण्याची जरूरी राहिली नव्हती. तो साराच मनू पालटला होता. खादीवाल्या लोकांची आमच्या घरीं ये जा सुरू झाली होती. कांहीं माझ्याकडे येत, कांहीं नायका वहिनीकडे येत आणि पूर्वी ज्यांचं नांव घेतलं तर त्या नांव घेणाराला सुद्धां आमच्या घरीं मज्जाव व्हायचा, अशीं माणसं खुद्द दादाकडेसच येत. त्यांतूनही विलक्षण आश्चर्य हें, कीं हीं माणसं येऊन एकाद्या वरिष्ठ अधिकाऱ्याप्रमाणें दादावर सत्ता गाजवीत आणि दादाही मोठ्या खुपीनं ती सत्ता गाजवून घेई.

वर्तमानपत्रांचा तर अलिकडे सुकाळ झाला होता. नुसत्या पुण्यांतच सात आठ दैनिकं निघत होतीं. शिवाय मुंबईचीं. शिवाय पुण्यामुंबईची साप्ताहिकं. आमच्या घरीं वर्तमानपत्रांच्या ह्या राशी पडूं लागल्या होत्या. पूर्वी जें वर्तमानपत्र वाचण्यासाठीं वहिनीला मनगटं चावीत तळमळत बसावं लागे, तें आणि तसलीं सारीं वर्तमानपत्रं घरीं येऊन पडत असतांही आतां वहिनी त्यांच्याकडे ढुंकूनसुद्धां पहात नसे.

एकंदरींत काय, आतां तें चोज राहिलं नव्हतं.

विरोधामुळं ईर्षा वाढते पण तो विरोध मिटला, कीं ईर्षेची तीव्रताही एकदम कमी होते त्याचा प्रत्यक्ष अनुभव मला त्यावेळीं आला. काँग्रेसच्या राजकारणांत हात घालण्यासाठीं सदोदित तळमळणारी वहिनी, नवऱ्याचा विरोध नाहींसा झाल्यामुळं आतां

उदासीन झाली होती. म्हणजे तिचा कॉंग्रेसचा अभिमान सुटला होता किंवा नाहींसा झाला होता असं मुळींच नाहीं. कॉंग्रेसनं अधिकारग्रहण केलं तर जनतेचं कल्याण होईल, असं ती पूर्वी सहसा म्हणत नसे. पण आतां प्रत्यक्ष अधिकारग्रहण केल्या-वर तिचं मत बदलूं लागलं होतं. तरीही बहुमत झाल्यानंतर अधिकारग्रहण न करतां अधिकारस्थ मंत्रिमंडळाला विरोध करीत राहिल्यानंच कॉंग्रेसचा वोज वाढला असता, असं अजूनही तिला वाटे.

चाऱ्ही बाजूंकडे दृष्टि फेंकली कीं मलाही असंच वाटे. बहुजनसमाजांत कॉंग्रेसची प्रतिष्ठा पूर्वीपासूनच अधिष्ठित होती. बहुजनसमाजातलं तें स्थान अजून डळमळलं नव्हतं. पण कॉंग्रेसद्वेष्ट्या पत्रकारांचं आतां फावलं होतं. एका काळीं नारिमनला शिव्या देणाऱ्या वृत्तपत्रांनीं आतां नारिमनची बाजू उचलून धरून कॉंग्रेसच्या हायकमांडवर धुळफेंक करायला सुरवात केली होती. पुण्यांतलीं प्रमुख पत्रं बहुतेक कॉंग्रेसद्वेष्टींच होती. काका लिमयांचा एक ज्ञानप्रकाश तेवढा प्रतिपक्षांतल्या गोटांतला असूनही कॉंग्रेसला विरोध करीत नव्हता—एवढंच नव्हे, तर वेळींप्रसंगीं कॉंग्रेसमंत्रिमंडळाची पाठसुद्धां थोपटीत होता.

ही परिस्थिति पाहूनच वहिनी हताश झाली होती. ती म्हणे, "हातीं अधिकार येण्यासारखं दुसरं पाप नाहीं. अधिकारी माणसाकडे साशंक मुद्रेनं पहाणं स्वाभाविक असतं. कुणी आंधळे भक्त आहेत ते कदाचित् गुणदोषांकडे दुर्लक्ष करतील; पण माझी खात्री आहे, कीं या अधिकारग्रहणामुळं कॉंग्रेसद्वेष्ट्यांचं सामर्थ्य बळावल्यावांचून रहायचं नाहीं. खरं खोटं कोण जाणे, पण गांधीजी या अधिकारग्रहणाला विरोध करीत होते म्हणतात तेंच बरोबर होतं. शेवटचा अधिकार आपल्या हातीं नाहीं तोंवर दुय्यम अधिकार हातीं घेण्यासारखा मूर्खपणा नाहीं—"

"शब्द जरा कठोर होतो आहे वहिनी!" मी म्हणत असें.

"कठोर असला तरी खरा आहे तो शब्द!" वहिनी म्हणे, "हा मूर्खपणाच झालाय. आणि आज उद्यां तो भोंवल्यावाचून रहायचा नाहीं. मोठ्या माणसांना नांवं ठेवायचा आम्हां सामान्य माणसांना काय अधिकार, असं कुणी म्हणेल—पण मी म्हणतें, हा प्रश्नच मुळीं सामान्य माणसांचा आहे. आम्हां सामान्य माणसांचं मत घेतलं असतं, तर माझी खात्री आहे, मंत्रिमंडळ बनवायला बहुजनानीं विरोधच केला असता. हातीं येणारा अधिकार अपुरा आहे हें माहीत असतांनासुद्धां आशाळभूतपणानं त्याचा स्वीकार कर-

ण्यांत चूक झाली आहे, यांत एवढीसुद्धां शंका नाहीं. सामान्य गोष्टी सामान्य माणसांना कळतात—असामान्य माणसांना कळत नाहींत. आणि बहुसंख्य माणसं सामान्यच आहेत. या सामान्यांच्या दृष्टीनं पाहणारा असामान्य माणूस एकच—गांधीजी. पण हल्लीं त्यांचं कुणी ऐकत नाहीं. आहेत हीं सारी मोठीं माणसं वर पाहून चालताहेत; पण या वर पाहण्यापायींच एके दिवशीं त्यांना अशी ठोकर लागेल—"

"काय बोलते आहेस हें वहिनी?" मी म्हटलं, "कुणी ऐकलं तर म्हणेल, शिपायाची बायको बोलतेय."

"अगदीं बरोबर बोललांत, शिपायाची बायकोच बोलतेय—इन्स्पेक्टरसाहेबांची नव्हे—काल 'रावसाहेब' असलेला तो साहेब आज अगदीं 'शिपाई' झाला आहे असं नाहीं तुम्हाला वाटत?"

"तूं कांहीं म्हण वहिनी," मी म्हटलं, "विरोधाशिवाय तुला समाधानच वाटत नाहीं. तुझी प्रकृतीच मुळीं असंतुष्ट आहे—"

"अगदीं बरोबर बोललांत," वहिनी म्हणाली, "माझी प्रकृतीच मुळीं असंतुष्ट आहे. शेंकडा शंभर टक्के पदरीं पडल्याशिवाय माझं समाधान होत नाहीं. नव्याण्णव टक्क्यांवर देखील मी संतुष्ट होणार नाहीं. त्या एका टक्क्यासाठीं मी सारखी झगडत राहीन अन्–तो एक टक्का पूर्णपणें पदरांत पडेपर्यंत माझा झगडा थांबायचा नाहीं."

"तुला मंत्रिमंडळांत घ्यायला हवं होतं," मी हंसून म्हणालों, "मग पाहिली असती तुझी कर्तबगारी."

वहिनी मोठमोठ्यानं हंसली आणि म्हणाली, "असल्या थोट्या मंत्रिमंडळांत जाण्याइतकी मी मूर्ख नाहीं. शिवाय आम्हां बायकांना कोण घेतो मंत्रीमंडळांत?"

"हंसा मेहता आहे ना?—"

"हो! पण ती पार्लमेंटरी सेक्रेटरी म्हणून. मंत्री म्हणून नव्हे. आणखी तिला एक मंत्री म्हणून घेतली असती अन् जें शिक्षणखातं तिच्याकडे आज आहे तेंच देऊन शिक्षणमंत्री केली असती तर काय बिघडलं असतं? पण तें व्हायचं नाहीं. तुम्हां पुरुषांकडून स्त्रीदाक्षिण्याचा बडेजाव मिरवणाऱ्या इंग्लंडांत, मजूर पक्ष अधिकारारूढ झाला तेव्हां एक बाई होती मंत्रीमंडळांत. पण तीदेखील फार दिवस तिथं टिकली नाहीं. बायकांची जात आपल्या बरोबरीनं अधिकार गाजवतेय हें पाहणं पुरुषांना केव्हांही खपायचं नाहीं."

विषयांतर होत आहे हें पाहून मीही तो विषय सोडून दिला.

उषा मात्र मोठ्या खुषींत होती. विरोध करायला तिला आतां चांगलीच सवड मिळाली होती. ती काँग्रेसला शिव्या देऊं लागली, कीं वहिनी आतां तोंडातून एक ब्रही काढीत नसे. वस्तुस्थिति आणि स्वतःचीं मतं यांच्यांत फरक पडल्यामुळं तिचा कोंडमारा झाला होता.

पण उषेला आतां विरोध होत होता तो अगदीं अनपेक्षित अशा व्यक्तीकडून. काँग्रेसमंत्रिमंडळाच्या विरुद्ध एवढंसुद्धां बोललेलं दादाला आतां खपत नसे. तात्विक वाद करायची त्याची केव्हांच तयारी नसे. पण उषा विरोध करूं लागली, कीं पोलिसांच्या हडेलहप्पी थाटानं तो ती चर्चा बंद करायला तिला भाग पाडीत असे.

एक तटस्थ प्रेक्षक या नात्यानं ही विसंगती पहातांना मला मोठी गम्मत वाटत असे. तसं पाहिलं तर मी कोणत्याच पक्षाचा नव्हतों. तरीही पहिल्यापासून वहिनीच्या मतांचा माझ्यावर पगडा बसला होता. तिचीं आताचीं नवीं मतंसुद्धां माझ्या मनाची पकड धरूं लागलीं होतीं.

केव्हां केव्हां मला प्रश्न पडे, व्यक्तीपूजेचा का हा प्रभाव? कां मी वहिनीच्या आहारीं जावं? जितक्या हिरीरीनं उषा समाजवादाच्या गोष्टी बोले तितकी उत्कटता वहिनीच्या चर्चेत नसे—यापूर्वीही नव्हती—तरीही उषेच्या समाजवादानं माझ्या मनावर व्हावा तेवढा परिणाम झाला नाहीं—म्हणूनच मला तसा प्रश्न पडला होता. शिवाय उषेलाही माझ्याबद्दल तेवढासा ओढा नव्हता. आणि माझ्यालेखीं वहिनी म्हणजे माझी आंधळ्याची काठी होऊन राहिली होती.

म्हणूनच मला प्रश्न पडे, कीं हा माझा न्यूनगंड होता का? कीं काँग्रेसबद्दल माझी अंधभक्ति होती? अंधभक्ति कशी म्हणावी? प्रस्तुतच्या काँग्रेसच्या राजकारणाचा जो विरोध ती करीत होती, आणि जो आतां मला पटत होता, तो वहिनीबद्दलच्या माझ्या आदरामुळं, कीं प्रत्यक्ष ते विचार मला पटल्यामुळं?

कायदेभंगाच्या साऱ्या बैठका मी पाहिल्या होत्या. प्रतिसहकार पक्ष, स्वतंत्र मजूर पक्ष आणि मुस्लिम लीग यांचा विरोध पदोपदीं वाढत असल्याचं मला दिसत होतं. आमच्या तिथल्या वृत्तपत्रीय टोळक्यांत जी चर्चा चाले ती या विरोधकांना बहुधा अनुकूल असे. मला वाटलं, म्हणूनच का मला वहिनीचं मत पटूं लागलं होतं? उगीच विचार करायचा शीण डोक्याला द्यायचा नाहीं असं ठरवून मी आपल्या कामाला लागत असें.

त्या दिवशीं वहिनी उदासवाणा चेहरा करून बसली होती. मी ऑफिसांतून आलों आणि पाहिलं तों उषा घरीं नव्हती. खरं पाहिलं तर त्यावेळीं ती घरीं असायची. मी आल्यानंतर कांहीं वेळानं बाहेर फिरायला जायची. दादा घरीं असण्याची केव्हांच निश्चिती नसे.

वहिनीचा चेहरा उतरलेला पाहून मीं विचारलं, " काय झालं वहिनी ? "

तिचं लक्ष कुठंतरी दुसरीकडे होतं. ती एकदम दचकली आणि म्हणाली, " काय म्हटलंत ? "

मला आश्चर्य वाटलं—मीं आलों तें सुद्धां तिनं पाहिलं नसावं. मीं म्हटलं, " अशी कां बसली आहेस वहिनी ? काय विशेष झालं आहे आज ? "

" कांहीं नाहीं ! " असं म्हणून तिनं एक थरथरता सुस्कारा सोडला.

" कांहीं नाहीं कसं ?—" मी एक खुर्ची ओढून तिच्या शेजारीं बसून म्हणालों, " मी आलों तें सुद्धां तुला दिसलं नाहीं.—काय विचारलं तें कळलं नाहीं.—काय झालं आहे वहिनी ? "

एक क्षणभर थांबून वहिनी म्हणाली, " माझं काम कराल भावजी ?—उषेचं लक्षण अलिकडे ठीक दिसत नाहीं. कुठंतरी, कांहींतरी बिघडलंय. कॉलेजांतून आली कीं पुस्तकं फेकून ती कुठं निघून जाते, कुठं असते, काय करते, कांहींच कळूं देत नाहीं. पूर्वी ती सांगत असे—आतां विचारलं तर उत्तर द्यायचं चुकवते. मी सांगू नये तुम्हांला, पण जरा नजर ठेवाल का तिच्यावर ? अशी ही मुलगी, म्हणून जरा काळजी वाटते मला ! "

मी स्तब्ध राहिलों. तसंच कांहीं असल्याशिवाय हें असलं काम करायला वहिनीनं मला कधींच सांगितलं नसतं. मी क्षणभर विचार करीत होतों—आणखी कांहीं विचारणार होतों—बोलायला तोंड उघडतों न उघडतों तोंच—

उषा घाईघाईनं आंत आली. आली तशीच जिन्यावरून धडधड वर गेली. वहिनी तशीच पहात राहिली होती. अगदीं केंविलवाण्या नजरेनं वहिनीनं माझ्याकडे पाहिलं आणि पुन्हां जिन्याकडे दृष्टि फेंकली. एक क्षणभर आम्ही दोघंही जिन्याकडे मुकाट्यानं पहात राहिलों होतों, तोंच तशीच धडधडत उषा खालीं आली आणि पुन्हां बाहेर जायला निघाली.

" थांब उषे,—" वहिनी दरडावून म्हणाली.

जात असतांना दारांतच थांबून मागं वळून बेमुर्वतपणानं वहिनीकडे पहात उषा उद्गारली, " कशाला ? "

शांतपणानें वहिनी म्हणाली, " धांवत धांवत आलीस काय, माडीवर गेलीस काय, अन् आतां तशीच धांवत येऊन निघालीस काय ! आहे काय ? "

" काय असायचं ? " उषा चिडून म्हणाली, " तुझे हे प्रश्न मला नाहीं आवडत ! "

" असं कसं म्हणतेस उषे ? " वहिनी म्हणाली, " माझ्याकडे राहिली आहेस तोंवर माझ्याच तंत्रानं चाललं पाहिजे तुला. "

" हुकूमशाहीचा पहिला धडा का हा ? " नाक फेंदारुन उषा उद्गारली, " इटली-तील मेंढरूं नाहीं मी. "

" अर्थात् नाहीं, " वहिनी म्हणाली, " आर्यकन्या आहेस तूं, तें मला माहीत आहे. "

" नाहीं, " उषा तिरसटून म्हणाली, " मी आर्यकन्या नाहीं, हिंदू महिला नाहीं, भारतीय बाला नाहीं, स्वतंत्र जगतांतील मी एक स्वतंत्र घटक आहें. भेदाभेद मी मानीत नाहीं. "

" आधीं जग स्वतंत्र होऊं दे,—" वहिनी म्हणाली, " आणि जग स्वतंत्र होण्या-पूर्वीं आधीं आपली ही भारतभूमी स्वतंत्र होऊं दे. मग बोलूं आपण स्वतंत्र घटकांच्या गोष्टी. "

ताड्कन् वहिनीसमोर येऊन उभी राहून हातवारे करीत उषा म्हणाली, " या थट्टेच्या गोष्टी नव्हत मिसेस सुलेखा हेगडे ! मी तुझी गुलाम नाहीं कीं सांखळीला बांधलेलं तुझं कुत्र्याचं पिल्लुंही नाहीं—"

" तिथं बैस त्या खुर्चीवर,—" अधिकारपूर्ण रीतीनं समोरच्या खुर्चीकडे बोट दाखवीत वहिनी म्हणाली. तिच्या त्या शांत आणि गंभीर हुकमासरशीं अगदीं न कळत उषा त्या खुर्चीवर बसली.

" आतां ऐक, " वहिनी म्हणाली, " बाबांनीं तुला माझ्याकडे पाठवली आहे—"

" नाहीं, " उषा म्हणाली, " तुझ्याकडे नव्हे—रावसाहेबांकडे ! "

" एकूण एकच ! " वहिनी हंसून म्हणाली. आतां तिचा पूर्वीचा आवेश पार नाहींसा झाला होता. वडील बहीण धाकट्या बहिणीशीं बोलूं लागली होती.

" म्हणजे माझ्याकडेच. ते आणि मी दोन नाहींत. "

" भ्रम आहे हा तुला ! " उषा म्हणाली, " लग्न झाल्याबरोबर नवरा न् बायको एक-जीव झाल्याच्या त्या जुन्या कल्पना आतां विसर. कांहीं एकजीव होत नाहींत तीं दोघं. मला चांगलं कळतं. निदान तुम्हीं दोघंतरी एकजीव झालेलीं नाहीं. आट्यापाट्या खेळतां आहां तुम्हीं एकमेकांबरोबर पण कोंडी कांहीं फुटत नाहीं. तुला सांगून ठेवतें सुलूताई, भलत्या मनोराज्यांत गर्क होऊं नकोस. मी आतां कांहीं लहान नाहीं. उद्यां मी एम्. ए. होईन—कुठं प्रोफेसरसुद्धां होऊन पदवीधर निर्माण करण्याचा अधिकार माझ्या हातीं येईल—या मला तूं जरब दाखवतेस ? "

" नाहीं उषे, " वहिनी शांतपणें म्हणाली, " मी भितें आहे माझ्या कर्माला. तुला त्याची पर्वा नाहीं. पण उद्यां कांही कमीजास्त झालं तर बाबा मला दोष देतील—तुलाही नव्हे आणि तुझ्या रावसाहेबांनाही नव्हे. आतां सांग, धांवत कां आलीस आणि तशीच धांवत कुठं निघालीस ? "

" ऐक तर, " उषा तेवढ्याच गंभीरपणानं म्हणाली, " धांवत आलें इथं रहातें म्हणून आणि धांवतच निघालें मला बाहेर जायचं आहे म्हणून ! " असं म्हणून झट्कन उठून पदर फडफडावीत ती बाहेर निघून गेली.

एक क्षणभर वहिनी तशीच स्वस्थ बसून राहिली. पुन्हां एक मोठा थरथरता सुस्कारा टाकून माझ्याकडे वळून ती उद्गारली, " पाहिलंत ? "

मी यावर काय उत्तर देणार होतों ? उषेचा स्वभाव मला माहीत होता. मुळांत कांहींसुद्धां नसतांना शून्यावर हिमालय उभारण्याची तिची खोड मला माहीत होती. जें मला कळत होतं तें वहिनीला कळत नव्हतं असं कसं समजूं ? मीं म्हटलं, " असं पहा वहिनी, उषेचा स्वभावच हा असा आहे. तुला खिजवण्यांत तिला मजा वाटते. यांत कांहीं विशेष असेल असं मला तरी वाटत नाहीं. "

" तुमच्याशीं बोलण्यांत अर्थ नाहीं. " असं म्हणून वहिनी रागानं उठून निघून गेली.

फारा दिवसांनीं आज दादा पंक्तीला हजर होता. उषा मोठ्या खुषींत होती. दादाला उद्देशून ती म्हणाली, " बरं का रावसाहेब, इथं आम्हीं एक स्टडी सर्कल उघडलं आहे. खूप मुलंमुली गोळा होतात. खूप खूप चर्चा करतों आम्हीं तिथं. एकदां या ना आमचा क्लास पहायाला. "

" खाजगी नात्यानं कीं सरकारी नात्यानं ? " दादानं विचारलं.

" कोणत्याही नात्यानं. " उषा खदखद हंसत म्हणाली, " आतां हा नात्याचा भेद संपून गेला आहे !—"

" नव्या राजवटीमुळं होय ? " मी मधेंच विचारलं.

" तुम्ही गप्प बसा, " माझ्यावर डोळे वटारून उषा उद्गारली आणि लगेच दादाकडे वळून म्हणाली, " काल तुम्ही कॉंग्रेसवाल्यांना तुरुंगांत नेऊन पोहोंचवीत होतां, आतां त्यांच्याच हुकमानं आम्हां कम्युनिस्टांना तुम्हीं बाहेर सोडलंत—कुणी सांगावं, उद्यां हीच राजवट आमची होईल आणि मग आमचे हुकूम तुम्हांला मानावे लागतील. कॉंग्रेसचं प्रस्थ कितीही वाढलेलं असलं तरी भांडवलवाल्यांचा जोरा तिच्यावर चालतोय हें अगदीं उघड उघड दिसतंय. उद्यां ही भांडवलशाही आम्हीं नष्ट केली कीं कॉंग्रेसचं प्रस्थ नाहीसं होईल— "

" आणि साम्राज्यशाही ? " मी मधेंच विचारलं.

" तुम्हीं गप्प बसा हो," वस्कन माझ्या अंगावर येऊन उषा म्हणाली," आपल्याला कळत नाहीं त्यांत माणसानं तोंड घालूं नये !—बरं का रावसाहेब, उद्यां कॉंग्रेसचं प्रस्थ मोडलं, कामकरी शेतकऱ्यांचं वर्चस्व प्रस्थापित झालं—बहुजनांची राजवट प्रस्थापित झाली—कीं तुम्हांलासुद्धां आम्हांला खडी ताजीम द्यावी लागेल—"

" असं होय ? " वहिनी हंसून म्हणाली, " यांची खडी ताजीम मिळवण्या-साठींच का समाजवाद हवा तुला ? कामकरी शेतकऱ्याचं राज्य म्हणे ! कधी गेली होतीस एकाद्या कारखान्यांत ?—एकाद्या गिरणींत ?—तेलाच्या ओंगणानं कधीं मळले होते तुझे कपडे ? आगीच्या भट्टीसमोर उभं राहून ओंजळभर घाम कधीं निघाला होता तुझ्या अंगांतून ? उभ्या जन्मांत कधीं शेत पाहिलं होतंस का ? गुडघाभर चिखलांत कधीं रावली होतीस ? कधीं नांगर पाहिला होतास दोन डोळ्यानीं ? कापणी, बेणणी, मळणी कधीं केली होतीस ? हातोडा कोयता म्हणे ! मूठभर गवत कधीं कापलं होतंस कोयत्यानं ? कीं हातोड्याचे चार घाव कधीं मारले होतेस तापलेल्या लोखंडावर ? कामकरी शेतकरी म्हणे ! रशिअन पुस्तकांचीं नुसतीं इंग्रजीं भाषांतरं वाचून कामकरी शेतकऱ्यांचं नांव घ्यायला शरम वाटली पाहिजे तुला ! जॉर्जेटच्या तलम साड्या, उंच टांचेचे बूट, मूठभर क्रीम्स आणि पसाभर पावडर वापरून शंभर फूट रुंदीच्या रस्त्यावरून कानांत वारं शिरलेल्या वांसरासारख्या उड्या मारीत जायच्यापूर्वीं, वर्ष दोन वर्ष शेतकऱ्याघरच्या कॉलेजच्या टर्म्स भरून एकदां एम्. ए. होऊन ये, शेतकऱ्यांची मा हो—आई हो—आणि मग स्टडी सर्कल सुरू कर. या स्टडी सर्कलची जागा खेड्यांतल्या शेतांत आहे, कारखान्यांतल्या भट्टींत आहे, जंगलां-

तल्या वळचणींत आहे, रस्त्यावरच्या गटारांत आहे; चार मजली इमारतीच्या हवेशीर गच्चीत खास नव्हे. कामकरी शेतकरी म्हणे! अन् हीं तुम्हीं लोकं मटन, मुर्गी, चॉप खाऊन उपासपोटी कामकऱ्यांचं राजकारण करणार! चांगले आठ दिवस उपास करा महिन्यांतून–बरगड्या येऊं देत बाहेर—अन् मग तापलेल्या मातींत नांगराचा फाळ फिरवून पहा, भट्टी–मागासमोर उपासपोटीं काम करून पहा अन् मग कामकरी शेतकऱ्यांचं नांव घ्या. ते तिकडे मवाळ गरीबांचं राजकारण करीत होते–त्यांतलेच हे तुम्हीं. नुसते आरामखुर्चीतले ढेंकणी लढवय्ये!"

"झालं?" उषा म्हणाली, "संपलं तुझं व्याख्यान?"

"नाहीं," वहिनी उद्गारली, "ही सुरवात झाली आहे माझ्या व्याख्यानाची. संपायला फार अवधी लागेल—फार फार वर्षं लागतील."

"म्हणजे इतकीं वर्षं तूं बोलत रहाणार का?" दादा म्हणाला.

दादाकडे पाहून वहिनी गालांतल्या गालांत हंसली आणि म्हणाली, "मीं उषेला सांगत होतें. खरं म्हणजे मी बोलायलाच नको होतं मुळीं. पण हीं मेषपात्रं कामकरी शेतकऱ्यांच्या राज्याच्या गोष्टी बोलूं लागलीं, कीं माझी जीभ माझ्या ताब्यांत रहात नाहीं. लहानपणांतलीं माझीं दहा वर्षं माझ्या आजोळीं गेलीं होतीं. खेड्यांत आहे माझं आजोळ. तिथं शेतावर नाचण्याबागडण्यांत माझं आयुष्य गेलं होतं. मी स्वतः हातीं नांगर धरला नसला, तरी नांगराच्यामागनं चिखलांतून मी हुंदडतें म्हणून आजीच्या हातचा मी मार खाल्ला होता मळणीच्या अंगणांत गाढवासारखं लोळण्यापायीं मला रोज चापट्या खाव्या लागल्या होत्या. कारखाने मी पाहिले नाहींत—उगीच कारखान्यांतून चक्कर मारून येणं म्हणजे कारखाना पाहाणं नव्हे—गिरण्याकारखाने तसे पाहिले आहेत, पण शेतावरचीं सुखदुःखं जशीं मला चाखायला मिळालीं तशीं गिरण्याकारखान्यांतलीं सुखदुःखं मला जाणवलेलीं नाहींत. लहानपणच्या आठवणी कुणी सहसा विसरत नाहीं, म्हणूनच अजून त्या जागत्या आहेत; अन् म्हणूनच एवढं बोलावं लागलं मला. जें कांहीं मी बोललें तें हिच्यासाठीं! बोलल्याचा कांहीं परिणाम हिच्यावर होईल म्हणून कांहीं बोललें नाहीं—बोलायचा उमाळा आला म्हणून मी बोललं, एवढंच. त्यांत तुम्हीं हिशेबांत घेण्याएवढं कांहीं नाहीं—" उषेकडे वळून ती म्हणाली, "अन् तूं सुद्धां विसरून जा माझं बोलणं.—"

"अन् मी ठेवूं का ध्यानांत?" मी विचारलं, "मी ध्यानांत ठेवण्याजोगं त्यांत बरंचसं कांहींतरी आहे असं वाटतंय मला म्हणून विचारलं."

" वाटतंय ना ? " वहिनीनं माझ्याकडे वळून रोखून पाहून विचारलं, " राह्यलं तर ठेवा ध्यानांत. नाहीं तर जा विसरून. माझा कांहींच आग्रह नाहीं. "

त्यानंतर कुणीच कांहीं बोललं नाहीं. पंगत बिघडली होती. उषा आंतल्याआंत भडकलेली असावी असं तिच्या मुद्रेवरून मला वाटलं. उलटून बोलायची संवय विसरून तिनं वहिनीला खरमरीत उत्तरं कां दिलीं नाहींत याचं मला आश्चर्य वाटलं.

त्यानंतर उषेनं स्टडी सर्कलचा उल्लेख आमच्या समोर केला नाहीं. तिचा नित्यक्रम तसाच सुरू होता, तरीही त्या दिवसापासून वहिनीनं तिला कसलासुद्धां प्रश्न केला नाहीं. माझी जिज्ञासा मात्र जागी झाली होती. बुद्धिवंतांच्या या मेळाव्यांत मिसळायचा आपण एकदां प्रयत्न करून पहावा असं वारंवार माझ्या मनांत येत होतं.

संधि समोर होती—पण उषेची मला जितकी भीति वाटत होती त्यापेक्षां वहिनीचा रोष न व्हावा म्हणून मी जास्त माघार घेत होतों.

आमच्या घरांत आलेला तो थंडावा मला असह्य झाला. हें कोंडलेलं पाणी फोडून एकादा पाट काढला पाहिजे, त्याशिवाय आमच्या घरचं वातावरण निवळायचं नाहीं, असं मला वाटलं.

आणि एके दिवशीं मी तशी संधि साधली.





मी विचारल्याबरोबर उषेनं अगदीं उडी मारली. ती म्हणाली, " मी अगदीं हेंच म्हणत होतें. पाहिल्याशिवाय मतं द्यायची आमच्या ताईला मोठी वाईट्ट खोड आहे—"

" मला ती खोड नाहीं, " मीं गंभीरपणें म्हटलं, " मी एक विद्यार्थी आहें. माझं बरंचसं शिकायचं राहून गेलं आहे. तें शिकायची संधि घालवणं मला बरं वाटत नाहीं. त्याच दिवशीं मी सांगणार होतों. पण वहिनीनं विषय भलत्या थराला नेला. मला तें

मुळींच आवडलं नाहीं. आजउद्यां तुम्हीं विचाराल अशी मला अपेक्षा होती म्हणून आजवर वाट पाहिली—पण अलिकडे तुम्हीं सारींच लोकं कशी चुपचाप होऊन राहिलां आहांत. बोलायचा मला धीरच होत नव्हता. शेवटीं मनाचा धडा केला आणि विचारलं. जरा भीतच होतों काय उत्तर येईल म्हणून—"

" पण आतां गेली ना भीति ?" उषा तोंडभर हंसून म्हणाली, "असं भिऊन चालत नसतं बळवंतराव. कार्याबद्दल उत्साह असला म्हणजे भिऊन मागं रहाण्यासारखा गुन्हा नाहीं. झाली ना आतां खात्री ?"

" तें काय सांगायला हवं ? " मीं खुलून म्हटलं, " आतां पश्चाताप होतोय मला. उगीच इतके दिवस फुकट घालवले ! "

अभ्यासेच्छु विद्यार्थ्यांचा हा मेळावा त्यांतल्याच एका विद्यार्थ्याच्या खोलीत जमत असे. पुरुष विद्यार्थ्यांची संख्या आणि स्त्री विद्यार्थिनींची संख्या यांचं प्रमाण साधारणपणें ८० आणि २० टक्के होतं. प्रत्यक्ष चर्चा करण्यापेक्षां हा मेळावा गलगाच जास्त करीत असे.

हें असंच चालत असतं कीं काय अशी पहिल्यानं मला शंका आली. पण थोड्या वेळानं एक गंभीर दिसणारा विद्यार्थी येतांच सारा गलगा बंद झाला. विद्यार्थ्यांचा हा म्होरक्या जितका देखणा तितकाच बुद्धिवान असावा असं त्याच्या मुद्रेवरून दिसत होतं. इतरांवर छाप ठेवायची हातोटी त्याला पूर्णपणें साधली होती. समाजवादाच्या वेगवेगळ्या भागांवर इथं चर्चा चालत असे त्यांतील एका महत्वाच्या विभागाची आज चर्चा होती. तो विभाग उषेकडे होता. विषयाची चर्चा ती मोठ्या पद्धतशीर रीतीनं करीत होती यांत शंका नाहीं. पण चर्चा चालत असतांना क्षणोक्षणीं ती प्रश्नार्थी मुद्रेनं त्या म्होरक्याकडे कां पहात होती तें मला कळलं नाहीं. वर्गाच्या परीक्षेसाठीं शाळा डेप्युटी आले आणि त्यांनीं प्रश्न विचारले, म्हणजे एकादा मुलगा ज्याप्रमाणं डेप्युटीच्या मागं उभे राहिलेल्या आपल्या मास्तराकडे पाहून उत्तरं देतो, तसाच तिचा तो अविर्भाव होता. मला वाटलं उषा त्याची शिष्या असेल. पण आज इथं परीक्षक कोण होता ? कुणाच्या जरबेमुळं ही अशी त्याच्याकडे पहाते ? की आपण करीत असलेल्या वक्तृत्वाबद्दल ती साशंक होती ? आपल्याकडून झालेली चूक इतर विद्यार्थ्यांच्या नजरेला येऊं नये—नव्हे, आपल्याकडून चूक होऊं नये म्हणून त्याच्या मुद्रेवर नजर ठेवून का ती बोलत होती ?

उषेकडे पहायचं टाकून मी त्याच्या चेहऱ्याकडे पाहूं लागलों. उषेच्या भाषणाच्या

अनुरोधानं त्याच्या मुद्रेवर क्षणोक्षणीं फरक होत होते—डोळ्यांनीं संकेत होत होते. असे जे संकेत होत असत त्यांच्या अनुरोधानं तिच्या भाषणांत बदल होत असे. माझ्या शेजारीं बसलेला एकजण आपल्या शेजाऱ्याला हळुच म्हणाला, ' पाह्यलंस कसा खेळवतोय तिला ? जसा कांहीं रिंगमास्तर रिंगणांत नाचवतोय एकाद्या घोडीला ! ' तो दुसरा म्हणाला, ' गप रहा रे. तो पाहील. ससाण्यासारखी नजर आहे त्याची. पाह्यलंस ! ' असं म्हणून तो एकदम गप्प झाला. खरोखरच त्याची नजर तितक्यांत त्या दोघांवरून झट्‌कन फिरून गेली होती.

मला त्या माणसाबद्दल मोठा आदर वाटला. पुढारी व्हायला लायक कुणी असेल तर हाच असंही वाटलं. त्याचा परिचय करून घेण्यासाठीं मी उतावीळ झालों.

उषेचं भाषण संपलं आणि मग प्रश्नोत्तरांना सुरवात झाली. सारेजण एकामागून एक प्रश्न करीत होते. आणि एका क्षणाचीही फुरसत न घेतां तो त्यांच्या प्रश्नांचीं उत्तरं देत होता. त्याजविषयींचा माझा आदर अधिकच वाढला. उगीच या माणसा-बद्दल आपण गैरसमज करून घेतला असंही क्षणभर मला वाटलं.

बैठक संपल्यावर उषेनं माझ्याशीं त्याचा परिचय करून दिला. सारेजण त्याला ' रमेश ' म्हणत. पण तें त्याचं खरं नांव नव्हतं. त्या एकांड्या टोपण नांवानंच सारे त्याला ओळखत. तो एम्. ए. झाला होता. प्रोफेसर होणं त्याला अशक्य नव्हतं. पण नोकरीच्या भानगडींत न पडतां त्यानं ही असली खाजगी प्रोफेसरी पत्करली होती.

भावनेच्या भरांत मी त्या स्टडी सर्कलमधें नांव नोंदवलं. येत असतांना वाटेंत उषा माझ्याशीं कांहींच बोलली नाहीं याचं मला आश्चर्य वाटलं. मी बरोबर असल्यामुळं तिच्या नित्यक्रमांत कांहींतरी अडथळा आला असावा असा मला संशय आला. डोळ्यांच्या बोलक्या भाषेनं, निघायच्या वेळीं, रेमश आणि उषा यांचे जे भाषण-संकेत झाले ते माझ्या नजरेला आल्यावांचून राहिले नाहींत.

घरीं येतांच मींच वहिनीजवळ तो विषय काढला. झालेली हकीकत सांगून मी म्हटलं, " तूं उगीच गैरसमज करून घेतलास वहिनी. हा रमेश कुणीही असो पण मोठा असामान्य माणूस आहे. नुसत्या नजरेच्या जरबेनं सर्वांना खेळवायचं सामर्थ्य आहे. त्याच्या आंगीं "

" पटलं ना हें तुम्हांला ? " उषा उल्हासानं उद्‌गारली, " खरंच, तुम्ही आलांत तें फार उत्तम झालं बळवंतराव. आतां तरी ताईची खात्री होईल. "

" म्हणजे तो तुमचा स्टॅलीन आहे म्हणायचा ! " वहिनी खवचटपणें म्हणाली, " समतेच्या पातळीवर बुद्धिवर्चस्वाची ही जरब कशी काय न्याय्य होऊं शकते याची शंका आहे मला. समतेचीं तत्वं प्रतिपादलीं जातांना समतेची रेषा त्या प्रतिपादकांनीं सुद्धां ओलांडतां कामा नये, असं नाहीं का वाटत तुला उषे ? "

" गांधाळलेली तूं, " उषा म्हणाली, " झांकली मूठ कशाला उघडतेस ? तुम्हां लोकांचं हें काम नव्हे. तूं आपली चरख्यावर सूत काढीत बैस. "

" पाह्यलंत भावजी, हें असं आहे. " वहिनी म्हणाली, " एकाद्या पक्षाचा अभिमान धरला कीं माणूस हें असं बनतं. मग त्याला चर्चा नकोशी होते—"

" चर्चा नको असं मी कुठं म्हटलं ? " उषा म्हणाली, " तुझीं मतं ठाम झालेलीं आहेत. मतं बदलायचीच जर तुझी तयारी नाहीं मग चर्चा करायची कशाला ? "

" छान ! " वहिनी उद्गारली, " तूंच म्हणतेस मी सारखीं मतं बदलतेय म्हणून आणि तूंच असं म्हणतेस ?—त्यांतली मख्खी अशी आहे भावजी, आडवळणांत न जातां तुम्ही भाविकपणें ऐकतां म्हणून ही तुमच्याशी चर्चा करते. माझे वांकडेतिकडे प्रश्न हिला सहन होत नाहींत ! असं आहे तें ! "

" बरं, बरं तसंच, " उषा रुसव्याला येऊन म्हणाली, " तूं मोठी हुषार आहेस—मोठी बुद्धिवान आहेस—मोठी कर्तबगार आहेस, तुझ्याशीं वाद घालायची मला ताकत नाहीं ! झालं आतां ? "

" अगदीं खरं आहे तें, " वहिनी म्हणाली " रागावून म्हटलंस तरी तें अगदीं खरं आहे ! दुसऱ्याचे उसने अन् उष्टे विचार घेऊन काथ्याकूट करीत बसणारीं तुम्हीं वाचाळ माणसं, तुमच्या हातून कांहीं सुद्धां होणार नाहीं. प्रत्यक्ष ज्या कार्याचा उपयोग आहे, अशीं कार्य करणारीं माणसं वाचाळ नसतात. एकदां वाचाळपणाची संवय लागली कीं माणसाच्या हातून कांहींसुद्धां काम व्हायचं नाहीं. "

जळजळत्या संतापानं उषा सळसळत होती. ज्या अधिकारपूर्ण वाणीनं वहिनी बोलली त्या शब्दांच्या जोरानं ती दबकून गेली. पहिल्यापासूनच वहिनीनं तिला हातीं धरून वाढवलं होतं. वडीलकीचा तो जुना संस्कार एकदम झाडून टाकणं उषेला कठीण गेलं. उषा वाचाळ असली तरी असमंजस नव्हती—अबोध नव्हती. वहिनीच्या बोलण्यांत कांहीं तथ्य आहे हें तिला पटलं म्हणूनच ती उगी राहिली.

पण माझा खजाळेपणा जागा झाला होता. तो विषय मला बंद पडूं द्यायचा नव्हता म्हणून मी म्हणालों, " तें कांहीं असो वहिनी, पण तूं एकदां आमच्या या स्टडी सर्कल-मधें येच. थिअरी कळल्याशिवाय प्रॅक्टीस चांगली होत नाहीं. नुसतीं हुकूमाचीं ताबेदार असलेलीं माणसं कामं करायला समर्थ होतात. पण तें तसलं काम करणं म्हणजे नुसती घोड्यामाकडाची सर्कस ठरते. तात्विकतेचा त्यांत अभाव असतो. शास्त्रीय दृष्टीची उणीव माणसाच्या कर्तृत्वाला पायाशुद्धपणा देऊं शकत नाहीं. "

माझ्याकडे न पाहतां वहिनी नुसती हंसली आणि म्हणाली, " बरेच बोलायला शिकलात. तेवढीच उणीव होती तुमच्यांत. पण तें असं आहे भावजी, मला थिअरी नको आणि प्रॅक्टिसही नको. मी आपली माझ्या मतानं चालणारी एक हटवादी व्यक्ति आहें. वाचायचं असलं तर मीच वाचीन. विचार करायचा असला तर माझा मी विचार करीन. मी वाचतें आहें, विचार करतें आहें असं शाबित करण्यासाठीसुद्धां मला दुसऱ्याच्या ओंजळीनं पाणी प्यायचं नाहीं. त्यापायी मला कुणी अडाणी म्हटलं तरी त्याचा अभिमान वाटेल ! "

माझा प्रयत्न फुकट गेला. विषयाची चर्चा जी थांबली ती थांबलीच. काय झालं कोण जाणे, पण वादविवादाला सदा उत्सुक असणाऱ्या उषेनंसुद्धां चर्चेला पुन्हां तोंड फोडलं नाहीं. वहिनीच्या भाषणाचा तिच्या मनावर परिणाम झाला होता, कीं हटवादी माणसाबरोबर वाद घालीत बसण्यांत अर्थ नाहीं असा पोक्त विचार तिनं केला, तें कांहीं सांगतां आलं नसतं.

उषेच्या अभ्यासमंडळांत भाग घ्यायला मी सुरवात केली होती. रमेशबद्दलचा माझा आदर दिवसेंदिवस वाढत होता. काय असेल तें असो, पण तो मात्र माझ्याशीं खुल्या दिलानं कधींच बोलत नव्हता. उषेला तो देवासारखा वाटत होता पण माझा या बाबतींत मतभेद होता. बुद्धिवान् माणसं आपल्या बुद्धीचा उपयोग सर्व प्रकारें करूं शकतात. सारींच बुद्धिवान माणसं कांहीं आपली बुद्धि सत्कारणीं वेचतातच असं नाहीं. बुद्धिमत्तेच्या जोरावर मिळालेल्या अधिष्ठानाचा दुरुपयोग करण्याची प्रवृत्ति कांहीं बुद्धिवान माणसांच्या ठायीं असते, असं वहिनी जें वारंवार म्हणे, तें रमेशला लागू पडत होतं कीं काय, अशी शंका वारंवार माझ्या मनांत येई.

दिवसाचा कार्यक्रम संपला, कीं उषेला बाजूला काढायची रमेशची प्रवृत्ति असे. पण मी निर्लज्जपणानं जळूसारखा चिकटून रहात होतों. मी दूर व्हावं म्हणून रमेशनं खुणे-

मुद्रेनं सुचवलं तरी मी तें मनावर घेत नव्हतों. या दोन्ही गोष्टी उषेच्या ध्यानांत येत नव्हत्या. रमेश मात्र दिवसेंदिवस मला पाण्यांत पाहूं लागला होता अशी माझी खात्री होत चालली.

या अभ्यासमंडळाचं वातावरण गढूळ असल्याचं मला वाढत्या परिचयाअंतीं दिसून येऊं लागलं. अभ्यासापेक्षां अभ्यासाचं ढोंग करण्याची प्रवृत्तीच पुष्कळांच्या ठायीं दिसून येत होती. ज्या कांहीं मोजक्या मुली या मंडळांत येत होत्या त्यांतील बहुतेक सत्कृतदर्शनीं जरी बेछूट दिसल्या तरी वृत्तीनं उथळ आणि नटव्या होत्या. मला दिसून आलं तें हें, कीं या अशा मुलींच्या सभोंवार घोटाळण्यासाठींच पुष्कळसे विद्यार्थी या मंडळांत येत होते.

एके दिवशीं हा माझा अंदाज प्रत्यक्ष प्रमाणानें खरा ठरला. एका मुलीला घेऊन एक सभासद कुठंतरी पळून गेला. गांवांत या गोष्टीची बकवा झाली. हीं दोन माणसं भिन्न जातींचीं असतीं तरी कुणी फारशी कदर केली नसती; पण तीं भिन्न धर्मांचीं होतीं. मुलगी ब्राह्मणाची होती आणि मुलगा ख्रिस्ती होता.

या प्रकारामुळं लोक रमेशच्या कुळकथेची चौकशी करूं लागले. तो कुठला कोण होता हें कुणालाच निश्चितपणें सांगतां येत नव्हतं. मराठी, गुजराती, हिंदी, उर्दू, पंजाबी या भाषा तो स्वतःच्या मातृभाषेइतक्या बेमालुमपणानं बोलूं शके. भाषेवरून त्याचा अंत लागत नव्हता. चेहऱ्याच्या ठेवणीवरून तो महाराष्ट्रीय नसावा हें मात्र नक्की दिसून येत होतं.

बरीच खळबळ सुरू झाली. जो तो विचारूं लागला. पण रमेश कुणालाच दाद देईना. उषेनं विचारलं तेव्हां तो म्हणाला, " माझ्या जातगोताशीं तुम्हांला काय करायचं आहे ? मी एक हिंदी माणूस आहें--विदेशी खास नव्हे. यापलिकडे मला कांहींसुद्धां सांगायचं नाहीं. "

त्या उत्तरानं उषेचं समाधान झालं नाहीं असा मला संशय आला. मी विचारलं तेव्हां ती म्हणाली, " मी विचारलं त्याला, हेंच मुळीं चुकलं. माझ्याहातून ही जी चूक झाली ती तत्वनिष्ठेला साजेशी नाहीं. "

जिवाचा धडा करून मीं म्हटलं, " रमेशबद्दल तुझा जो आदर आहे त्याचं जर प्रेमांत रूपांतर झालं तर तूं काय करशील ? "

" तर आम्हीं लग्न करूं ! " उषा म्हणाली. बोलतांना तिचा स्वर मुळींच वद-

लला नव्हता. ‘ लग्न करूं ’ म्हणणं म्हणजे तिच्या दृष्टीनं अगदीं क्षुल्लक गोष्ट होती अशा ढंगानं ती बोलत होती. ती पुढं म्हणाली, “--किंवा कदाचित् आम्हीं लग्नही करणार नाहीं—तशींच राहूं !— ”

“ तशींच म्हणजे कशीं ? ” मी म्हटलं, “ लग्नाशिवाय लग्न केलेलीं ? ”

“ होय ! ” उषा म्हणाली, “ काय बिघडलं त्यांत ? तुम्ही अगदींच सनातनी दिसतां बळवंतराव. ”

“ पण तसा कांहीं आहे का संभव ? ” मीं भीतभीत विचारलं.

उषा गालांतल्या गालांत हंसली आणि म्हणाली, “ कां ? अजून तुम्हांला आशा आहे वाटतं ? ”

“ कां असूं नये ? आशावादी असणं हा कांहीं गुन्हा नाहीं. मी एक अत्यंत निष्ठावंत माणूस आहें उषे--” पहिल्यानंच मी तिला ‘ उषे ’ म्हटलं, “ मी जितका निष्ठावंत आहें तितकाच प्रेमळ आहें—नव्हे प्रेमी आहें. माझं प्रेम भिंगऱ्या मारीत भिरभिरणारं नाहीं. मी एक निश्चय करून बसलों आहें. त्या निश्चयाला अनुसरून तुझ्या प्रेमाला पात्र होण्यासाठीं जेवढी तयारी करणं अवश्य आहे तेवढी करतों आहें. तुझ्या दृष्टीनं ती तयारी अपुरी असेल--पण मी मात्र माझं सर्वस्व खर्ची घालतों आहें. आशेला कांहीं जागा आहे का मला ? ”

त्या माझ्या अनपेक्षित प्रश्नाचा उषेवर परिणाम झाला नाहीं. अगदीं संथपणें ती म्हणाली, “ एवढ्यासाठींच जर तुमची धडपड असेल तर ती एकदम बंद करा—”

माझा चेहरा उतरला असं पाहून ती म्हणाली, “ तशी मी तुमची अगदींच निराशा करीत नाहीं. कबूतर हा एक पक्षी आहे. मोठा गोंडस आहे. गोजिरवाणा आहे. वापरायला मोठा छान आहे. मजलासुद्धां मारतो मैलच्यामैल. तरीपण कबूतर म्हणजे गरूड नव्हे ! He-man ची उपासक आहें मी ! एवढ्यावरून काय तो बोध घ्या ! ”

एवढ्यावरून काय बोध घ्यायचा तो मी घेतला. आपण फार सामर्थ्यवान आहें ही जाणीव असली, तरीही उषेला आपल्यापेक्षां ‘ जास्त ’ सामर्थ्यशाली जोडीदार हवा होता. जोडीचा जोडीदार नको होता, कीं कमजोर असलेला विजोड जोडीदार नको होता. मला वाटलं, किती लंब्याचवड्या गप्पा मारल्या, तरी शेवटीं ही उषा सनातनीच !

मी उषेशीं वहिनीची तुलना करून पाहूं लागलों. बुद्धिमत्तेखेरीज इतर कोणत्याही बाबतींत त्या दोघींत वृत्तीचं साम्य मला आढळून येईना. त्या बुद्धिमत्तेचा उपयोग

करायला वहिनीला वाव नव्हता. अनुकूलता असती तर तिनं काय केलं असतं याची मी कल्पना करूं लागलों. मला नीटसं उत्तर मिळेना. प्रतिकूल परिस्थितींत तिनं जो झगडा केला तो मला आठवला. झगडा विकोपाला गेला नाहीं हा दादाचा चांगुलपणा किंवा मुत्सद्देगिरी—तें प्रकरण दादानं विकोपाला नेलं असतं तर वहिनीनं काय केलं असतं ?

त्या प्रश्नाचं उत्तर मला सुचेना म्हणून मीं वहिनीला विचारलं तेव्हां ती म्हणाली, "प्रत्यक्षाची गांठ पडल्याशिवाय अनुमान बांधणं मला आवडत नाहीं. माझं मन सांगतंय, आज ना उद्यां केव्हातरी तो प्रसंग येणार. पण तसं कांहीं झालं नाहीं तोंपर्यंत काल्पनिक संकटं उभारून मी माझ्या मेंदूला शीण देणार नाहीं."

क्षणभर मी स्वस्थ राहिलों. वहिनीच्या उत्तरानं माझं समाधान झालं नव्हतं. पण ती तसं सरळ उत्तर देणार नाहीं असं वाटल्यावरून मीं म्हटलं, "उषेची हल्लींची वागणूक तुला पसंत आहे का वहिनी ?"

"कां असं विचारलंत ?"

"परवांची चर्चा आठवली म्हणून !"

"पण तुम्हांला तिचीं मतं पटताहेत—तुम्ही तिच्या अभ्यासमंडळांत जातां—तुम्ही तिची चालचलणूक पहाताहां—तुम्हांला काय वाटतं उषेबद्दल ?"

"अलिकडे मी जरा साशंक होऊं लागलों आहें म्हणूनच तुला विचारलं. त्या रमेशचं न् माझं तितकंसं पटत नाहीं—अन् ही तर त्याच्यावर बेहाय खूष आहे ! तो परवां एकजण त्या एका पोरीला घेऊन पळून गेल्यापासून मी जरा भीति घेतली आहे—" असं म्हणून रमेशबद्दल माझं आणि उषेचं जें भाषण झालं तें मी वहिनीला शब्दशः सांगितलं.

माझं तें निवेदन ऐकून वहिनी बराच वेळ स्तब्ध राहिली. तिच्या कपाळाला आठ्या पडल्या होत्या. भुंवया संकोचल्या होत्या. मेंदूला ताण देऊन ती विचार करीत होती. कांहीं वेळ गेल्यावर ती म्हणाली, "आज तुमच्या अभ्यास-मंडळाचा दिवस आहे का ?—" मीं होय म्हटलं तेव्हां ती म्हणाली, "मग आज मी येतें तुमच्याबरोबर !" खरोखरच मला मोठा आनंद झाला.

तितक्यांत उषा आली आणि तिला जेव्हां ही बातमी सांगितली तेव्हां क्षणभर ती माझ्याकडे आणि वहिनीकडे आळीपाळीनं पहात राहिली.

ती म्हणाली, " आज कां वळला तुझा मोर्चा इकडे ताई ? बळवंतरावांनीं कांहीं तक्रार केली वाटतं ? "

" छे, छे, मुळींच नाहीं." वहिनी म्हणाली, " आतांच आम्ही चर्चा करीत बसलों होतों. इतक्या कांहीं गोष्टी सांगितल्या भावजीनीं, असे तेढे प्रश्न विचारले, कीं मी अगदीं निरुत्तर झालें. म्हटलं एकदा पाहून येऊं हें तुझं अभ्यासमंडळ. तुझी कांहीं हरकत नाहीं ना ? "

" छे छे, मुळींच नाहीं." असं म्हणून उषा एकदम निघून गेली.

मी कांहींतरी बोलणार होतों तोंच वहिनीनं डोळ्याच्या खुणेनं मला दटावलं. जिभेवर येणारे शब्द मी गिळून टाकले. वहिनीनं केलेला तो बेमालूम बनाव पाहून आधींच मी थक्क झालों होतों. त्यावर ही डोळ्याची दटावणी पाहून मी साशंक झालों. उषा आंतून ऐकते आहे कीं काय हें पहाण्यासाठीं मी उठत होतों, तोंच माझा उद्देश अंदाजून वहिनीनं खुणेनं मला खालीं बसवलं.

ती म्हणाली,"—तुमचीसुद्धां हरकत नाहीं ना भावजी ? मला आश्चर्य वाटलं तें हेंच, कीं एवढ्या थोड्या काळांत तुम्हांला एवढं मोठं तत्त्वज्ञान कसं हस्तगत करतां आलं · उषा तुम्हांला निर्बुद्ध म्हणे—मीं कधीं तसं म्हटलं नाहीं अन् म्हणायची नाहीं—पण तशींच शिकवण मिळाल्याशिवाय एवढी कमाई तुमच्या सारख्याला कांहीं सहजासहजीं करतां यायची नाहीं. म्हणूनच मला वाटलं, कीं आपणही या संधीचा फायदा घ्यावा. "

त्या दिवशीं आम्हीं तिघंही अभ्यासमंडळांत गेलों. काय असेल तें असो, पण त्या दिवशीं रमेशच्या क्लासला कांहीं रंग भरला नाहीं. वहिनी आल्यामुळं असं झालं म्हणावं, तर वहिनीची माहिती त्याला असणं शक्य नव्हतं. कदाचित् उषेनं ती माहिती दिली असं धरून चाललं तरीही, त्यानं असं अवसान कां सोडावं याचा अंदाज मला येईना.

घरीं परत आलों तेव्हां वहिनी उषेला म्हणाली, " तूं कांहीं म्हण उषे, पण हा तुझा रमेश मला अगदींच रुक्ष वाटला. अगदीं यंत्रावरच्या तबकडीसारखा बोलत होता—"

" छे, छे वहिनी, " मी म्हटलं, " काय झालं कोण जाणे, पण आजच्या बैठकीला कांहीं रंग भरला नाहीं. रोज किती रसाळ बोलत असतो तो ! कितीही बिकट विषय असो, एखाद्या रंगेल गोष्टीइतका खुलवून सांगतो. नाहींतर मला एवढं कसं पटलं

असतं ? आजच्याच सारखा जर क्लास चालला असता, तर मी तिथं जायचा केव्हांच बंद झालों असतों."

"बळवंतरावांचं म्हणणं अगदीं बरोबर आहे." उषा म्हणाली, "आज काय बिघडलं होतं त्यांचं कोण जाणे! विचारावसं वाटलं होतं, पण संधीच मिळाली नाहीं."

"आणखी असं पहा उषे," वहिनी म्हणाली, "तुमच्या त्या सभासदांत अंतः-करणाच्या कळकळीचीं माणसं फारच थोडीं आहेत असं मला वाटलं. इकडे क्लास सुरू असतांना कांहीं कांहीं जण जोडयाजोडप्यानं आपापसांत कुजबूजत होते, तें कांहीं मला आवडलं नाहीं. असला क्लास म्हणजे शाळेंतल्या क्लाससारखाच चालला पाहिजे—कॉलेजच्या क्लाससारखा नव्हे. अगदीं कडक शिस्त राखली पाहिजे अशा मंडळांतून. कुणी परकं माणूस आलं तर एवढासुद्धां आक्षेप घेतां नये त्यानं."

"किती झालं तरी तूं जातीची मास्तरीण!" उषा नाक फेंदारून म्हणाली, "खेळी-मेळीच्या वातावरणाशिवाय असल्या बिकट विषयांचा अभ्यास चांगल्या रीतीनं व्हायचा नाहीं. तो कांहीं इतिहास, भूगोल, गणित विषयाचा क्लास नव्हे! प्रत्येक चांगल्या गोष्टींत अचुक खोड शोधून काढायची तुझी हातोटी विलक्षण आहे ताई. म्हणूनच तूं अशी असंतुष्ट राहिली आहेस."

"त्या असंतुष्टपणांतच मोठं समाधान आहे उषे." वहिनी गंभीरपणें म्हणाली, "मी कांहीं कुणी पोक्तबाई नाहीं. अजून मुलगीच आहें म्हणेनास. असं काय अंतर आहे तुझ्या माझ्या वयांत? पण शिस्तीचं मला मोठं चोज वाटतं. स्वाभाविक आवड आहे ती माझी. असल्या वर्गांत आधीं शिस्त पाहिजे. तशी शिस्त नसली, कीं सारे अभ्यास फुकट जातात. आजच कांहीं झालं नाहीं—एवढ्यावरूनच कांहीं मी उलट ग्रह करून घ्यायची नाहीं. आतां रोज येणार आहेंच तुझ्याबरोबर, तेव्हां पाहूं कसं काय चालतं तें!"

एक क्षणभरच उषेच्या कपाळाला आंठ्या पडून गेल्या. थोड्या वेळापूर्वीच्या वहिनीच्या मुद्रेची मला आठवण झाली.

अभ्यासमंडळाच्या बैठका रोज होत नव्हत्या. केव्हां आठवड्यांतून दोन दिवस तर केव्हां तीन दिवस असत. वहिनीनं मंडळांत नांव नोंदवलं, दर बैठकीला ती हजर राहूं

लागली, पण रमेशची घडी एकदां जी विस्कटली ती पुन्हां कांहीं नीट बसेना. एकट्या वहिनीची एवढी जरब रमेशनं कां बाळगावी तेंच मला कळेना.

एके दिवशीं मला आधीं सूचना देऊन वहिनी गैरहजर राहिली—आणि आम्हांला पडलेलं कोडं एकदम उलगडलं.





त्या दिवशींच्या अभ्यासमंडळांत रमेशचं वक्तृत्व बेहद्द रंगलं. जणूं काय इतक्या दिवसाचा सूड तो उगवीत होता. 'तर्कशास्त्र विरुद्ध विरोधविकास' हा त्याच्या भाषणाचा विषय होता. आपल्या अमोघ वक्तृत्वाच्या जोरावर त्यानं तो विषय हरिकीर्तना-इतका रंगवला. मी सुद्धां क्षणभर थक्क होऊन गेलों.

कार्यक्रम संपतांच आम्ही जायला निघत होतों तोंच उषा म्हणाली, "तुम्हीं जा आतां. मला थोडं काम आहे. रमेशबरोबर बोलायचं आहे."

"खाजगी?" मीं विचारलं, "—एकांतांत? मी असलों म्हणून काय झालं? हवा तर जरा बाजूला राहीन मी."

"हा लघळपणा पुरे करा," उषा म्हणाली, "तुम्हांला डिटेक्टिव्ह म्हणून ठेवलंय वाटतं कुणी? सुलताईनं का?"

"डिटेक्टिव्ह असतात ते दादांचे," मी म्हटलं, "सुलताईचे नव्हत. पण या प्रकरणीं दोघांचाही संबंध नाहीं. ही डिटेक्टिव्हगिरी माझी स्वतःचीच आहे. माझे हितसंबंध मला राखले पाहिजेत."

"तुमचा काय इथं संबंध?" उषा म्हणाली.

" हें पहा उषे, " मी अगदीं लगट करून म्हटलं, " तूं असं अंगाबाहेर टाकलंस, तरी मी कांहीं माझं ध्येय सोडणार नाहीं."

" कसलं ध्येय ? "

" माझं ध्येय—ध्यान सारं कांहीं तूंच ! तूं विसरली असशील पण मी विसरणार नाहीं. रमेशला तूं भाळलेली आहेस—पण मी तुला सांगून ठेवतों—माझा त्याच्याबद्दल अनादर मुळींच नाहीं—पण तो कुठंही गुंतून पडणारा माणूस नाहीं. डाहाळीवरच्या पाखरासारखा एक दिवशीं भुर्रकन उडून जाईल. "

मला उत्तर देण्यासाठीं तिनं डोळ्याला डोळा देऊन क्षणभर माझ्याकडे रोखून पाहिलं. ओंठावर आलेले रागाचे शब्द तसेच गिळून टाकून ती शांतपणाचा आव आणून म्हणाली, " हें पहा, माझ्याबाबतींत तुम्हीं तोंड घालणं बरं नव्हे. तरीपण आतां बोललांतच म्हणून म्हणतें, मलादेखील तुमच्यासारखाच संशय आला आहे. आज त्या गोष्टीचं मला निराकरण करून घ्यायचं आहे. तेवढ्यासाठींच मला जरा एकांत द्या. "

एक निमिषभरच—विचार करून मी म्हटलं, " बरं आहे, मी जातों. लौकर घरीं ये. "

मी तसाच धांवत पळत घरीं आलों आणि झालेली हकीकत वहिनीला सांगितली. वहिनी नुसती हंसली—कांहींच बोलली नाहीं तेव्हां चिडून मी म्हणालों, " इतकी महत्वाची गोष्ट हंसण्यावारी नेतेस म्हणजे काय ? तुला कांहींच का वाटत नाहीं ? माझ्या नसली तरी उषेच्या कल्याणाची कांहीं चाड आहे का तुला ? "

उभी असलेली वहिनी खालीं बसली आणि मला म्हणाली, " बसा तिथं भावजी, " मी मुकाट्यानं बसलों तेव्हां ती पुढं म्हणाली, " भावजी, तुम्हांला काय वाटतं ?—उषेसारखी मीही उल्लू आहें असं वाटतं तुम्हांला ? तुमचीं सोंगं मला कळत का नाहींत ? उषेसाठीं आपला जीव तळमळतो असं मला दाखवायचा तुम्हीं कितीही प्रयत्न केला, तरी तें मला पटायचं नाहीं ! "

" कां ? " मीं विचारलं.

" मला कांहीं अक्कल आहे म्हणून. चार स्वभावाचीं चार माणसं मीं पाहिलीं आहेत म्हणून. त्यांच्या स्वभावाचे अंदाज मी अजमावले आहेत. माणसाच्या हृदयांत ठेवणीचा म्हणून एक कोपरा असतो, त्या कोपऱ्यापर्यंत नजर पोंचवायची

ताकद मी मिळवली आहे. मला फसवणं सोपं नाहीं भावजी. मी तुम्हांला सांगतें, उषा रमेशला बधणार नाहीं कीं तुम्हांलाही बधणार नाहीं. तुम्हां दोघांनाही आपण खेळवतों आहों असं तिला वाटतंय—पण तुम्हीं दोघेच तिला उलट खेळवीत आहांत हें न कळण्याइतकी ती मूर्ख आहे. तिचा गैरसमज झाला आहे स्वतःबद्दल."

वहिनीच्या भाषणाचं मला हसूं आलं. एका मुलीच्या नाचऱ्या चाळ्यासरशीं आम्हीं दोघेही आपापल्या परीनं उगीच कसे नाचतों आहोंत, तें पाहून क्षणभर मलाही माझं चोज वाटल्यावाचून राहिलं नाहीं. तरीही मी म्हटलं, " तसंही असेल. मी नाहीं म्हणत नाहीं. मी एक अशिक्षित माणूस आहें. जगाच्या दृष्टीनं सुशिक्षित असलेली पण माझी काळजी घेईल अशी बायको मला पाहिजे आहे. तें प्रेमबिम आपल्याला कांहीं कळत नाहीं. मला स्वतःला कांहीं दर्जा नाहीं. तेव्हां बायकोमुळं तरी मला दर्जा मिळावा या आशेनं मी धडपडतों आहें."

" मग धडपडा तर ! " मला धुतकारून वहिनी म्हणाली, " काय तुमच्या नशिबीं आहे कोण जाणे ! सध्यां तरी तुम्हीं उगीच जीव टाकीत बसलां आहां एवढंच."

आम्हीं बोलत होतों तों उषा उड्या मारीतच आली. आली ती सरळ वहिनीच्या गळीं पडली. ती सारखी हंसत होती. तिला हंसण्याच्या उकळ्यावर उकळ्या येत होत्या. ' काय झालं ? काय झालं ? ' म्हणून वहिनी सारखी विचारीत होती तरीही तिला उत्तर न देतां तिच्या मानेला विळखा घालून ती सारखी हंसत होती. म्हटलं, काय एवढं बहिणीचं प्रेम पाघळलं ?

शेवटीं एकदाचं तिचं तोंड उघडलं. आपल्या दोन्ही हातांत वहिनीचे गाल धरून, तिचा चेहरा आपल्या समोर ओढून ती म्हणाली, " झालं ! ठरलं ! ! "

कोरड्या मुद्रेनं वहिनीनं विचारलं, " काय झालं ? काय ठरलं ? "

" माझं लग्न ठरलं ! "

वहिनी सारखी हंसत सुटली. हसतां हसतां ती म्हणाली, " लग्न ठरणं आणि लग्न होणं, याच्यांत जमीनअस्मानचं अंतर आहे. त्यांतून आमच्या लग्नासारखं कांहीं तुझं हें लग्न नव्हे. माझं लग्न ठरलं तेव्हां हे म्हणत होते, कीं थोडे दिवस थांबूं म्हणून. पण आमचे बाबा फार शहाणे—त्यांनीं घाई केली आणि आम्हां दोघांची लग्नगांठ चटकन बांधून टाकली !—"

" तेंच चुकलं ! " असं म्हणून उषेनं चट्कन जीभ चावली. आम्हां दोघांच्याही तें लक्षांत आलं.

" काय चुकलं ? " वहिनी म्हणाली, " इतर चार कुटुंबांपेक्षां काय फरक आहे आमच्या घरीं ? चांगला सुखानं संसार करतों आहों. कांहीं कुठं खिटखिट नाहीं मुळींच !—"

" अन् तुरुंगांत गेलीस ती ? " उषा उद्गारली.

" आतां काय राह्यलं आहे त्याचं ? " वहिनी म्हणाली, " ते देखील झाले कीं आतां खादीवाले. खादीवाल्यांच्याच हाताखालीं नोकरी करताहेत ना आतां ? अन् त्यावेळीं तरी कुठं त्यानीं मला दोष दिला होता ? कीं तुरुंगांतून आलें म्हणून घराबाहेर लोटलं होतं ? असल्या संसाराला सुखाचा संसार म्हणायचं नाहीं तर म्हणायचं तरी कशाला ? "

"बरं, बरं," उषा लाडिकपणानं म्हणाली, " मला कॉंग्रॅट्स् दिले नाहींस कुठं ? "

" लग्न झाल्यावर, " वहिनी हंसून म्हणाली, " नाहींतर लग्न करून संसार थाटून चारदोन वर्षं गेल्यावर ! "

उषा मला खिजगणतींत धरीत नव्हती. माझ्याकडे तिनं ढुंकूनही पाहिलं नाहीं म्हणून मुद्दाम तिच्या समोर जाऊन मी म्हटलं, " I congralutate you on your achievement ! "

उषेनं एकदां वर नजर करून माझ्याकडे पाहिलं आणि तिरस्कारानं मान फिरवली. यावेळीं ती आपल्या वहिणीच्या मांडीवरच बसून राहिली होती. तिचा हा अवास्तव लघळपणा पाहून मनांतल्या मनांत मला तिचा तिटकारा आला होता. कान पिरगाळून एक थोबाडींत द्यावी असं वाटण्याइतका मी चिडलों होतों.

तरीही मीं म्हटलं, " काय दुर्दैव पहा, तसं नाहीं अन् असंही नाहीं. एक सुखाचा बोलसुद्धां माझ्यालागी नाहीं. काय दुर्दैव असतं एकेक माणसाचं ! "

दोघीनींही मला उत्तर दिलं नाहीं म्हणून मी कांहींतरी बोलणार होतों तोंच दादा आला. त्याला पहातांच उषेला मांडीवरून हळूच उठवून वहिनी उभी राहिली आणि म्हणाली, " ऐकलं का, उषेचं लग्न ठरलं ! "

" असं का ? " असं अगदीं बेफिकीरपणें उद्गारून दादा आंत निघून गेला.

वहिनीला आश्चर्य वाटलं नाहीं. पण उषा मात्र दादा गेलेल्या वाटेकडे डोळे लावून बसली होती.

" पाहिलंस ? " वहिनी उषेची पाठ थोपटून तिला म्हणाली, " अशी वृत्ति पाहिजे माणसाची–तरच या धकाधकीच्या मामल्यांत माणूस सुखासमाधानानें राहूं शकतो. "

" कांहींच कसं वाटलं नाहीं रावसाहेबांना ? " उषा जणूं आपल्याशींच उद्गारली.

खरोखरच तिला आश्चर्याचा धक्का बसला होता. दादा कांहींतरी बोलेल, निदान आश्चर्य तरी प्रगट करील अशी तिची अपेक्षा होती. पण ती फुकट गेली. अशावेळीं तिच्या मनाला थोडं बरं वाटावं म्हणून मीं म्हटलं, " ज्याचं लग्न झालं आहे त्याला दुसऱ्याचं लग्न ठरल्याबद्दल कांहीं वाटत नाहीं. कदाचित् वाईटसुद्धां वाटत असेल. ही बातमी ऐकून मी इकडे ढासळून पडलों आहें अन् माझ्याकडे कोण लक्षसुद्धां देत नाहीं. असं आहे हें जग ! " तरीसुद्धां कुणी कांहीं बोलेना.

तितक्यांत कपडे बदलून दादा आला आणि म्हणाला, " एकूण हिचं लग्न ठरलं अं ! कुणाशीं ? "

उषा रुसून बसली होती असं पाहून वहिनी म्हणाली, " तो रमेश म्हणून कुणी कम्युनिस्ट आहे ना, त्याच्याशीं. "

एकदम दचकून उषा म्हणाली, " तुला कसं कळलं ? "

"भावजी आले ना तुझ्याआधीं," वहिनी म्हणाली," त्यांनीं केली होती प्रस्तावना—"

" म्हणजे ? " दादा अगदीं सहजपणें म्हणाला, " तें सुद्धां सांगितलं नव्हतं का हिनें तुला ? कम्युनिस्ट का ! त्यापेक्षां काँग्रेसवाला बरा झाला असता. हल्लीं काँग्रेसचं सरकार आहे––त्यांनींच या कम्युनिस्टांना बाहेर सोडलं. पण इतक्यांतच या बेट्यांनीं विरोधाला सुरवात केली आहे काँग्रेसबरोबर. धोक्याचीं माणसं आहेत तीं. पण तुम्ही बहिणी मोठ्या विलक्षण आहां. धोकाच आवडतो तुम्हांला. हिनें तसा धोका पत्करला आणि आतां ही असा धोका पत्करते आहे. करा झालं गम्मत ! "

" म्हणजे ? " उषा म्हणाली, " तुम्हांला पसंत नाहीं ? "

" माझ्या पसंतीला कोण विचारतो ? "

तिथल्या तिथंच विषय विरघळला.

एकंदरींत मला बरं वाटलं. बरी खोड मोडलीसं वाटलं. उषा फुरंगटून बसली होती. कुणीच तिचं कौतुक करीत नव्हतं.

तो दिवस तसाच गेला. दुसऱ्या दिवशीं ती मला म्हणाली, " ताईचा मला भारी राग आलाय. रावसाहेबांची गोष्ट वेगळी. त्यांच्या पेशानं त्यांना तसं बनवलंय. पण ही माझी वडील बहीण ना ? हिनं नको का कांहीं चौकशी करायला ? "

" अगदीं बरोबर. " मी वडिलकीचा आव आणून म्हटलं, " आमच्या वहिनीचं चुकतं तें इथंच. सारं कांहीं कळायला हवं असतं पण विचारीत नाहीं कांहींच. विचाऱ्याशिवाय कुणीतरी सांगायला हवं असतं तिला. अशी ही एवढी आहे तरी कोण ! "

" आतां हें पहा ! " माझं भाषण हिशेबीं न घेतां उषा म्हणाली, " मी विचारलं, त्यानं होय म्हटलं— पण एक वर्ष थांबायचं असं ठरलंय. बरं झालं का हें ? "

" म्हटलं तर बरं झालं, म्हटलं तर वाईट झालं ! म्हणजे तें असं आहे, दादानं म्हटलं तें कांहीं खोटं नाहीं. ठरवून ठेवलेलीं लग्नं सदोदित घडून येतातच असं काहीं नाहीं. असंच कांहींतरी व्हावं असं मला वाटलं, तर ती माझी चूक का ? "

" स्वार्थाचा बाजार आहे सगळा ! " उषा उद्‌गारली, " माझ्याबद्दल कुणीच कांहीं विचार करीत नाहीं ! "

" मला काय वाटतं, म्हणून तूं विचारलंस—मला काय वाटलं तें मी सांगितलं. यांत स्वार्थ कसला आणि परमार्थ कसला ? वर्षभर वाट पहायची जशी त्याची तयारी आहे तशीच माझीही आहे. नाहीं त्याचं जमलं तर आहेंच मी—एवढंच मी सुचवलं ! "

" नाहींच त्याचं जमलं तर जग कांहीं ओस पडलं नाहीं. नाहींतर मी मुळीं लग्नच करणार नाहीं ! "

अगदीं तिच्यासमोर येऊन उभा राहून तिच्या डोळ्याला डोळा भिडवून मी म्हटलं, " माझं एक सांगणं ऐकून ठेव उषे, हा रमेश तुला खेळवतोय. तो He–man असेल कदाचित्—पण या असल्या He–men पेक्षां माझ्यासारखे It-men बरे ! केव्हांही दगा द्यायचे नाहीं आम्ही लोक ! तुला पटो वा न पटो, माझं सांगायचं कर्तव्य मीं केलं ! " असं म्हणून मी बाजूला जाऊन बसलों.

भारावल्या मुद्रेनं उषा तिथंच बसून राहिली होती. तिच्या मनावर, कोणत्याही कारणामुळं असो, परिणाम झाला होता. तो परिणाम माझ्या बोलण्याचा नव्हता खास.

मग हा कसला परिणाम होता ? जो एक धोक्याचा ध्वनि वहिनीच्या आणि दादाच्या उद्‌गारांत निघाला, त्याचा परिणाम तिच्या मनावर झाला होता का ? कीं दादाच्या

उपेक्षेचा ? कधींही गंभीरपणें विचार न करणारी उषा आज गंभीर मुद्रा करून विचारांत पडली आहे असं पाहून मला समाधान वाटलं.

त्या दिवशीं अभ्यासमंडळाच्या बैठकीला वहिनीसुद्धां आली होती. विषय तोच होता. आज रमेश पूर्वींच्या सारखाच रंगांत होता. त्याच्या भाषणांत संकोचाचा किंवा अस्वस्थपणाचा आज मागमूससुद्धां नव्हता. मला वाटलं, लग्नाचं बोलणं निश्चित झाल्यामुळं आतां त्याला वहिनीची पर्वा वाटत नव्हती. काय गंमत आहे ! जागतिक राजकारणाची एवढ्या अधिकारपूर्व वाणीनं एवढी व्यापक चर्चा करणारा पुरुष एका क्षुल्लक पोरीच्या प्रकरणीं मनाचा तोल असा कसा जाऊं देतो ?

भाषण ऐकण्यापक्षां मी आपल्या मनाशींच खल करीत बसलों होतों. भाषणाचं अनुसंधान माझ्या आटोक्यात नव्हतं. तोंच मी दचकलों—मधेंच वहिनीनं प्रश्न टाकल्यामुळं दचकलों. कोणत्या विधानावर इंग्रजीत तिनं हा प्रश्न केला होता तें मी ऐकलं नव्हतं. वहिनी म्हणाली, "—तर्कशास्त्राचा युक्तिवाद तुम्हांला पटत नाहीं. पण तुमच्या या विरोधविकासवादाचं जें सूत्र म्हणून सांगतात तें सामान्य बुद्धीच्या माणसाला पटावं कसं ? मार्क्सच्या विरोधविकास वादासंबंधें उकल करतांना लेनीननं, निःशस्त्रीकरण हें थीसीस, बचावासाठीं शस्त्र हातीं घेणं हें ॲंटिथिसीस आणि शांततेच्या प्रस्थापनेसाठीं आंतरराष्ट्रीय सिव्हिल वॉर करणं हें सिंथिसीस, असा जो दंडक दिला आहे त्याचं काय ? तर्काला तर राहोच, पण सामान्य बुद्धिला तरी हे परस्पर विरोध पटतील का ? मग आमच्या वेदांताला कां हंसायचं ? हा तुमचा विरोधविकास अशा विसंगतीमुळं शास्त्रीय स्वरूपाचा कसा ठरेल ? "

रमेश क्षणभर घाबरला. लगेच अवसान आणून त्यानं तर्कशास्त्रावर मारा करायला सुरवात केली. विरोधविकासाचं मंडन करण्यापेक्षां तर्कशास्त्राचं मुंडन करण्याकरतांच तो आपलं वक्तृत्व खर्ची घालूं लागला. बुद्धिवादी माणसाला तें पटलं नसतं. मी कांहीं बुद्धिवादी असल्याचा टेंभा मिरवीत नाहीं. पण आजवर झालेला माझ्या मनावरचा परिणाम आजच्या चर्चेनं डळमळला. विरोधविकासवादाच्या मुळाशीं बुद्धीपेक्षां भावनेचंच प्राबल्य जास्त आहे असं मला वाटूं लागलं.

इतर कांहींही असो, पण या लहानशा गोष्टीमुळं वहिनीबद्दलचा माझा आदर दुणावला. उषादेखील थोडीशी डळमळली असावी असा मला संशय आला.

त्या दिवशीं उषा आमच्याबरोबरच घरीं आली. येतांना रस्त्यावर तीच चर्चा चालली होती. घरीं आलों तरीसुद्धां ती चर्चा संपली नाहीं.

मला वाटलं, अतिशय कुशलतेनं वहिनीनं उषेचा बुद्धिभेद करायला सुरवात केली होती. ज्या गोष्टीच्या आधारावर रमेशचा मोठेपणा अधिक उंचावला होता, त्या गोष्टीच्या मुळावरच घाव घालायला तिनं ही सुरवात केली होती.

अलिकडे हीच चर्चा घरीं रोज चाले. या नव्या तत्वज्ञानाचा सुद्धां वहिनीनं सखोल अभ्यास केला होता असं मला दिसून आलं. एवढा अभ्यास केला असूनही ती गांधीवादी राहिली म्हणून उषा तिची थट्टा करी. गुलामाचं राजकारण मार्क्सनं हाताळलं नव्हतं म्हणून मार्क्सचं तत्वज्ञान आम्हांला उपयोगी नाहीं, असं जें वहिनी म्हणे तें उषेला पटलें नाहीं तरी मला पटे.

पण या तत्वज्ञानाशीं मला कांहीं करायचं नव्हतं. आधीं आपण आपल्या राष्ट्रापुरतं पाहूं या, असं जें वहिनी म्हणे, त्याच प्रमाणें मीही म्हणत असें, कीं आपण आपल्या कुटुंबापुरतं बघूं या.

उषेचं काय होणार? तसं पाहिलं तर उषा आमच्या कुटुंबांतली नव्हती. आमच्या कुटुंबांत येऊन ती गुंतून पडली होती, म्हणूनच मला तिची काळजी वाटत होती. भलता बनाव करून दाखवायचा मी कितीही प्रयत्न केला तरी उषेबद्दल मला एवढं सुद्धां आकर्षण नव्हतं. तसं पाहिलं तर मला कुठल्याच मुलीबद्दल कसलंच आकर्षण वाटत नसे. पुण्यांत आल्यापासून आणि विशेषतः वर्तमानपत्राच्या कचेरींत काम करूं लागल्यापासून कॉलेज विद्यार्थी आणि विद्यार्थिनी यांच्यांत मी मिसळूं लागलों होतों. कांहीं मुलींचीं नावं घेऊन माझी थट्टाही केली जात असे. पण अलिकडे माझी दृष्टी बिघडली होती. गुण पहाण्यापेक्षां दडून राहिलेले दोषच मी हुडकीत असें, त्यामुळं प्रत्येक मुलगी मला जोडीदारीण व्हायला नालायक आहे असं मला वाटे. पुण्यासारख्या मुलींच्या साम्राज्यांत जिथं मला अनुरूप वधू शोधून सांपडेना, तिथं माझं पुढं होणार कसं याचीच मला काळजी पडली.

"मग तुम्हांला बायको हवी तरी कशी?" वहिनीनं मला एके दिवशीं विचारलं. उषा त्यावेळीं तिथं नव्हती. मी म्हणालों, "तुझ्यासारखी!"

"माझ्यासारखी एक मीच आहें!" वहिनी न हसतां म्हणाली, "जगाच्या दृष्टीनं मी असामान्य नसेन, पण इतरांपेक्षां मीं अगदीं वेगळी आहे असं मला वाटतं. जगाच्या

इतिहासांत माझी कर्तबगारी कदाचित् रुजू होणार नाहीं—परिस्थितीनं मला मारून टाकलंय्—पण माझा हा अकर्तेपणासुद्धां असामान्य आहे, असा माझा ठाम समज आहे. असली असामान्य बायको घेऊन तुमचा कसा निभाव लागणार ? ”

“ तें खरं आहे, ” मीं म्हटलं, “ पण मला ‘ पती ’ व्हायचं नाहीं—धनी व्हायचं नाहीं—मालक व्हायचं नाहीं ! मला एक जोडीदार पाहिजे आहे. नुसता तोडीचा नव्हे—लहान असलेल्या मला मोठा करणारा जोडीदार मला हवा आहे. एकाच व्यक्तीच्या ठायीं सखा आणि माता या दोन्हीं दृष्टीनं मला पहातां येईल, अशी जोडीदारीण मला पाहिजे आहे. ” बोलतांना मी जीव तोडून बोलत होतों. माझ्या वाणींतली आत्यंतिकता या लिहिलेल्या शब्दांत सांपडायची नाहीं.

“ हें नामर्दपणाचं लक्षण आहे ! ” वहिनी म्हणाली, “पुरुषाचा स्वाभाविक धर्म—धर्म म्हणजे attribute—पुरुषाचा धर्म म्हणजे दुसऱ्यावर सत्ता गाजवणं. सत्तेवरची मालकी शाबूत ठेवणं—त्यालाच म्हणतात मर्दपणा. स्त्री म्हणजे सत्ता आहे पुरुषाची. महाभारतांतला तो एक हरामखोर म्हातारा सांगून गेला—त्यानंच द्रौपदीला पांडवांची सत्ता ठरवली. पण तिथं एक दुसरा शहाणा म्हातारा होता. चर्मचक्षूनं आंधळा होता पण अंतर्दृष्टीनं डोळस होता. त्यानं भीष्माचा निकाल खोडून काढला. मोठ्यांच्या अर्ध्या वचनांत रहाणारे आम्हीं लोक, महाभारतांतल्या भीष्माचा निकाल आम्हीं ग्राह्य धरला अन् धृतराष्ट्राचा निकाल विसरून गेलों. तेंच चाललंय् अजून. शास्त्राच्या अर्ध्या वचनांत राहिलों आहोंत आम्हीं, तिथं तुम्हांला नि मला विचारतो कोण ? ”

विषयांतर करण्यासाठीं मीं म्हटलं, “ मी विचारतोंय् ना !—तुला विचारतोय् ना मी ! भावनेला बळी पडून नव्हे—तर्ककर्कश बुद्धिवादानं विचार करून पाहतों तेव्हां वाटतं, जोडीदारीण पाहिजे, म्हणजे मी म्हटलं तशीच ! ”

“ मग जन्मभर अविवाहित रहा ! ” वहिनी म्हणाली, “ प्रपंचच वाढवायचा असेल तर कुणाही पोरीशीं लग्न करा, चार मुलं होतील, उद्यां तुम्ही मेलांत कीं तुमचं श्राद्ध करतील—पिंड देतील—आंगठ्यानं पाणी देतील—आयुष्यभर संसाराच्या नरकांत पिचत राहिलांत तरी मेल्यावर स्वर्गात जाल ! ”

“ तुला खरोखरच का असं वाटतं ? ” मीं म्हटलं.

“ तर मग मी खोटं बोलतें असा का तुमचा समज आहे ? जगाच्या समजाच्या भाषेनं मी बोलतें आहें. मेल्यावर माणूस स्वर्गात जातो कीं नरकांत जातो, त्याला

पुनर्जन्म आहे कीं नाहीं, या गोष्टींचा मला विचारच करायचा नाहीं. तसले वायफळ विचार करायसाठीं डोक्याला शीण द्यायची माझी इच्छा नाहीं. आज आपण जिवंत माणसं आहोंत, उद्यां आपल्याला मरायचं आहे आणि मरेपर्यंत जगायचं आहे; तें जगायचं कसं याचा विचार केला पाहिजे. गेल्या जन्माची आठवण आज नाहीं हें पटतंय तोंपर्यंत, पुढल्या जन्माची किंवा मेल्यानंतर काय होईल याची हवी कशाला काळजी ? म्हणूनच म्हणतें, पुढल्या जन्मावर विश्वास ठेवणाराला डोळे झांकून जोडीदारीण शोधणं शोभतं. त्या तसल्या लोकांवर विश्वास ठेवून मी फसलें—श्राद्धाचा धनीसुद्धां अजून जन्माला आला नाहीं ! पश्चात्ताप होतोय असं कसं म्हणूं ? पण दुःख होतंय !—यातना होताहेत जिवाला !—तिळतिळ तुटतोय् जीव अहोरात्र ! यावरून काय धडा घ्यायचा तो घ्या नि सावध व्हा ! " असं म्हणून तिच्या नित्याच्या संवयीप्रमाणें ती झट्कन् तिथून निघून गेली.

वहिनी निघून जायला आणि उषा घरांत यायला एकच गांठ पडली. तिचा चेहरा उतरलेला होता, तरीही ती माझ्याकडे पाहून म्हणाली, ' सचिंतसे बसलांहां ? "

" कोण ? मी ? " मी मोटमोठ्यानं हंसून म्हटलं, " मला कसली आली आहे चिंता ? एक चिंता होती तिचा निकाल लागला. तुझं तें जुळून गेलं—"

" थांबा—" उषा एकदम गंभीर होऊन म्हणाली. शेजारची एक खुर्ची ओढून ती अगदीं माझ्याजवळ येऊन बसली आणि शक्य तितक्या हलक्या स्वरांत म्हणाली, " तो मुसलमान आहे ! "

" कोण तो ? "

" तो—रमेश. रमेश नांव घेतलेला तो माणूस मुसलमान आहे. त्याचं नांव आहे–"

" त्याच्या नांवाशीं मला कांहीं कर्तव्य नाहीं. अन् असं पहा उषे, त्याचं नांव काय आहे तें कुणाला सांगूं नकोस. निदान दादाला तरी सांगूं नकोस ! कॉंग्रेससरकार असलं तरी तें सरकार आहे. पळपुट्या माणसाला तिथं गय व्हायची नाहीं. "

उषा क्षणभर स्तब्ध राहिली आणि म्हणाली, "खरं आहे तें. पण आतां मी काय करूं ? "

" काय करूं म्हणजे ? " मीं बेफिकीरपणें म्हटलं, " लग्न कर. धर्म मानीत नाहीं ना तुम्हीं लोक ? "

" तें खरं आहे, " उषा म्हणाली, " पण काय असेल तें असो, मनाला कसंसंच वाटतं. मुसलमानाशीं लग्न करायची कल्पना—छे ! नव्हेच तें ! "

मी पोट धरधरून हंसलों. मी म्हणालों, " ही तुमचीं तत्वं ! हें तुमचं तत्त्वज्ञान ! ही तुमची समता ! ! हें तुमचं विश्वबंधुत्व ! ! हा तुमचा समाजवाद अन् विरोध— विकासवाद ! छान ! "

ताड्कन खुर्चीवरून उठून वस्कन माझ्या अंगावर येऊन उषा म्हणाली, " आनंद झाला तुम्हांला—नाहीं ? गम्मत वाटली ! माझी फजिती झालीशी वाटली ? आतां आपलं फावलं असं वाटलं ! नाहीं ? विसरा तें ! याचं आतां कांहींही होवो, पण प्राण गेला तरी मी तुमच्याशीं लग्न करणार नाहीं. "

आतां मात्र मी गंभीर झालों. उषा तशीच सळसळत उभी होती. तिच्या-समोर जाऊन म्हणालों, " माझ्याशीं लग्न कर कीं करूं नकोस—तो या वेळचा प्रश्न नाहीं. प्रश्न आहे तो एवढाच, कीं तुम्हां लोकांच्या बोलण्यांत आणि वागण्यांत किती अंतर आहे ? तुम्हीं जात मानीत नाहीं, धर्म मानीत नाहीं, असं तोंडानं म्हणतां; जातिनिष्ठ, धर्मनिष्ठ माणसांना उठल्यासुटल्या शिव्या देतां—आणि आतां मुसलमानाशीं लग्न करायचा प्रसंग येतांच 'कसंसंच वाटतं' होय ? छाती असली तर या मुसलमानाशीं लग्न कर—नाहीं तर तूं ढोंगी आहेस, दांभिक आहेस, वाचाळ आहेस, नालायक आहेस असं मी म्हणेन. पाहूं आतां तुझा कम्युनिझम ! " असं म्हणून मी खरोखरच चिडून तिथून निघून गेलों.

***



त्या दिवशींची माझी चीड फुकट गेली. उषेला पडलेला पेंच आपोआप सुटला. दिल्लीच्या वारंटावरून रमेशला पकडून नेण्यांत आलं.

रमेश मुसलमान आहे हें उषेनं वहिनीला सांगितलं नव्हतं. माझी खात्री होती, कीं उषेनंच ही दादाकडे चुगली केली असावी. पूर्वीपासूनच त्याच्यावर वॉरंट असल्याचं तिला माहीत होतं. आपल्या मार्गातला कांटा बिनबोभाट काढून टाकण्यासाठीं तिनं

ह्या असा उपाय योजलेला पाहून मला तिचा तिटकारा आला. वहिनीला मी तसं सांगितलं तेव्हां ती म्हणाली, " कदाचित् हा तुमचा खोटा संशय असेल भावजी. इतर कुणी कदाचित ही बातमी दिली असेल. तुमच्या मनांत अलिकडे उषेबद्दल कलुषितपणा आलेला आहे, त्यामुळंच कदाचित् तुम्हीं हा गैरसमज करून घेतला असेल."

" नाहीं वहिनी, " मीं म्हटलं, " ती माझीच चूक आहे. दादाला त्याचं नांव सांगूं नको असं मी चट्‌कन बोलून गेलों आणि तिनं त्या माझ्या बोलण्याचा फायदा घेतला, यांत मुळींच शंका नाहीं. नाहींतर दादाच कसा त्याला पकडायला गेला ?—"

" असं ? " वहिनी आश्चर्यचकित होऊन म्हणाली, " त्यांनीं पकडलं त्याला ? काय चमत्कार आहे !—" ती क्षणभर थांबली आणि म्हणाली, " कांहीं अर्थ नाहीं विचारण्यांत. मी विचारलं तरी ते सांगायचे नाहींत. काँग्रेसच्या राजवटींत सुद्धां कम्युनिस्ट पकडले जातात असं म्हणून ते स्वस्थ बसतील. एवढं बरं, कीं हें वॉरंट इथलं नाहीं—दिल्लीचं आहे. "

" आतां तें अभ्यासमंडळ आपोआपच बंद पडलं. " मी म्हटलं, " रमेश नाहीं म्हणून हें अभ्यासमंडळ कां बंद पडावं ? अभ्यासमंडळाला कांहीं कुणाचा विरोध नव्हता. तीं माणसं प्रामाणिक असतीं तर त्यांनीं मंडळ असं बंद पडूं दिलं नसतं. "

" दिखाऊपणाचा बाजार आहे सगळा ! प्रामाणिक फारच थोडे—एकाद्या हाताच्या बोटांवर मोजण्याइतके. म्हणूनच आमच्या चळवळी यशस्वी होत नाहींत. तात्पुरत्या अधिकाराच्या आशेनं आजसुद्धां—कालचे विलायती कपडे फेकून आज खादी चढवून किती माणसं काँग्रेसमध्यें घुसलीं आहेत ! हें असंच चालायचं. गांव आहे तिथं महारवाडा हा असायचाच. "

तरीही शेवटीं वहिनीनं दादाला विचारलंच आणि त्यानं उत्तरही तिच्या अपेक्षेप्रमाणं दिलं. मला वाटतं, दादा उषेकडे बोलला असावा. एकदां मला गांठून ती म्हणाली, " रमेशचं नांव रावसाहेबांना मीं सांगितलं, असं कुणी सांगितलं तुम्हांला ? "

" कोण म्हणतो असं ? " मी विचारलं.

" रावसाहेबच म्हणत होते ! "

" या बाबतींत दादाचं आणि माझं भाषण सुद्धां झालं नाहीं. "

पुढं ती कांहीं बोलली नाहीं. पण बराच वेळ ती माझ्याकडे नुसती पहात राहिली होती. चेहऱ्यावरची एकही रेषा न बदलण्याची मी खबरदारी घेतली होती. तिच्या

मनांतला संशय कांहीं केल्या जात नव्हता. आपलं बिंग बाहेर आलं या संशयानं ती घाबरली होती. तिच्या मुद्रेवर तसं स्पष्ट दिसत होतं.

" तुम्हींच सांगितलं असेल कदाचित्—" ती एकदम म्हणाली.

" गप्प बैस ! " मी चिडून ओरडलों, " त्याचं नांव तूं मला सांगत होतीस पण मी सांगूं दिलं नाहीं तें आठवतं का तुला ? दादाकडे बोलूं नकोस असं मी म्हटलं, तोच माझा गाढवपणा झाला. तोच धागा घेऊन तूंच ही झक्मारलीस—आतां माझी खात्री झाली ! "

ती ओशाळून गप्प राहिली. गुन्ह्याची कबूली तिच्या चेहऱ्यावर दिसत होती.

" किती क्षुद्रपणा केलास हा उषे ! मुसलमानाशीं लग्न करायचं नव्हतं तर स्पष्ट त्याला तसं सांगायचं होतंस. आज काम करीत असलेल्या माणसाला तुरुंगांत पाठवून देण्यांत कांहींच का वाटलं नाहीं तुला ? सुशिक्षित माणूस—त्यांतून एक मुलगी—स्वतःच्या स्वार्थासाठीं एवढ्या अधोगतीला जाईल असं मला मुळींच वाटलं नसतं. आज माझी खात्री झाली, हा गुन्हा तुझाच ! "

उषेच्या डोळ्याला टचकन पाणी आलं. ती बोलण्याचा प्रयत्न करीत होती पण तिच्या तोंडून शब्द बाहेर फुटत नव्हता. बाहेर फुटणारा रडण्याचा उमाळा दिसून येईल म्हणून ती झट्कन तिथून निघून गेली.

थोड्या वेळानं वहिनी बाहेर आली आणि म्हणाली, " काय झालं उषेचं ? काय बोललांत तिला ? अशी का रडतेय ती ? "

" तें तिलाच विचार ! " मीं म्हटलं, " माझा संशय खरा होता. न बोलतां का होईना, पण तिनं अशी रडून कबूली दिली माझ्याजवळ ! "

वहिनी ताठरल्यासारखी होऊन स्वस्थ राहिली.

" उषे, इकडे ये—" वहिनी ओरडली.

डोळे पुशित पुशित उषा बाहेर आली तेव्हां वहिनी म्हणाली, " खरं सांग—इथं कुणी गळा कापीत नाहीं तुझा—रमेशचं नांव तूं सांगितलंस ? " मान खालीं घालून उषा स्वस्थ राहिली असं पाहून वहिनी पुढं म्हणाली, " नाहीं बोललीस तरी चालेल, पण खोटं बोलूं नकोस—हंः ! एकूण तूंच सांगितलंस ! केवढी अधोगती झाली ही तुझी ! आतां असं कर—पुण्याचा मुक्काम पुरे झाला—आतां मुंबईला जा. माझ्या घरीं राहूं नकोस. विश्वासघातकी माणसाची मला शिसारी आहे ! "

ओक्साबोक्शीं रडत उषा आंत गेली. वहिनी तिथंच एका कोचावर बसली आणि म्हणाली, " माफ करा भावजी, मी उगीच तुम्हांला दोष दिला. माझी बहीण इतकी नादान निपजेल असं मला वाटलं नव्हतं ! "

तो प्रकार पाहून मी स्तंभित झालों. गोष्टी एवढ्या थराला जातील अशी मला कल्पना नव्हती. वहिनीचा त्यावेळचा आवेश पाहून मी थक्क झालों. तिनं आरडाओरडा केला नव्हता—थयथयाट केला नव्हता—एक वांकडा शब्द सुद्धां ती बोलली नव्हती; पण जे चारदोन शब्द तिच्या तोंडून निघाले तेवढ्यानंच उषा मेल्याहून मेली झाली होती.

दादा आला तेव्हां वहिनी त्याला म्हणाली, " उषा उद्यां जाणार आहे मुंबईला. "

" कां ? " नित्त्याच्या निर्विकार पद्धतीनं दादानं विचारलं.

" तें तुम्हांला माहीत आहे. " वहिनी गंभीरपणें म्हणाली, " विश्वासघातकी माणूस माझ्या घरीं नको. "

" कसला विश्वासघात केला तिनं ? " डोळे वर करून दादानं विचारलं.

" तें तुम्हांला माहीत आहे, " वहिनी तितक्याच निश्चयानं म्हणाली, " आतां त्याची चर्चा नको." असं म्हणून वहिनी निघून गेली.

दादा नुसता हंसला आणि वर निघून गेला. त्याच्या मागोमाग दुसऱ्या कुणाची पावलं वाजलीं म्हणून मीं डोकावून पाहिलं तेव्हां उषासुद्धां त्याच्या मागोमाग वर जात होती असं मला दिसून आलं. तिच्या मागोमाग मीही वर गेलों. पाहिलं, तों आंत गेल्याबरोबर उषेनं दादाच्या खोलीचा दरवाजा झांकून घेऊन आंतून कडी लावली. दाराला कान देऊन मी उभा राहिलों.

आंत दोघंही इतक्या बारीक आवाजांत कुजबुजत होतीं, की आंत कुणी बोलत असेल अशी बाहेरून ऐकणाराला शंकासुद्धां आली नसती. कान फाडफाडून ऐकायचा मी प्रयत्न केला पण नीटसं कांहीं ऐकूं आलं नाहीं. मधून मधून माझं वहिनीचं आणि क्वचित् रमेशाचं नांव ऐकूं आल्याचा मला भास झाला. कदाचित तिनं तीं नांवं घेतलींही नसतील.

इतक्यांत मागून कुणी डिंवचलं. वळून पहातों तों वहिनी ! मला खुणेनं खालीं बोलावून ती तशीच चोरपावलानं खालीं गेली. अभ्यास चुकवलेल्या शाळकरी मुलाइतका भीत मी खालीं आलों तेव्हां वहिनी म्हणाली—चांगली दरडावून म्हणाली, " काय

चाललं होतं ? चोरून ऐकणं ही बायकांची खोड म्हणतात—तुम्ही चांगले सुविद्य पुरुष—काय चाललं होतं हें ? ”

मला चार छड्या मारल्या असल्या तरी पत्करल्या असत्या, पण त्या शब्दांनीं माझे कान धरून पिरगळल्यासारखं मला वाटलं. हजार उत्तरं मला सुचत होतीं पण एक शब्द तोंडावाटे फुटेना. मी चांचरत बोलायला सुरवात केली. “ माफ कर वहिनी—मला तें बरं वाटलं नाही—तुझ्यासाठीं म्हणून—”

“ कांहीं नको कुणी माझी काळजी घ्यायला ! ” वहिनी म्हणाली, “ मला चांगली कल्पना आहे प्रत्येक गोष्टीची. त्यांना वर जातांना मीही कांहीं पाह्यलं नव्हतं असं नाहीं पण मी गेलें का कान लावायला ? आणि तुम्ही पुरुष, आम्हां बायकांना चोरट्या म्हणतां—उतावीळ म्हणतां—अन् ते तुम्हीं हे असे ! हंः ! ” असं म्हणून ती झट्कन तिथून निघून गेली.

मला मेल्याहून मेल्यासारखं झालं होतं. कसला संचार झाला होता आज वहिनीच्या अंगांत ? माझ्यासमोर ती उभी राहिली तेव्हां मी कीड मुंगी झाल्यासारखं मला वाटलं. त्या प्रकरणाचा तिच्या मनावर कांहींतरी भलताच परिणाम झाला होता, त्यामुळं हिमालयाच्या शिखरावर उभं राहून खालीं पाहिल्यागत ती आम्हां सर्वांकडे पहात होती असंच मला वाटलं.

चुरगाळून फेंकलेल्या कागदाच्या तुकड्यासारखी माझी स्थिति झाली होती. मी तिथंच एका आरामखुर्चीवर आडवा पडलों. उभं रहाण्याचं सुद्धां मला सामर्थ्य राहिलं नव्हतं.

कुणाची तरी पावलं वाजलीं म्हणून नजर वर करून पाहिलं तों उषा हंसत हंसत हातांतली बॅग गरगर फिरवीत बाहेर निघून गेली. मी थक्क झालों. रडत वर जाणारी उषा खालीं येतांना हंसत आली कशी ? एकदां जाऊन वहिनीला कळवावं असं मनांत आलं होतं, पण तिचं तें कांहीं वेळापूर्वीचं अवसान आठवून स्वस्थ राहिलों.

दुसऱ्या दिवशीं भल्या पहांटे उठून वहिनी खालीं आली आणि चहाच्या तयारीला लागली. सकाळची गाडी गांठायची उषेसाठीं ही तयारी असावी असं मला वाटलं. तिनं उषेला उठवलं, चहा घ्यायला लावलं आणि तिच्या सामानासुमानाची ती जमवा-जमव करूं लागली. तोंडधुणं उरकून उषा आली आणि म्हणाली, “ आज जात नाहीं मी आतां. ”

" तर केव्हां जाणार आहेस ? संध्याकाळीं ? " वहिनीनं विचारलं.

" आतां नाहीं—" उषा म्हणाली, " संध्याकाळीं नाहीं, उद्यां नाहीं, परवां नाहीं—केव्हांच नाहीं. मी इथंच रहाणार. "

वहिनीचं मस्तक भणभणलं असावं असं तिच्या मुद्रेवरून दिसत होतं तरीही ती शांतपणें म्हणाली, " ही अवज्ञा बरी नव्हे उषे. "

" आतां आज्ञा पाळायची कुणाची ? " उषा बेमुर्वतपणें उद्गारली, " तुझी कीं तुझ्या नवऱ्याची ? घरचे मालक ते आहेत. त्यांची आज्ञा मोडणं मला योग्य वाटत नाहीं ! "

" अन् माझी आज्ञा मोडणं ? "

" तूं कोण ? नुसती बायकोच ना ? काय अधिकार आहे इथं तुला ? काल तूं मला घालवून द्यायला निघालीस. आज इथं मी ही अशी बसून रहातें आहें. असली कांहीं ताकद तर घालव पाहूं मला घराबाहेर ! "

वहिनी नुसती फणफणत होती. एक आंवढा गिळून ती म्हणाली, " उषे, तुझ्या कल्याणाची गोष्ट मी तुला सांगतें. एवढें धिंडवडे झाल्यावर तूं इथं रहाणं बरं नव्हे, हें तुझं तुलाच कळायला हवं होतं—"

पुढलं भाषण तेवढंच राहिलं.

" काय आहे गडबड ? " म्हणत दादा सदरा घालीत घालीत खाली आला.

" हे घे आले, " उषा म्हणाली, " आतां तूंच विचार काय तें त्यांना. "

" असं पहा सुलू, " दादा म्हणाला, " मी तिला इथं राहून घेतलंय. इतर भानगडी कांहींही असोत—तिच्या वडिलांना मी शब्द देऊन चुकलों आहें. ही अशी मधेंच निघून गेली तर, एकतर तिच्या टर्म्सचा घोटाळा होईल—आणि दुसरं, तिचे वडील उगीच चौकशा करूं लागतील—ज्या भानगडी त्यांना कळूं नयेत असं तुला मला वाटतंय, त्याची निष्कारण उकराउकर होईल. उषे, तें आपलं सामानसुमान नेऊन ठेव आंत—! " वहिनीकडे पाहून अगदीं गोडगोड हंसून तो म्हणाला, " वेडी आहेस ! जा ! " असं म्हणून तोही तिथून निघून गेला.

नाकावर आंगठा टेकून उषेनं वहिनीला वांकुल्या दाखवल्या त्यावेळीं खाड्कन तिच्या एक थोबाडींत द्यावी असं मला वाटलं. वहिनीनं एवढाले डोळे करून मला

दटावलं आणि उषेकडे वळून ती म्हणाली, " एकूण यांना वागवायचं माझ्यापेक्षां तुलाच जास्त कळतं उषे. चुकलंच तें ! उगीच घाई केली यांनीं ! "

उषा मोठमोठ्यानं हसूं लागली, तेव्हां वहिनी पुन्हां म्हणाली, " उषे, इकडे ये—" उषा जवळ आली तेव्हां ती म्हणाली, " हा माझा कान धरून चांगला पिरगळ. एवढी तरी शिक्षा होऊं दे मला—" उषेनं खरोखरच आपला हात तिच्या कानाजवळ नेला, असं पाहून मी ताड्कन उटलों आणि थाड्कन तिच्या हातावर हात मारला. वहिनीनं माझ्याकडे पाहून गर्‌कन डोळे फिरवले—खाड्कन माझ्या मस्तकाला चढलेलं रक्त खालीं उतरलं. उषेच्या पायाला हात लावून नमस्कार करीत मी म्हटलं, " क्षमा कर मला ! —अन् वहिनी, तूंही मला क्षमा कर—" असं म्हणून मी तिच्या पायाला हात लावायला वांकत होतों तोंच ती एकदम गरजली, " भावजी ! "

या साऱ्या गोष्टी एका क्षणांत इतक्या झपाट्यानं झाल्या होत्या, कीं आतां त्यांची संगती जुळवतांनासुद्धां मला कठीण जातं आहे.

वहिनीच्या दरडावणीमुळं मी एकदम थंड पडलों. तितक्यांत आपलं सामान गोळा करून घेऊन उषा गेली होती. मला कोरड पडली होती. मीं वहिनीला म्हटलं, " मला थोडा चहा दे. "

चहा आणायला वहिनी आंत निघून गेली. मी तिथंच विचार करीत बसलों होतों. तितक्यांत उषा आंतून बाहेर येऊन मुद्दाम माझ्या अंगावरून निघून गेली. जातांनाचा तिचा झोंक पाहून मला चीड आली. शब्द ओठावर आले होते. पण ते गिळून तसाच स्वस्थ बसलों होतों. वहिनी केव्हां येऊन चहाचा पेला माझ्या समोर ठेवून निघून गेली तें मला कळलंसुद्धां नाहीं.

त्या दिवसापासून घरांतलं सारं वातावरण बिघडलं होतं. जरूरीखेरीज कुणीच कुणाशीं बोलत नव्हतं. वहिनीनं तर माझ्याशीं भाषण करण्याचंसुद्धां वर्ज्य केलं होतं. सकृत्दर्शनीं क्षुल्लक वाटणारी ती गोष्ट तिच्या मनाला चांगलीच लागून राहिलेली असावी असा माझा समज झाला.

असंच कांहीं महिने गेले. या मुदतींत म्हणण्याजोगं असं कांहींच झालं नाहीं. नव्या राजवटीवर दादा अगदीं खूष होता. नामदार मुनशीसारखा कायदा आणि सुव्यवस्था खात्याचा मंत्री कुणी झालाच नाहीं असं तो ज्यावेळीं म्हणे, त्यावेळीं या मंत्र्यांबद्दल माझं

मन साशंक होऊं लागे. दादा खूष होण्याजोगं असं यांनीं काय केलं असावं ? करड्या अमलाची जुनी अमदानी त्यांनीं तशीच का पुढं चालू ठेवली होती ?

बाहेरून तरी तसं दिसत नव्हतं. मतभेद सर्वत्र होतेच. पण गरीबगुरिब माणसं नव्या राजवटीवर खूष होतीं. त्यावेळीं पुण्याचं म्युनिसिपल इलेक्शन सुरू झालं होतं. मी टांग्यातून जात होतों. सहज टांगेवाल्याला विचारलं, " तूं मतं कुणाला देणार आहेस ?"

" अलबत् कॉंग्रेशीला ! " टांगेवाला म्हणाला.

" मी खादीवाला दिसलों म्हणून का असं म्हणतोयस ? " मी विचारलं.

" नाय रावसाव, " तो म्हणाला, " पूर्वी हे पोलिस असे छळीत होते आम्हांला, पण आतां कॉंग्रेशीचा अंमल सुरू झाल्यापासून कसे सुतासारखे सरळ आले आहेत. तो जंजाळ आतां कमी झाला आहे एवढं बघितल्यावर मतं कॉंग्रेशीला द्यायचीं नाहींत तर द्यायचीं कुणाला ? "

गोष्ट क्षुल्लक होती. पण त्याच्यावरून मी फार मोठा धडा घेतला.

कायदेमंडळाच्या बैठकी आतां पुण्याला सुरू झाल्या होत्या. सभेसमोर ' ट्रेड डिस्प्यूट बिल ' लौकरच येणार होतं. कामगारांचे पुढारी म्हणवणारे कम्युनिस्ट आणि स्वतंत्र मजूरपक्षाचे वगैरे लोक या बिलाविरुद्ध जोराचा प्रचार करीत होते. विशेषतः कम्युनिस्टांचं प्रचारकार्य मोठ्या जोरांत सुरू होतं. पुणं, मुंबई आणि सोलापूर इथं सभांवर सभा भरत होत्या. कॉंग्रेसची जितकी निंदा करतां येईल तितकी करण्यासाठीं प्रत्येकजण जीव तोडून भाषण करीत होता.

आपली बाजू समजावून देण्यासाठीं कॉंग्रेसपक्षानं यावेळीं कांहीं प्रचारकार्य केल्याचं मला निदान आज तरी आठवत नाहीं. एकच बाजू ऐकली जात असल्यामुळं मजुराचा गैरसमज होत होता. कॉंग्रेसची पकड बहुजनसमाजावर चांगलीच बसली आहे असं पाहून, नामोहरम होणाऱ्या पक्षांनीं हा धागा पकडून खेंचाखेंचीला सुरवात केली होती. लोकदृष्ट्या हें बिल तितकंसं निर्दोष नव्हतं असं पुष्कळांना वाटत होतं. तें बिल सिलेक्ट कमिटीकडे गेलं असतं तर बहुधा त्यांत दोष राहिला नसता. पण भांडवलवाल्यांची बाजू घेऊन मजुरांना मारण्यासाठीं हें बिल कायदेमंडळासमोर आणलं जात आहे अशी ज्यावेळीं सर्वांनींच कोल्हेकुई केली, तेव्हां त्या कोल्हेकुईला योग्य उत्तर देण्याचा बाबतींत, कोणत्याही कारणानं असो, जी ढिलाई झाली त्यापायीं मजूरवर्गात कॉंग्रेसपक्षाविरुद्ध असंतोष माजवण्याचा कॉंग्रेसविरोधकांचा उद्देश सफल होऊं लागला.

कॉंग्रेसच्या विरुद्ध चाललेल्या या चळवळींत उषा प्रामुख्यानं भाग घेत होती. कम्युनिस्टांच्या दृष्टीनं पाहतां मला तरी हा त्यांचा कृतघ्नपणा वाटत होता. तुरुंगांत असलेल्या कम्युनिस्टांना कॉंग्रेसमंत्रिमंडळानं सोडवलं म्हणून त्यांनीं कॉंग्रेसपक्षाकडून होणाऱ्या वाटेल त्या कार्याला डोळे झांकून पाठिंबा द्यावा असं कांहीं माझं म्हणणं नाहीं. कृतज्ञतेचा तो विपर्यास होईल. पण ज्या ईर्ष्येनं, ज्या तिडकेनं, दांतओठ खाऊन ते या प्रकरणीं कॉंग्रेसविरुद्ध उठले होते, तितकं तें बिल भयंकर खास नव्हतं. युद्धकार्याला सहकार्य करण्यासाठीं सरसावलेले आजचे कम्युनिस्ट, उद्यां कदाचित कुठं गिरणींत संप होण्याइतकी अशक्य गोष्ट घडून आली, तर याच कायद्याचा उपयोग करून घेऊन ती गिरणी चालू ठेवायला मदत केल्यावांचून रहाणार नाहींत. १९४३ ची भूमिका ही असली तरीही १९३८ सालीं—त्या पांच वर्षांपूर्वी—जागतिक लढाई सुरू होईल अशी कल्पना नव्हती. अशा त्या काळांत कम्युनिस्टांनीं 'काळा कायदा' म्हणून जी त्या बिलाची हाकाटी केली तिच्या मुळाशीं कॉंग्रेसद्वेष स्पष्टपणें दिसत होता यांत शंकाच नव्हती. केवळ त्या काळ्या कायद्याचाच तेवढा विरोध असता तर त्यांनीं डॉ. आंबेडकरांचा स्वतंत्र मजूरपक्ष आणि जमनादास मेहतांचा लोकशाही स्वराज्यपक्ष या दोन पक्षांसह बाकीच्या साऱ्या कॉंग्रेसविरोधी वैयक्तिक सभासदांशीं अपवित्र लगट केली नसती.

कम्युनिस्टांचा पक्ष कांहीं अगदींच दुबळा नव्हता, कीं लोकशाही स्वराज्यपक्षासारखा 'षण्मुखंरोटी पक्ष' नव्हता. तसाच कॉंग्रेसद्वेष नसता तर स्वतःचं सामर्थ्य पुरेसं असतांना जाणूनबुजून, एका काळीं कॉंग्रेसप्रमाणेंच—किंबहुना कॉंग्रेसपेक्षांही जास्त तीव्रतेनं कम्युनिस्टांचा द्वेष करणाऱ्या, या पक्षांशीं त्यांनीं हातमिलाप केला नसता.

असं मी म्हटलं त्यावेळीं उषा म्हणाली, "हें राजकारण आहे. या राजकारणांत वाटेल तो पक्ष, वाटेल तेव्हां, वाटेल त्या शक्तीचा उपयोग करून घेईल."

"हीच का तुमची आयडिऑलॉजी?" मीं विचारलं, "ही असली पगडी फिरवण्याची वृत्ति इतर पक्षांना शोभते, तत्त्वनिष्ठ म्हणवणाऱ्या कम्युनिस्टांना शोभते असं मला वाटत नाहीं—" असं मीं म्हटलं तेव्हां उषा चिडून म्हणाली, "तर मग राजकारण करायला तुम्ही नालायक आहांत!"

उषेचं मत म्हणजे कांहीं कम्युनिस्ट पक्षाचं मत नव्हे, हें मला माहीत होतं. पण आपल्या पक्षांतलीं जबाबदार माणसं कुणाला कशीं उत्तरं देतात याची कांटेकोर खबरदारी कम्युनिस्ट पक्ष घेत नव्हता एवढंच मला त्यावेळीं दिसून आलं.

पुण्याला होत असलेल्या या सभांना आमच्या वर्तमानपत्राच्या वतीनं मी हजर रहात होतों. त्यांत कांहीं विशेष होत नव्हतं. या विरोधकांचा सारा मारा चालला होता तो मुंबईच्या मोर्चावरून. सोलापूरही तसंच गाजत होतं. या एकंदर प्रचारांत ज्यांना मजुरांचे अधिकारी पुढारी म्हणतां येईल अशी एकच व्यक्ति गैरहजर होती—ते म्हणजे भारतसेवक समाजाचे एन्. एम्. जोशी. पण ते त्यावेळीं दिल्लीला होते असं कळलं. ते मुंबईला असते तर हें काळा कायदा प्रकरण पुढं जितकं चिघळलं तितकं विकोपाला गेलं नसतं.

मजूर पुढाऱ्यांच्या या गटानं या काळ्या कायद्याचा विरोध निदर्शित करण्यासाठीं ७ नोव्हेंबर १९३८ रोजीं एक सार्वत्रिक संप घडवून आणण्याची योजना केली. तो संप यशस्वी होण्यासाठीं जिकडून तिकडून जो प्रचार करण्यांत येत होता त्यांत पुढाकर घेण्यासाठीं उषा मुंबईला निघून गेली.

मुंबईला सभांवर सभा झडत होत्या, निदर्शनं चालू होतीं, मिरवणुका निघत होत्या आणि अंतस्थ अशी कांहींतरी जबरजस्त कारवाई सुरू होती, असं जिकडे तिकडे बोललं जात होतं. या सभांत होणाऱ्या भाषणांचे जे रिपोर्ट येत होते त्यांत कम्युनिस्टांच्या जहाल भाषेची परमावधी झाल्याचं दिसून येत होतं. ही भाषा जितक्या जहालपणानं कॉंग्रेसच्या विरोधासाठीं वापरण्यांत येत होती, तितकी साम्राज्यशाहीविरुद्ध सुद्धां त्यांनीं क्वचितच वापरली असेल. जहाल भाषेच्या या खतखत्याला मधून मधून आंबेडकर पक्ष आणि जमनादास पक्ष यांची भरपूर फोडणी मिळत होती. मुंबई–पुण्याचीं कॉंग्रेसविरोधी पत्रं दांतओठ खाऊन या प्रचाराचा प्रसार करीत होतीं.

उषा गेल्यामुळं आतां घरांतला आडपडदा नाहींसा झाला होता, तरी अजूनही वहिनीचा रुसवा गेला नव्हता. इतक्या दिवसांत सार्वजनिक प्रश्नांची चर्चा करण्यासाठीं तिनं एकदांसुद्धां तोंड उघडलं नव्हतं.

तसं पाहिलं तर मीं तरी कुठं तिला प्रश्न केला होता ? प्रश्न केल्याशिवाय उत्तर द्यायची तिला संवय नव्हती. प्रश्न कम्युनिस्टांबाबत होता, म्हणूनच माझ्यानं रहावत नव्हतं.

एकदां संधी साधली आणि जे प्रश्न उषेला केले होते तेच परत वहिनीला विचारले तेव्हां ती म्हणाली, " कम्युनिस्टांचा प्रश्न आला कीं उषा स्वतःला अधिकारी समजते. मी कॉंग्रेसची अनुयायी असलें तरी कॉंग्रेसपक्षांत कांहीं मी वावरत नाहीं. कॉंग्रेसचा बाणा आणि कॉंग्रेसपक्षाची कामगिरी एकच असते असंच

कांहीं नाहीं—निदान या कौंसिलप्रवेशानंतर तरी मला निश्चितपणें कांहीं सांगतां यायचं नाहीं. वर्तमानपत्रं मी रोज वाचतें आहें. एकाच बाजूनं धडाका सुरू आहे. तसं पाहिलं तर अस्सल कम्युनिस्ट असलेले भाई एम्. एन्. रॉय आज काँग्रेसच्या बाजूला आहेत. या काळा कायदा प्रकरणीं प्रत्येक रॉयिस्ट काँग्रेसच्या बाजूनं लढतो आहे. म्हणूनच मला प्रश्न पडतो, खरं मानायचं कुणाचं ? कायद्याचे डावपेंच कांहीं मला कळत नाहींत—अन् ते कळायलाही नको आहेत मला. असं कांहींतरी होणार हें पूर्वीपासूनच मला वाटत होतं. पुन्हां पुन्हां मी तसं बोललेंही होतें. अधिकारावर असेल त्याला विरोध करायचा हीच सामान्य प्रवृत्ति असते. या बिलांत जें थोडंसं व्यंग आहे तें पकडून काव्याचा नायटा करायचा हा काँग्रेसविरोधकांचा घाट विरोधकांची संख्या वाढवायला मात्र कारणीभूत होईल—" असं म्हणून ती क्षणभर स्वस्थ बसली आणि म्हणाली, " पुरुषासारखे पुरुष तुम्ही—असले प्रश्न मला कां विचारतां ? वर्षं सहामहीन्यानं कां होईना, पण तुम्ही माझ्यापेक्षां वयानं वडील आहां, वर्तमानपत्राच्या ऑफिसांत काम करतांहां, बाहेर मिसळतां आहां चार राजकारणी माणसांत, प्रत्यक्ष हजर रहातांहां कायदेमंडळाच्या बैठकीला—या गोष्टी तुम्हांला कळायला हव्या होत्या. कुणी विचाराय-चंच असलं तर मी तुम्हांला विचारायचं. मी ही अशी घरीं बसून राहिलेली—"

" म्हणूनच तुला विचारायचं. " मी म्हटलं, " आम्ही बाहेर फिरतों, चौघांचीं चार मतं ऐकतों त्याचा परिणाम होतो मनावर. तूं घरीं बसून असतेस, कोणत्याही पक्षांत न मिसळतां सारं कांहीं साक्षी म्हणून पहात असतेस—केवळ स्वतःच्या बुद्धीनं विचार करतेस म्हणूनच तुला विचारायचं ! "

वहिनी हंसली आणि म्हणाली, " अलिकडे बरंच बोलतां येऊं लागलंय तुम्हांला. "

"उषेची कृपा ! " मी हंसून म्हटलं, "तिनं बोलवलं नसतं तर अजूनही मी मूकनायक होऊन राहिलों असतों —ऐकत बसलों असतों. उषेच्या कृपेनं वाचाळांचा सहवास घडला अन् मला वाचा फुटली. त्या अभ्यासमंडळांत खूप खूप पारिभाषिक शब्द शिकलों. आतां असा बोलत असतां–असा बोलत असतों—कोण म्हणेल मी अशिक्षित आहें म्हणून !" वहिनी मोठमोठ्यानं हंसली तेव्हां मी म्हणालों, " आज मला पोट भरलंसं वाटलं. उपास पडला होता इतके दिवस ! कधीं बसली नाहींस, बोलली नाहींस, भांडली नाहींस, राग भरली नाहींस—उषेच्या त्या धिंगाण्यानंतर पुन्हां कधीं डोळेसुद्धां वटारले नाहींस माझ्यावर. अगदीं मरतुकडं वाटत होतं मला. आज ग्रहण सुटल्यासारखं वाटलं ! गांधीजीच्या उपासाचं पारणं फिटल्यासारखं वाटलं ! "

या वेळीं वहिनी हंसली नाहीं. न कळत एक सुस्कारा सोडून ती म्हणाली, " कसं होणार तुमचं भावजी ? हें असं होणं बरं नव्हे. दोघाचे दोन मार्ग आहेत तुम्ही आतां इथं गुंतून पडलां आहां—यांची उद्यां कुठं बदली झाली तर तुम्हीं काय नोकरी सोडून आमच्याबरोबर येणार आहां ? कसं होणार तुमचं ! "

" आणि तुझं ? " मी हळूच विचारलं.

" हो ! " वहिनी उद्गारली, " तोही एक प्रश्नच आहे. काय होणार आहे पुढं आपलं—" ती एकदम थांबली.

दादा आंत येत असलेला तिला आधीं दिसला. तो विषय तेवढाच राहिला. बाहेरच्या गोष्टी निघाल्या. संपासाठी दादाला बहुधा मुंबईला जावं लागणार होतं. आजूबाजूच्या जिल्ह्यांतून बरेच पोलिस ऑफिसर आणि शिपाई मुंबईला पाठवण्यांत येणार होते दादाला मोठा आनंद झाला होता. फार दिवसांनीं आतां दंगा, मारामारी, पकडापकड आणि क्वचित गोळीबारसुद्धां होईल या आशेनं तो खुषींत येऊन बोलत होता.

तें सारं भाषण ऐकत असतांना माझ्या हृदयाभोंवतीं एकच प्रश्न गिरक्या घालीत होता—' कसं होणार आमचं ? —कसं होणार आम्हां दोघाचं ? '



# १२

सात नोव्हेंबर जवळ आली होती. विरोधकांचा प्रचार जोरांत सुरू होता. मुंबई प्रांतिक ट्रेडयुनिअन कॉंग्रेसनं या कामीं पुढाकार घेतला होता. १९३९ सालीं नागपुरच्या अधिवेशनांत एन्. एम्. जोशी ऑल इंडिआ ट्रेडयुनिअन कॉंग्रेसमधून निघाले आणि ती संस्था पूर्णपणें कम्युनिस्टांच्या हातीं गेली. जोशीबुवांच्या पक्षानं नॅशनल ट्रेडयुनिअन फेडरेशन या नांवाची संस्था अस्तित्वांत आणली. कम्युनिस्टांचं गिरणी कामगार ( लालबावटा ) युनिअन या कामीं पुढाकार घेत होतं. या संस्थेच्या द्वारें ' क्रांति ' नांवाचं

पत्र मुंबईत निघत होतं. १९३७ च्या ऑक्टोबरांत कम्युनिस्ट पुढाऱ्यांना काँग्रेसमंत्रि-मंडळानं तुरुंगांतून बाहेर सोडल्यापासून हें पत्र सुरू झालं होतं. १९३८ च्या सप्टेंबरांत स्वतंत्र मजूरपक्षाचे त्यावेळचे एक सभासद शामराव परुळेकर (पुढं यानीं तो पक्ष सोडला) विलायतेंतून परत आले, त्यावेळीं एक दिवसाच्या सार्वत्रिक संपाची ही कल्पना त्यांनीं १० सप्टेंबरच्या क्रांति पत्रांतून प्रसिद्ध केली. अर्थात्च डॉ. आंबेडकर हेही या बेताच्या पाठीशीं होते. सप्टेंबरच्या तिसऱ्या आठवड्यांत बॉंबे प्रॉव्हिंशिअल ट्रेड्युनिअन काँग्रेसचे अध्वर्यू असलेल्या कम्युनिस्टांनीं या संपात भाग घेण्याचं ठरवलं. जमनादास मेहताही त्यांना मिळाले. या मुदतीत त्यांनीं मुंबईत ठिकठिकाणी सुमारें चाळीस सभा घेतल्या. मराठीतलं ‘ क्रांति ’ व इंग्रजीतलं ‘ नॅशनल फ्रंट ’ हीं दोन्ही पत्रं या एक दिवसाच्या संपाचा मोठ्या हिरीरीनं प्रचार करीत होतीं. सर्वांच्या रोषाचा रोख नामदार मुनशी यांच्यावर होता—अर्थातच काँग्रेसमंत्रिमंडळाचे पंतप्रधान नामदार बाळासाहेब खेर हेही त्यांतून सुटत नव्हते. मारामारी आणि दंगा करण्याची चिथावणी उघड उघड देण्यांत येत होती. काँग्रेसच्या अनत्याचाराच्या—अहिंसेच्या तत्वाची ठिकठिकाणीं थट्टा करण्यांत येत होती. आणि म्हणूनच कोणत्याही प्रकारचा दंगा होऊं नये अशी तजवीज करण्यांत आली होती.

या कामीं दादाची नेमणूक झाल्यामुळं तो मुंबईला निघून गेला.

मुंबईहून जे या चळवळीचे रिपोर्ट वर्तमानपत्रांत येत होते, त्यावरून या चळवळींत उषा बऱ्याच प्रामुख्यानं भाग घेत होती असं दिसून आलं. त्या नुसत्या रिपोर्टांवरच मला अवलंबून रहावं लागत होतं. या चळवळीत उषा प्रत्यक्ष भाग कोणत्या रीतीनं घेते आहे, कोणत्या मुद्यावर व्याख्यानं देते आहे, तें प्रत्यक्ष ऐकायला मिळालं असतं तर बरं झालं असतं. पण कायदेकौन्सिलची बैठक सध्यां पुण्यालाच असल्यामुळं रिपोर्टर या नात्यानं मला इथंच काम करावं लागत होतं. मुंबईच्या या चळवळीचा पुण्याच्या पत्रांवर फारसा परिणाम होत नव्हता. सोलापुरचीं वातमीपत्रं तिकडून आयतींच येत असल्यामुळं तिकडेही कुणी रिपोर्टर पाठवायची आमच्या संपादकांची तयारी नव्हती.

खोलांत जाऊन पहायचं म्हणजे, या उठावणीचे मूळप्रवर्तक डॉ. आंबेडकर आणि जमनादास मेहता आणि त्याबरोबरच या कल्पनेचे जनक शामराव परुळेकर हे कायदे-मंडळाच्या बैठकीसाठीं पुण्यांतच वावरत होते. मुंबईच्या भाई लोकांचीं व्याख्यानं निर-निराळ्या गिरणगांवच्या रस्त्यांतून ज्याप्रकारें होत होती तो प्रकार ठराविक सांचाचा

होता. आज साम्राज्यशाहीपेक्षां भांडवलशाही—आणि भांडवलशाहीच्या अनुषंगानं काँग्रेस आणि काँग्रेसमंत्रिमंडळ, यांच्यावर ठराविक भाषेंत भडिमार होत होता. मधून मधून मिरवणुका निघत होत्या.

मला जी माहिती पाहिजे होती ती या चळवळीच्या आंतल्या व्यवहाराची. यावेळीं मी मुंबईला गेलों असतों, उषेच्या कच्छपीं लागलों असतों, तर कदाचित् तीं माहिती मिळण्याचा संभव होता. पूर्वी या बाबतींत उषेनं दिलेल्या वचनाचा फायदा घेऊन जगाचं राजकारण हादरून टाकूं पहाणाऱ्या मुंबईच्या त्या लाल नेत्यांचा यावेळीं मला परिचयही करून घेतां आला असता; पण माझ्या संपादकांनीं ती संधि मला लाभूं दिली नाहीं, याची मला चुटपुट लागून राहिली होती.

दादा मुंबईला कुठं राहिला होता याचा पत्ता आम्हांला नव्हता. पण तो आपल्या सासुरवाडीला राहिला नव्हता खास. दुसरी चुटपुट मला लागली होती ती हीच, कीं उषा त्यावेळीं दादाला भेटत होती कीं काय ?

उषा यावेळी शत्रूच्या गोटांत होती. ज्या गोटांत ती होती त्या गोटावर नजर ठेवण्यासाठीं दादाची तिथं नेमणूक झाली होती. उषेच्या भाबडेपणाचा फायदा घेऊन शत्रूच्या गोटांतल्या बातम्या मिळवायचा दादानं प्रयत्न करणं मुळीच अशक्य नव्हतं. राजवट काँग्रेसमंत्रिमंडळाची असली तरी जुन्या राजवटींत घोळलेले पोलिसचे अधिकारी अगदींच अहिंसेचे प्रवर्तक होऊन बसतील अशी अपेक्षा निदान मी तरी करीत नव्हतों.

वहिनीलाही तसंच वाटत होतं. ती म्हणाली, “ जें नको तेवढं होतंय. मोठी काळजी वाटतेय मला. शांतता राखावी हा काँग्रेसमंत्रिमंडळाचा हेतु यावेळीं तरी पार पडेलसं मला वाटत नाहीं. कम्युनिस्टांच्या कर्तृत्वशक्तीबद्दल मला आदर आहे. पण कुणाच्या ना कुणाच्या तरी आहारीं जायची त्यांना मोठी वाईट खोड आहे. आज स्वतःच्या सामर्थ्यावर हा लढा लढवायची ताकद असतांना स्वतंत्र मजूरपक्षाशीं यांनी कां हात मिळवावे ? खरं म्हटलं तर गिरणगांवांत जर कुणाचं वजन असेल तर ते एका लालबावटेवाल्यांचंच आहे. त्यांनीं हांक मारली तर सारे कामगार आजवर लढ्याला उभे रहायला तयार झाले आहेत. स्वतंत्र मजूरपक्ष कांहींही म्हणत असला, तरी एका विशिष्ट जातीपलिकडे या पक्षाच्या पुढाऱ्यांचा गिरणीकामगारांत मुळींच बोज नाहीं. जमनादासांना गिरणीकामगारांच्या मेळाव्यांत कुणी एवढंसुद्धां महत्व देत नाहीं.

भारतसेवक समाजाच्या गिरणगावांतल्या आजवरच्या कार्यामुळं जोशीबुवांच्या अनुषंगानं शामराव परुळकरांचं अल्पस्वल्प वजन आहे. पण जोशीबुवांच्या या वेळच्या गरहजेरीचा परिणाम, मला वाटतं, कांहीं चांगलासा व्हायचा नाहीं. जोशीबुवा कांही कम्युनिस्ट नाहींत. पण आजवर कित्येकवेळां त्यानी कम्युनिस्टांना हातांशीं धरून खेळवलं आहे. कम्युनिस्ट कितीही बलवान असले, बेफाट असले, तरी जोशीबुवा त्यांना वाटेल तेव्हां आपल्या रेषेत आणूं शकतात. त्यांची कर्तबगारीच तशी आहे. त्यांचा जोर आहे तो कर्तबगारीचा आहे. पारिभाषिक वाचाळपणाचा नव्हे. मुंबईत कम्युनिस्टांचा उगमसुद्धां झाला नव्हता तेव्हांपासून गिरणीकामगारांचं राजकारण त्यांनीं मोठ्या इर्ष्येनं लढवलं आहे. भारतसेवकांच्या जुन्या मवाळ बाण्याला लढाऊ वळण लावणारे जोशीबुवा यावेळीं मुंबईत नाहींत, हें कॉंग्रेसमंत्रिमंडळाचं दुर्दैव होय ! " असं म्हणून एक मोठा सुस्कारा सोडून वहिनी स्तब्ध बसली.

जोशीबुवा ऊर्फ नारायण मल्हार जोशी यांना मीं नुसतं रस्त्यांतून जातांना पाहिलं होतं. त्यांचा माझा प्रत्यक्ष परिचय मुळींच नव्हता. वहिनी त्यांना ओळखत होती, एवढंच नव्हे तर त्यांच्या तालमींत ती कांहीं दिवस वाढली होती. त्यांच्याबद्दलचा तिचा आदर भलताच आहे असं मला तिच्या बोलण्यावरून वाटे. ते कांहीं कॉंग्रेसपक्षांतले नव्हते. ते कॉंग्रेसविरोधक आहेत असाही कुणाकुणाचा समज होता. मला वाटतं, भारतसेवक समाजाचे ते सभासद होते एवढ्यावरून कदाचित असा समज उत्पन्न झाला असावा. कॉंग्रेसच्या पक्षांत प्रत्यक्ष गिरणीकामगारांत काम करणारी अशी कोणतीच व्यक्ती नव्हती. म्हणूनच कॉंग्रेसच्या राजकारणाच्या दृष्टीनं वहिनीला जोशीबुवांचं महत्व वाटत होतं.

मी म्हटलं, " आज जरी नसलं, तरी संपाच्या दिवशीं मला मुंबईला पाठवायचं संपादकांनीं कबूल केलंय. तूं येतेस का बरोबर ? "

वहिनीनं एकदां माझ्याकडे पाहिलं, कपाळाला आंठ्या घातल्या, डाव्या हातानं आपल्या केसांतून हात फिरवीत ती म्हणाली, " किती वर्षं माहेरीं गेलें नाहीं मी ! गेलें तर बाबांना देखील बरं वाटेल.—पण विचारलं नव्हतं—परवानगी घेतली नव्हती. पत्र पाठवून परवानगी विचारून उत्तर येण्याइतका आतां अवधी नाहीं. जावं का ? कसं वाटतं तुम्हांला ? जावं का ? यांना काय वाटेल ? "

" मला तुझं आश्चर्य वाटतं वहिनी, " मी खरोखरच आश्चर्य चकित होऊन म्हटलं,

" दादाला तूं इतकी भितेस ही कल्पना नव्हती मला. तुम्ही सुशिक्षित माणसं— सुशिक्षितांचे संसार जुन्या काळच्या संसारांपेक्षां कांहीं निराळे असतील असं वाटलं होतं मला. इथं तुम्हां दोघांच्या या संसारांत मी आपला एक जेवणकरी आहें. कांहींच अंत लागत नाहीं तुम्हां दोघांच्या रहाणीचा! खरोखरच का दादाला इतकी भितेस ?"

वहिनी नुसती हंसली आणि क्षणभर उगीच राहिली. पुन्हां मी तोच प्रश्न केला तव्हां ती म्हणाली, " समजा, तुम्ही आज संसारी असतां, असेच गांवीं गेलां असतां, नि अशीच तुम्हांला नकळत तुमची बायको माहेरीं गेली असती—"

" तूं कांहीं अगदींच माहेरीं म्हणून जात नाहींस. तो संप पहायचा आहे तुला—"

" तें खरं आहे पण इथनं जायचं म्हणजे तिकडे कांहीं माधवाश्रमांत उतरतां येत नाहीं मला. गेलं पाहिजे माहेरींच—अर्थात् तें माहेरीं जाणंच ठरायचं. कारण कोण पहातोय् ?—पण माझ्या प्रश्नाचं उत्तर द्या ना आधीं."

" असं पहा वहिनी, आपण ज्या कल्पना करतों त्या प्रत्यक्ष अनुभवानं साऱ्याच कांहीं खऱ्या ठरत नाहींत. कांहीं बरोबर येतात, तर कांहीं चुकतात. नुसती कल्पनाच करायची तर मी असं म्हणेन, कीं मला कांहीं त्यांत विशेष वाटलं नसतं. उभयतांना कांहीं तरी स्वातंत्र्य म्हणून पाहिजे. तें कांहीं कुठं पळून जाणं नव्हे! पण नवरा बायकोच्या प्रत्यक्ष नात्यांत मनाची काय स्थिति होईल याची नुसती कल्पना करणं धोक्याचं आहे असं मला वाटतं."

" एवढी तरी जाणीव आहे म्हणायची!" आपल्याशींच बोलल्यागत वहिनी म्हणाली, " परिस्थितीच्या परिणामाबद्दल जें माणूस साशंक असतं त्याच्या हातून सहसा चूक होत नाहीं. ज्याचीं मतं ठाम ठरलेलीं असतात, त्यांना शंकाच वाटत नाहीं केव्हां कसली! हंः! मग जावं म्हणतां तर तुम्ही."

" मी कांहींच म्हणत नाहीं." मी सावधपणें उद्गारलों, " मीं आपलं नुसतं तुला विचारलं. मी जाणार आहें हें ठरलंच. जमलं तर एक दोन दिवस आधीं जाणार आहें—"

" बरं, बरं!" वहिनी मधेंच म्हणाली, " जाऊं या झालं! गंमत तरी पाहूं. हा असला प्रसंग पहायचं भाग्य क्वचितच लाभतं."

शेवटीं आम्हीं दोघांनींही जायचं असं ठरलं. परवानगी विचारायचं ढोंग न करतां वहिनीनं दादाला तसं पत्र घातलं. उत्तर यायला अर्थातच अवधि नव्हता.

पांच तारखेला संध्याकाळीं आम्हीं मुंबईला जाऊन पोहोचलों. बोरिबंदर स्टेशनच्या बाहेर येऊन मी टॅक्सी ठरवीत होतों तोंच माझ्यासमोरून एक टॅक्सी गेली. काळोख होता तरी मीं खात्रीपूर्वक ओळखलं, दादाच होता तो. शेजारीं उषा बसली होती.

आधीं पत्र घालून वहिनीनं आपल्या वडिलांना कळवलं नव्हतं. त्यांना आश्चर्य-चकित करायचं अशी तिची इच्छा होती; पण घरीं गेल्याबरोबर जेव्हां ते म्हणाले " आलीस ! तुझीच वाट पहात होतों ! " तेव्हा दादा त्यांना भेटला असावा असं मला वाटलं.

जरा स्थिरस्थावर होऊन बसल्यावर वहिनीचे वडील म्हणाले, " हा असा फकिरा-सारखा रहातोंय आणि तुम्हां पोरींना त्याचं कांहींच वाटत नाहीं ! तुझा नवरा इथं आलाय म्हणून ऐकलं पण अजून तो भेटलासुद्धां नाहीं. म्हाताऱ्या माणसांचं अंतः-करण कसं असतं तें म्हातारपण आल्याशिवाय कळायचंच नाहीं का तुम्हां लोकांना ? "

अगदीं रडल्यागत हंसून वहिनी म्हणाली, " म्हातारं झालं, कीं माणूस आपलं तरुणपण विसरतं. उठल्यासुटल्या तुम्हीं आईला पाठवीत होतां का माहेरीं ? "

मोटमोठ्यानं हंसत वहिनीचे वडील म्हणाले, " मी अगदीं निरुत्तर होईन असं वाटलं का तुला सुलू ? तुला कळूं लागल्यापासून तुझ्या आईचं माहेर शिल्लक राहिलं होतं कुठं ? पण तें होतं, तेव्हां वाटेल तेव्हां निघून ती कोकणांत जात असे. मला विचारीत-सुद्धां नसे. अन् तिनं विचारावं म्हणून मीही कधीं आग्रह धरला नव्हता. आतां कांहीं पुरावा नाहीं माझ्या बोलण्याला—पण तुला सांगतों सुले, माझं हें करणं पुष्कळांना आवडत नसे एवढं मात्र खरं. "

" उषा कुठं गेली ? " मीं मधेंच विचारलं.

" उषा......कुठं......गेली......! " वहिनीचे वडील एक श्वास टाकून म्हणाले, " तें माहीत असतं तर कशाला मी हिला तसं म्हटलं असतं. हिचं एक लग्न झालंय. पण ही पोर अशी उधळली आहे म्हणतां ! कधींच कुणाला जरब लावायची मला संवय नाहीं—पण आतां असं वाटतं—या पोरीचंसुद्धां लग्न करून टाकलं असतं तर बरं झालं असतं. "

इतक्या काकुळतीला येऊन ते बोलत होते, कीं यानंतर त्यांना प्रश्न करणं मला बरं वाटलं नाहीं. अर्थपूर्ण नजरेनं वहिनीनं माझ्याकडे पाहिलं. बोरीबंदरवरची टॅक्सी तिला-सुद्धां दिसली होती का ?

वहिनीचे वडील पुन्हां बोलूं लागले, "—तो संप व्हायचा आहे ना सुरू, त्या भानगडींत आहे ती. रात्रीं एकेक वाजेपर्यंत घरीं येत नाहीं. त्या गोदावरीबाई गोखले आहेत ना, त्या, त्यांची ती कमल वागळे अन् ही, काय करीत असतात कोण जाणे! प्रचारकार्य करीत असतात म्हणे! लोकं काय वाटेल तें बोलतात, माझ्याकडे येऊन ओरडतात, कुणाचंच ऐकून घेत नाहीं मी. त्यांच्या कर्मांचीं तीं जबाबदार. मी उगीच उचलून सूळ खांद्यावर कशाला घेऊं? मोठं नांव गाजतंय सर्वांचं, त्या गजबजाटाआड मी कशाला येऊं? तेवढंच टेपरं ठेवाल तुम्ही माझ्यावर. तो तुमचा बोल लावून घ्यायला नको आहे मला. मी झालोंच आहें हा असा कलंदर—लग्न झालं असतं तिचं तर ती देखील तुझ्यासारखीच नवऱ्याघरच्या तुरुंगात पडलीच असती की नाहीं डांबून. तसंच समजतों नि स्वस्थ बसतों."

म्हाताऱ्याची ती वृत्ति पाहून मला मोठं कौतुक वाटलं. एक घटकाभऱ्याच्या सहवासानं या माणसाबद्दल मला विलक्षण आदर वाटूं लागला. आमच्या जातींत तरी असलीं माणसं विरळा. वहिनीला लहानपणीं या म्हाताऱ्यानं कसं वागवलं असेल याची त्यावेळीं मला कल्पना आली.

वहिनीचा मला राग आला तो एवढ्याच गोष्टीसाठीं—या असल्या बापाची हकीकत तिनं कशी कधींच मला सांगितली नाहीं? एका काळीं कापूसबाजारांत भरघोस खेळलेला हा माणूस, घरीं बेकार होऊन बसल्यावर कसे दिवस कंठतो आहे, याची एवढीसुद्धा कल्पना वहिनीनं कशी मला दिली नाहीं? बापाबद्दल तिला कांहींच का वाटत नव्हतं? त्यांतून अशा बापाबद्दल!

माझ्या प्रश्नाचं आपोआप निराकरण झालं. वहिनी म्हणाली, "हा सारा तुमचाच अपराध आहे दादा—" ती त्यांना दादा म्हणत असे—"आम्हां पोरींना पहिल्यापासूनच तुम्हीं असं मोकळं सोडलं, कधीं तक्रारच केली नाहीं, मग आता कशाला उगीच कुरकुरतां?"

"मी कुठं कुरकुरतोंय? तूं आलीस म्हणून सहज उद्गार आला. एवढंच."

मधें वहिनीचे वडील आंत निघून गेले होते त्यावेळीं मीं म्हटलं, "मोठे विलक्षण दिसतात तुझे हे वडील! अगदींच स्थितप्रज्ञ दिसतात. कधींच कशी कांहीं बोलली नाहींस यांच्याबद्दल?"

वहिनीच्या डोळ्यांना टच्कन् पाणी आलं. पदरानं डोळे पुसून ती म्हणाली,

" पाह्यलंत ना आतांच ? कांहींच देखावा केला नाहीं त्यांनीं. आलें म्हणून आनंद दाखवला नाहीं, कीं येत नव्हतें म्हणून टाकूनही बोलले नाहींत ! आईपेक्षां दादांचाच मला मोठा लळा होता. कुणासमोर त्यांची आठवण काढणं म्हणूनच मला कठीण जात होतं. आईहून आई होऊन राहिले होते ते मला !—" ते आले असं पाहून ती थांबली आणि म्हणाली, " उषा यायची वाट पहायची, कीं आधींच बसायचं जेवायला ? मला फार भूक लागलीय. "

" अन् तुझ्या या भावजीला ? " त्यांनीं विचारलं, " यांना भूक लागत नाहीं वाटतं ? मी कांहीं रात्रीं जेवीत नाहीं. तुम्हीं घ्या आपलीं जेवणं उरकून. उषेची वाट पहात बसाल तर उद्यांचा दिवस उजाडेल. "

" तें नाहीं चालायचं दादा, " वहिनी लडिवाळपणानं म्हणाली, " आज आमच्या पंक्तीला तुम्ही जेवलंच पाहिजे. एक दिवस घांसभर भात खाल्ला तर कांहीं व्हायचं नाही तुम्हांला. "

" खट्याळ आहेस झालं ! " असं म्हणून ते सैंपाक्याला हांक मारून म्हणाले, " आणखी एक तिसरा पाट मांडा भटजी. बरं झालं, आज पापलेटं मिळालीं होतीं. फार दिवसांनी मुंबईच्या पापलेटाची चव मिळेल तुला. "

आम्हीं जेवायला बसत होतों तोच उषा घाईघाईनं आली. ' आली वाटतं ताई ! ' असं आम्हांला डोकावून पाहून जात जात ती म्हणाली. तिला कुणींच कांहीं विचारलं नाहीं. मला वाटतं, ती थोड्या वेळानं जी आली ती जरा तोंडबिंड धुवून आलेली असावी. आंत येतांच भटजींना हाक मारून तिनं ताट वाढायला सांगितलं.

"कुठं गेली होतीस उषे ? " असं वहिनीनं विचारलं तेव्हां पाटावर बसत बसत तिच्या तोंडाचा पट्टा सुरू झाला, " तुला कांहीं कल्पना आहे ? केवढे आणीबाणीचे दिवस आहेत हे ! केवढे बेत आंखले आहेत आम्हीं ! सात नोव्हेंबर म्हणजे जगाच्या इतिहासांत गाजत रहाणार हा दिवस. रशियांतल्या त्या सात नोव्हेंबरची इथं ही दुसरी आवृत्ति होणार. चांगलं कळून येईल त्या मुनशीला. बंदोबस्त ठेवताहेत म्हणे ! अन् हे अहिंसेचे प्रवर्तक ! किती पोलिसं आलीं आहेत गांवागांवांतून—त्यांचीच गर्दी झाली आहे सर्वांपेक्षां ! पण आम्हीं कशी अगदीं नाकेबंदी करून ठेवली आहे. सात नोव्हेंबर उजाडली, कीं एक दिवस साऱ्या मुंबईत आमचं राज्य—"

" आमचं म्हणजे कुणाचं ? " वहिनीनं हळूच मधें विचारलं.

" आमचं म्हणजे वर्कर्सचं ! " उषा म्हणाली, " कामकऱ्यांचं—शेतकऱ्यांचं ! "

" शेतकरी देखील आले आहेत वाटतं ? " वहिनीनं विचारलं.

" साऱ्या वर्कर्सचं ! " उषा ठांसून म्हणाली, " त्यांत सारं कांहीं आलं. एक दिवस साऱ्या मुंबईत सरकारचा अंमल बंद. गिरण्या थांबतील, गाड्या थांबतील, बस थांबतील, ट्रॅम्स थांबतील, व्हिक्टोरियासुद्धां बंद. इतकंच काय, पण घरचीं धुणींभांडीं करणारा ' रामा ' सुद्धां मिळायचा नाहीं कुणाच्या घरीं ! "

" आणि टॅक्सी ? " वहिनीनं विचारलं.

" टॅक्सीसुद्धां चालायची नाहीं— लालबावटेवाल्या टॅक्सीखेरीज ! " उषा म्हणाली.

" मग मी उगीच आलें म्हणायची !" वहिनी म्हणाली.

" कां ? " चकित होऊन उषेनं विचारलं, " या संपाची गंमत पहायला आली आहेस वाटतं तूं ? या कॉंग्रेसच्या मिरवणुका नव्हेत बरं का सुलूताई. क्रांतीचा झेंडा फडकायचा आहे त्या दिवशीं. सोटा घेऊन निघणार आहोंत आम्ही मुनशींच्या मागं. तें तुमचं ' रघुपती राघव राजाराम ' नव्हे हें. ही क्रांति आहे ! भांडवल-वाल्यांचा नि कामगारांचा झगडा आहे हा. या झगड्यांत तुमच्यासारख्यांना जागा नाहीं. समजलं ? गंमत पाहणाऱ्या बघ्या लोकांना एकसुद्धां टॅक्सी मिळायची नाहीं. अन् तुम्ही हो बळवंतराव—" मी एकदम दचकलों असं पाहून ती म्हणाली, " नुसते एवढ्यालाच दचकलांत होय ? मग रिपोर्टिंग कसं करणार ? फिरणार आहांत ना आमच्या गिरणगावांत ? टॅक्सीपुरते पैसे दिले आहेत का तुमच्या पुण्याच्या संपादकानं ? कीं पदरचे खर्च करणार आहांत ? बाकी तुम्हांला टॅक्सी कशी मिळणार आहे कोण जाणे ! एवढं बरीक ध्यानांत ठेवा, कीं ती खादीची टोपी घालून येऊं नका. या पांढऱ्या टोपी-खालचं डोकं शाबूत रहाणं कठीण जाईल त्या दिवशीं. "

" म्हणजे ? " मी घाबरल्याचा आव आणून उद्गारलों, " डोकेफोडी व्हायची आहे कीं काय त्या दिवशीं ? "

" कुणी सांगावं !" उषा म्हणाली, " होईल देखील. शांततेनं सारी चळवळ करायचं आम्हीं ठरवलं आहे; पण हे तुमचे पोलिस जर गडबड करूं लागले, तर काय होईल कुणी सांगावं ? "

" पोलिसांच्या डोक्यावर कांहीं खादीची टोपी नसते, " वहिनी म्हणाली, " अन् तूं ही भीति घातलीस यांना, ती खादीच्या टोपीबद्दल. याचा मेळ कसा घालायचा ? "

" तें त्या दिवशींच पहा !" उषा म्हणाली.

आमच्यानंतर जेवायला बसलेली उषा घाईघाईनं कसंबसं जेवण उरकून आमच्या पूर्वीच उठली असं पाहून वहिनीचे वडील म्हणाले, "आतां जाणार आहेस वाटतं कुठं ?"

" आतां किती सांगावं तुम्हांला दादा ? " उषा तिरसटून म्हणाली, " मला असलं कांहीं विचारीत जाऊं नका तुम्ही. "

उषा गेली असं पाहून ते वहिनीला म्हणाले, " पाहिलंस ? हें असं चाललंय. तूंसुद्धां चळवळींत होतीस. तूं असं म्हणाली होतीस का कधीं ? "

" तेंच मी विचारतेंय तुम्हांला. " वहिनी म्हणाली, " मी इथं असतांना कशी सुतासारखी सरळ वागत होती ही. माझ्यामागं तुम्ही तिला अशी ही चढवून ठेवलीत–"

" आता तूं काय वाटेल तें म्हण, " ते म्हणाले, " आहे हें असं आहे. म्हटलं, लग्न कर—तर मला विचारते, कुणाशीं लग्न करूं म्हणून. मी म्हटलं, रस्त्यावरच्या म्हाराशी कर, पण एकदां लग्न कर आणि मला मोकळा कर. जन्मभर एवढे व्याप केले, आतां सगळा धंदा सोडून विश्रांति घ्यावी म्हणून घरीं स्वस्थ बसलोंय—ही तिकडे पुण्यांत होती—बरा सुखांत होतों, ती आली धांवत पुन्हां मुंबईला. आणि क्रांति करणार आहे म्हणे ! वांति करायची देखील ताकद नाहीं आणि म्हणे क्रांति करणार ! अरे हें चाललंय काय ? नुसता भुसा दळताहेत. पीठ नाहीं कीं भरडाही नाहीं. किती सांगायचं आतां ? आणि काळज्या तरी किती काढायच्या ? त्यापेक्षां तुझ्या त्या नवऱ्याला सांग, या पोरटीला एकदां तुरुंगात घाल आणि चांगली चक्की पिसायला लाव एक वर्षभर, मग पाहूं कशी क्रांति करते ती ! "

म्हातारा सारखा बडबडत होता. मला क्षणोक्षणीं हसूं येत होतं. पण वहिनी मात्र अगदीं गंभीर झाली होती—नव्हे, तिची मुद्रा अगदीं उदासवाणी झाली होती. तिच्याकडे नजर गेली तेव्हां माझी वृत्ति एकदम बदलली. रमेशचं प्रकरण तर तिला आठवलं नसेल ? बोलावं म्हणून चटकन जिभेवर आलं होतं, पण विचार करून गप्प बसलों. पुन्हां आठवण झाली बोरीबंदर स्टेशनवरची—

बडबडत म्हातारा उठून निघून गेला. वहिनी तशीच बसून राहिली होती. मी विचारलं, " एवढी गंभीरशी झालीस ? "

माझ्या प्रश्नाचं सरळ उत्तर न देतां ती म्हणाली, " बोरीबंदरवर आपण उतरलों, तुम्हीं टॅक्सी पहात होतां—त्यावेळीं—"

" हो मीं पाहिलं. " मीं चटकन् म्हटलं, " मला संशय होता—"

" माझी चांगली दृष्टादृष्ट झाली !" वहिनी म्हणाली, " अगदीं शंकाच नाहीं मला. कसला डाव खेळतेय ही उषा ? पुन्हां कांहीं घरभेदेपणा तर करायचा नाहीं ना हिला ? एकदां माणूस घसरलं, कीं शेवटीं कोणत्या थराला जाईल तें काहीं सांगतां यायचं नाहीं. "

क्षणभर ती उगीच राहिली. यावेळीं कांही न बोलणंच बरं असा पोक्त विचार करून मीही स्वस्थ राहिलों.

म्हातारा पुन्हां आम्ही बसलों होतों तिथं आला आणि पुन्हां गप्पा सुरू झाल्या. जुन्या काळच्या गोष्टी निघाल्या होत्या. मोठा गोष्टीवेल्हाळ होता म्हातारा. जुन्या काळांतल्या खूपखूप गमती सांगत होता. कितीतरी माहिती मिळाल्यासारखं मला वाटलं. वहिनीही आतां मोकळी झाली होती. तेवढंच तें ओझं तिच्या मनावर होतं, तें हलकं झाल्याबरोबर ती पुन्हां रंगांत आली. अगदीं पहिल्यापासून म्हाताऱ्याचा वहिनी-वर मोठा जीव असावा असं त्याच्या भाषणावरून दिसून येत होतं. नित्याचा पोक्तपणा सोडून वहिनीसुद्धां आतां अगदीं पोराहून पोर झाली होती. लाडावलेलं पोर जितक्या पोरकटपणानं बोलतं तितक्याच जिव्हाळ्यानं ती बापाशीं बोलत होती. दोघंही माझं अस्तित्व पार विसरून गेलीं होतीं आणि ती जाणीव होऊं नये म्हणून मीही अगदीं मुकाट्यानं बसून राहिलों होतों.

मला आश्चर्य वाटलं तें हेंच, कीं बापलेकीचा इतका जिव्हाळा असतांना इतके दिवस ही बापाचं नांवसुद्धां कां काढीत नसे ? कीं इतक्या दिवसानंतर भेट झाल्यामुळं म्हाताऱ्याला बरं वाटावं म्हणून ती अशी लाडिकपणांत आली होती ?

त्या म्हाताऱ्याचं वात्सल्य पाहून माझं हृदय भरून आलं. इतकीं वर्षं मुलीचा वियोग झाल्यामुळं म्हातारा अगदीं आसुसला होता. हरवलेलं जुनं खेळणं मिळालं कीं मूल जसं खुषींत येतं तसाच अगदीं हुरळून बोलत होता. नितक्यांत एकाचा ठोका पडला.

" अरेच्या, एक वाजला ! " म्हातारा घड्याळाकडे पाहून म्हणाला, " किती लवकर वेळ गेला हा सुले ! काय बोलत सुटलों होतों मी ! फार दिवसांचं पारणं फिटल्यासारखं वाटलं—" माझ्याकडे वळून तो म्हणाला, " आणि या तुझ्या दीराला तर मी अगदींच विसरलों. माफ करा हं. अगदींच अबोल दिसतात हे. तुझ्या नवऱ्या-सारखाच स्वभाव आहे वाटतं यांचा ? त्यावेळीं तरी तुझा नवरा अगदीं अबोल होता.

आतां हेंच पहा, मुंबईला आला आहे—कामं असतील, मी नाहीं म्हणत नाहीं—पण एकदां नुसतं इथं येऊन जाण्याइतकासुद्धां वेळ मिळत नाहीं म्हटलेलं मला पटायचं नाहीं. जाऊं द्या. मोठी माणसं आहेत—कशाला आपण नांवं ठेवा ? आतां पड जाऊन. यांचा बिछाना आहे ना तयार ? ती पोर आली नाहीं ना अजून ? कीं घातली कुणी नेऊन तुरुंगांत ! टेकीला आला आहे माझा जीव. आतां स्वस्थपणें झोंप घ्या बरं बाळा-भाऊ. अन् आमचं हें जें कांहीं रामायण चाललं होतं, तें ऐकूं आलं तरी विसरून जा —" बोलत बोलत म्हातारा निघून गेला.

मी वहिनीकडे पाहिलं, तों तिचे डोळे भरून आले होते. मी चमकलों आणि विचारलं तेव्हां डोळे पुसून ती म्हणाली, " कितीं तरी दिवसांनीं माणसांत आल्या-सारखं वाटलं. तें खोटं जीवन, तो खोटा संसार, ते सारे खोटे लागेबांधे—समा-धानाचं केलेलं तें ढोंग—ती लबाडी—कळूनसवरून केलेली ती लबाडी—सारं कांहीं पार नाहींसं झालं होतं एका निमिषांत ! पुन्हां आठवण झाली, पुन्हां जाग आली, पडद्यावरच्या चित्रासारखी खोट्याची ती जाणीव समोर दिसली, तिचे ओरखडे निघाले आहेत हृदयावर ! काय होणार आहे पुढं माझं !—" असं म्हणून झट्कन ती तिथून निघून गेली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं जागा झालों तेव्हां कळलं, कीं अगदीं पहांटेच्या सुमाराला उषा परत आली होती. म्हातारा तिला एका दुरुत्तरानं देखील बोलला नाहीं. उठल्या-पासून सारखी माझ्या सरबराईची गडबड सुरू झाली होती. पाहुण्यासाठीं मटण आणावं कीं मासे आणावे याचाच खल चालला होता पुष्कळ वेळ. शेवटीं दोन्हीं आणायचीं ठरलीं.

सकाळच्या चहाबरोबर सुद्धां चांगले वशीभर जिन्नस आणून ठेवले होते. इतक्या लौकर ही मेवामिठाई आली कुठून याचा मला प्रश्न पडला. मी विचारलं सुद्धां—तेव्हां म्हातारा म्हणाला, " आमच्या त्या जुन्या प्रपंचातले गुजराती दोस्त अजूनसुद्धां येतात रोज भेटायला. त्यांच्यासाठीं आणून ठेवावं लागतं हें सारं ! पण मी मात्र अगदीं जातिवंत सारस्वत आहें. चहाबरोबरसुद्धां तळलेले मासे हवे असतात मला. तेच देणार होतों तुम्हांला. पण तुम्हीं घाटावर वाढलेलीं माणसं—जात विसरून गेलां आहांत ! या आमच्या गुजराती दोस्तांनासुद्धां मी शिकवलंय खायला. कपाशीच्या बाजारांतले व्यवहार तुम्हांला माहीत नसतील. आपसांत मोठी चुरस असते आम्हां लोकांची—पण तितकीच आपुलकी असते

एकमेकांबद्दल. म्हणूनच ना अजून रोज घरीं येतात ? अजूनसुद्धां मला खेचूं पहातात बाजारांत. पण मनाचा धडा करून एकदां त्या रिंगणातून जो बाहेर पडलोंय तो असा स्वस्थ बसून राहिलोंय—" जुन्या हकीकती सांगायला म्हाताऱ्यानं सुरवात केली. वहिनी शेजारीं बसलीच होती उपाही तितक्यांत आली. तिला वहिनीनं चहा करून दिला पण म्हाताऱ्यानं तिच्याकडे ढुंकूनसुद्धां पाहिलं नाहीं. उपाही माझ्याकडे कांहीं बोलली नाहीं.

लवकर स्नान उरकून मी आंतल्या दिवाणखान्यांत जाऊन बसलों. बाहेरच्या दिवाणखान्यांत म्हाताऱ्याचे गुजराती दोस्त आले होते. कालपासून पाहिलेली त्याची ती वेल्हाळ वृत्ती आतां मुळीच नाहींशी झाली होती. एकाद्या शांत, पोक्त, गंभीर माणसाप्रमाणें त्याचं बोलणं सुरू होतं.

बराच वेळ बसल्या जागेवरून मी तीं भापणं ऐकत होतों. मला एक धागा सांपडला. हीं सारींच माणसं द्विस्वभावी आहेत, असं त्यावेळीं मला चट्कन जाणवलं. वहिनीचं पहिल्यापासूनचं चरित्र आठवून मी जसजसा विचार करूं लागलों, तसतशी या माझ्या शोधाला बळकटी येते आहे असं मला वाटलं.

इतक्यांत हातांत बॅग छत्री घेऊन उपा आंत आली. खोलींतल्या कपाटांतली कांहीं तरी वस्तु काढून घेऊन ती जायला निघत होती तोंच तिला थांबवून मी म्हटलं, " कांहीं गृहस्थपणा म्हणून आहे कीं नाहीं उषे ! तुझ्या घरीं आलोंय मी, निदान दोन गोड शब्दांनीं तरी माझं स्वागत करायचं ? "

" माफ करा हं. " उपा माझ्याकडे वळून हंसण्याचा प्रयत्न करीत म्हणाली, "एवढीं कामं आहेत माझ्यामागं, की जीव द्यायलासुद्धां मला फुरसत नाहीं. दोन ताससुद्धां झोंप मिळाली नाहीं मला. हें एवढं होऊन जाऊं द्या —"

" पण तुझ्या त्या एकेक मोठ्या माणसांची मला ओळख करून देणार होतीस ना ? "

" ही वेळ आहे का ती ? एवढं कसं कळत नाहीं तुम्हांला बळवंतराव ? श्वास टाकायला फुरसत आहे कुणाला. जमिनीला पाय लावायलासुद्धां थारा नाहीं. We are always on wheels. सारख्या चकरा मारीत आहोंत इकडून तिकडे अन् तिकडून इकडे. उद्यां क्रांतीचा दिवस—अन् मी काय तुमच्या ओळखी करायला जाऊं ? काय म्हणतील तीं माणसं मला ? अशी सामान्य माणसं आहेत का तीं ?—कीं

दादांचे शेठये आहेत ? माफ करा हं. जायची वेळ झाली ! " असं म्हणून ती भिरेकन निघून गेली.

वहिनी दारांत उभी राहून ही गंमत पहात होती, ती पुढं येऊन म्हणाली, "काय ? झाली फजीती ? उषेचींच वचनं तीं—"

" असं म्हणूं नकोस वहिनी, " मी रागाला येऊन म्हणालों, " प्रत्येक बावतींत तिला असा दोष देणं बरं नव्हे. खरोखरच हा गडबडीचा दिवस आहे त्या लोकांचा. "

" असेल असेल, " वहिनी म्हणाली, " तसंही असेल—नव्हे आहेच. माझी चूक झाली. "

" बैस ना. " मीं वहिनीला म्हटलं, " माहेरीं येऊन अशी उभी कां रहातेस सून-माणसासारखी ? "

" माहेरीं आलें म्हणूनच उभी राहिलें—नाहींतर आजवर बसूनच राहिलें होतें की ! पुन्हां कसं अगदीं लहान झाल्यासारखं वाटतं. सकाळीं जिन्यावरून उगीच धडधडत खालीं गेलें नि धडधडत वर आलें. बरं वाटलं मनाला. संकोच गेलासा वाटला. लहान असतांना एकदां या जिन्यावरून मी पडलें होतें, त्याची आठवण झाली मला. म्हटलं आतां सुद्धां पडेन. पण कांहीं पडलें नाहीं ! ती त्यावेळची गंमत कांहीं आतां राहिली नाहीं ! "

तिच्या त्या पोरकट उद्गाराचं मला कौतुक वाटलं. तिकडे घरीं ती असलं कांहीं सुद्धां बोलली नसती. मला हसूं आलं असं पाहून ती म्हणाली, " हसूं नका भावजी, हें स्थानमहात्म्य आहे. याच घरांत मी लहानाची मोठी झालें. त्यापूर्वी आम्हीं चाळींत रहात होतों. ही वाळकेश्वरवरची बंगली माझ्या जन्मानंतर घेतां आली हा माझाच पायगुण, असं आई म्हणे. त्या जुन्या आठवणी जाग्या झाल्या, कीं माणूस एकदम लहान होतं. तसं झालं आहे मला आज. पाह्यलंत ना कशी सकाळपासून भिरभिरतें आहें या घरांत ? अगदीं परकरी पोर झाल्यासारखं वाटतंय मला. "

" अशीच रहा वहिनी, अशीच रहा ! " मी एकदम गहिंवरून म्हणालों, " हें तुझं नवं स्वरूप मला दिसलं तेव्हां तिथल्या त्या स्वरूपाची शिसारी येऊं लागलीय. कां असा स्वतःचा बिघाड करून घेतलास ? काल तुझे दादा तुझ्या गोष्टी आठवीत होते—मला त्या खऱ्यासुद्धां वाटेनात. एवढी भिंगरीसारखी पोर—कां अशी पोक्त आजीबाई झाली ? याचाच विचार करीत होतों सारी रात्रभर ! " बोलतां बोलतां मला भडभडून आलं.

माझा मनावरचा तावा यापूर्वी अशा प्रकारें कधींच सुटला नव्हता. वहिनीचे डोळेसुद्धां ओलावले होते. आनंदाश्रूंचा आनंद उभ्या आयुष्यांत मी हा पहिल्यानंच अनुभवला. तिच्या डोळ्यांतले हे आनंदाश्रूसुद्धां मी पहिल्यानंच पहात होतों.

मनाची मोठी विलक्षण कालवाकालव झाली होती. काळीज फुटून बाहेर येईल कीं काय असं वाटूं लागलं होतं. नाकाकानांतून एकदम ज्वाळा आल्यासारख्या वाटल्या. मस्तक भिरभिरूं लागलं. " अशीच रहा वहिनी, अशीच रहा ! " असं म्हणत म्हणत मी एकदम कोसळणार होतों तोंच वहिनीनं पुढं येऊन सांवरून मला कोचावर बसवलं. विजेचा धक्का बसल्याप्रमाणं नखशिखान्त झिणझिण्या सुटल्या. एक क्षणभरच—मूर्च्छा आल्यासारखं वाटलं. डोळ्यापुढं आंधेरी येऊन गेली. तोंच कानीं शब्द आले—

" मोठे भाग्यवान आहांत बाळाभाऊ, " म्हातारा सांगत होता, " तुमच्या नशी-बानं आज एवढालीं मोठालीं कालवं मिळालीं ! "

त्या दिवशीं जेवण मोठ्या थाटांत झालं—मोठ्या आनंदांत झालं—साऱ्या जन्माचं जेवण एका बैठकींत उरकल्यासारखं वाटलं. खरोखरच माझा भाग्याचा दिवस होता आज !

मात्र उषा आज पंक्तीला नव्हती.

******

# १३

मुंबईंत ज्या कामासाठीं मी आलों होतों त्या कामासाठीं रपेटा कुठं मारायच्या याची मला चांगलीशी कल्पना नव्हती. भाड्याची टॅक्सी करून माझ्यासारख्या गैर-माहित माणसाला हें काम करतां आलं नसतं. वहिनीच्या वडिलांची पूर्वी मोटर होती. पण धंदा सोडल्यानंतर त्यांनीं ती काढून टाकली होती. काय करावं या विचारांत मी होतों.

शेवटीं वहिनीच्या वडिलांनींच व्यवस्था करून दिली. त्यांच्या एका व्यापारी मित्राची मोटर दोन दिवसांसाठीं सर्वस्वीं माझ्या ताब्यांत द्यायची व्यवस्था त्यांनीं केली.

गिरणगांवच्या भागांत ठिकठिकाणीं सभा सुरू होत्या. लाल पुढारी व्याख्यानं देत होते. एक दिवस कामकऱ्यांचं राज्य मुंबईत प्रस्थापित होणार अशी घोषणा प्रत्येक वक्ता करीत होता. माझ्या गाडीत मी एकटाच होतों. वहिनीला माझ्याबरोबर यायचा आग्रह केला पण माझी मागणी नाकारून पूर्वीच्या आपल्या जोडीच्या देश-सेविकांच्या लॉरीतून ती गेली होती. शांतता राखण्याचा संदेश देत देशसेविकांच्या या दोन लॉऱ्या परेल रस्त्यावरून जात असतांना एक सायकलवाला त्यांच्या आड आला आणि त्यानं लॉऱ्या थांबवल्या. कांहीं गुंड लोक त्यांच्यावर तुटून पडले, त्यांत एक प्रसिद्ध कम्युनिस्ट पुढारीही होते. देशसेविकांना अत्यंत घाणेरड्या भाषेंत शिव्या देण्यांत येत होत्या. गर्दीतल्या कित्येक लोकांनीं पुढं घुसून देशसेविकांच्या साड्या ओढायलासुद्धां कमी केलं नाहीं.

तो प्रकार पाहून मी घाबरलों. लॉरींत असलेल्या वहिनीला माझ्या गाडींत येऊन बसायला सांगितलं तेव्हां ती म्हणाली, " इथं मी एक नाहीं. या साऱ्यांनाच घेणार आहांत का तुमच्या गाडींत ? "

इतक्यात कुणी तरी कुणाच्या तरी डोक्यावरची एक गांधी टोपी ओढून घेतली आणि भर रस्त्यावर जाळली. किरकोळशिरकोळ शिवीगाळ आणि दंगामस्ती प्रत्येक ठिकाणीं होत होती. सर्वांच्या रोषाचा रोख होता काय तो कॉंग्रेसवाल्यांवर.

घरीं आल्यानंतर आम्ही एकमेकांच्या माहितीचा अंदाज घेऊन मेळ घालून पाहूं लागलों तेव्हां मला घाबरटपणा वाटल्यावांचून राहिला नाहीं. वहिनी म्हणाली, " घाब-रायचं काय त्यांत ? पोलीस आज विरुद्ध नाहींत. पोलीस आपल्या बाजूला आहेत. किंबहुना पोलिस आज आपले आहेत. हातीं शस्त्र असलं तर अत्याचार करायची प्रवृत्ति होते, तें शस्त्र आज आमच्या म्यानांत पडलं आहे, म्हणूनच मला भीति वाटत नाहीं. "

" चुकतेस वहिनी," मी म्हटलं, "तूं तीं व्याख्यानं ऐकलीं नाहींस. त्या व्याख्यानांतल्या श्रोत्यांत कांहीं वेळ घुसून मीं अंदाज घेतला. तेवढ्यासाठीं मीं डोक्याची टोपी काढून ठेवली होती. काय वाटेल तो प्रकार करून उद्यां पोलिसांना गोळीबार करायला लावायचा, असा चंग बांधला आहे त्या लोकांनीं. अहिंसावादी कॉंग्रेसच्या राजवटींतसुद्धां गोळीबार होतो असं ठरवायचं आणि अशा रीतीनं कामगारांना कॉंग्रेसविरुद्ध चिथवायचं, असा पक्का घाट घालून ठेवला आहे त्यांनीं, म्हणूनच मी घाबरलों. आंबेडकरांच्या स्वयंसेवकांची

भाषा तूं ऐकली असतीस म्हणजे असं म्हटलं नसतंस." जेवढ्या सौम्य शब्दांत सांगतां येईल तितक्या सभ्य भाषेंत मी ती हकीकत सांगितली तेव्हां वहिनीसुद्धां गंभीर झाली. वहिनीचे वडील म्हणाले, "असं कांहीं असेल तर त्या दुसऱ्या पोरीला कोंडून ठेवली पाहिजे मला खोलींत. मुळच्या तुम्ही पोरी बेफामच. माझाच दोष उतरला आहे या पोरींच्या आंगीं. अगा बेफाम नसतों तर कापूसबाजारांत मात करतां आली नसती मला. मी त्या बाजारांत खेळलों, या या बाजारांत खेळताहेत. एकूण एकच!"

"तुम्ही खूप ठेवाल तिला कोंडून," वहिनी म्हणाली, "पण ती आली पाहिजे ना घरीं! कालपासून जी गेली आहे तिचा अजून पत्ता नाहीं."

"एकदोन सभांच्या तिकडे मला दिसली होती ती." मी म्हटलं, "तिला गांठून बरोबर घेऊन यावं असं देखील आलं होतं माझ्या मनांत. पण त्या गर्दींत ती केव्हां कुठं गेली त्याचा मला पत्ता लागला नाहीं. लालबावट्याच्या एका लॉरींत आणखी एकदोनदां ती दिसली होती. तेवढ्यावरून एवढंच म्हणायचं, कीं अजून कुठंतरी ती सुखरूप आहे."

त्या रात्रींसुद्धां उषा घरीं आली नाहीं. त्रागा करून वहिनीचे वडील सारखे बडबडत होते. त्यांचा जीव अस्वस्थ झाला होता यांत शंका नाहीं. त्या रात्रीं मला देखील चांगलीशी झोंप लागली नाहीं. रात्रीतून दोनतीन वेळ उठून वहिनीचे वडील कानोसा घेऊन गेल्याचं मला म्हणूनच दिसून आलं.

मला नेणारी मोटर पांच वाजतां येणार होती म्हणून मी त्यापूर्वीं उठून निघायच्या तयारीला लागलों, तेव्हां म्हातारा बाहेर येऊन म्हणाला," असं पहा बाळाभाऊ, सुलूला देखील आज जाऊं द्यायचं नाहीं तिकडे, असं मी म्हणतोंय. उषेचा तर अजून पत्ताच नाहीं. अन् हीही गेली तर माझा जीव वेडापिसा होईल. कसल्या अचाट कार्ट्या निपजल्या आहेत या! तो तुमचा भाऊ तरी आला असता तर त्याला कांहीं सांगतां आलं असतं—पण त्याचाही कांहीं पत्ता नाहीं. आज सारा दिवस पुन्हां पूर्वींच्यासारखं टेलिफोनवर बसून रहावं लागणार मला."

ते बोलत असतांना वहिनी तिथं आली. ती म्हणाली, "टोपी घालून जाऊं नका भावजी. उगीच धोका ओढवून घेऊं नका. तुम्हीं एकटे जाणार आहांत, संरक्षण कुणाचंच नाहीं, अशा वेळीं भलता हट्ट धरणं बरं नव्हे. ती टोपी काढून ठेवा."

तिच्या करड्या हुकमासरशीं मी केव्हां टोपी काढून ठेवली तें माझं मलाच कळलं नाहीं.

गाडींतून निघालों त्यावेळीं माझ्या छातींत धडकी भरली होती. या अफाट मुंबईतल्या त्या अफाट चळवळी माझ्या परिचयाच्या नव्हत्या. डबक्यांतून समुद्रांत पडल्यासारखं मला वाटत होतं. पाहायचं तें अजून पुढंच होतं, तरी देखील जेवढं कांहीं पाहिलं तेवढंच पाहून माझे डोळे फाटून गेले होते.

डिलाईल रोडवरून आम्ही सिमिटाच्या चाळीकडे गेलों. लाल स्वयंसेवकांपेक्षां महार स्वयंसेवकच जास्त पिसाळले होते. घरोघर जाऊन खोल्याखोल्यांतून तंबी देत होते. कालच्या व्याख्यानांतून शांततेचा कितीही पुरस्कार करण्यांत आलेला असला तरी आजच्या प्रचाराची भाषा कांहीं शांततेची नव्हती. " हिंदूच्या बीजाचे असाल तर आज घरीं बसून रहाल ! " असं प्रत्येकाला बजावण्यांत येत होतं.

मला आश्चर्य वाटे तें हेंच, कीं या चळवळींत धर्माचा प्रश्न कां येतो आहे ? साम्यवादाचा आणि धर्माचा काय संबंध ? मी बारकाईनं पाहिलं त्यावेळीं मला दिसून आलं, कीं धर्माच्या नांवाखाली शपथा घालणारे स्वयंसेवक स्वतंत्र मजूरपक्षाचे होते. अत्यंत ओंगळ भाषेत या शपथा घालण्यांत येत होत्या आणि त्यामुळं बऱ्याचशा पापभीरू आणि धर्मभीरू लोकांवर त्या शपथांचा परिणाम होत होता. गिरणगांवांत साम्यवादाचा कितीही प्रसार झाला असला, हातोडाकोयत्याचं सोनेरी रंगाचं प्रतीक झळकावीत लाल बावटा कितीही जोरानं फडकत असला, तरी चर्मचक्षूंना न दिसणारा हिंदुधर्माचा बावटा त्या लाल बावट्याच्या डोक्यावर अदृश्य रूपांत खास झळकून राहिला होता ! म्हणूनच अशिक्षित समाजाच्या हृदयांत खोल रुतून बसलेलीं धर्मभावनेचीं खुळीं खुळं हुडकून काढून त्यांवर मारा करण्यांत येत होता. हा प्रचाराचा प्रामाणिकपणा आहे असं मला वाटलं नाहीं.

सकाळीं आठ वाजेपर्यंत फारशी गडबड झाली नाहीं. दंग्याच्या भीतीनं कित्येकांनीं भल्या पहाटेस गिरण्या गांठल्या होत्या. कांहीं ना कांहीं हिकमती लढवून आज गिरणींत हजर रहाण्याची पुष्कळांची प्रवृत्ती दिसून येत होती. अशा परिस्थितींतही चुकून जाणाऱ्या कांहीं बायकांची अब्रू घेण्यासाठीं कित्येक महार स्वयंसेवकांनीं निर्दयपणानं त्यांच्या चोळ्यांना हात घालून त्या टराटर फाडल्या. स्त्री जातीची अब्रू लपवण्यासाठीं पदरानं अंग लपेटून घेऊन त्या बायका घराकडे पळत सुटल्या. तें दृश्य पाहून माझ्या

अंगाचा तरी भडका झाल्यावांचून राहिला नाहीं. अनत्त्याचाराचं ब्रीद विसरून या स्वयं-सेवकांना वडवून काढावं असं पदोपदीं वाटूं लागलं.

कामगारांचीं मनं वळवून संप घडवून आणण्याची केवढीही मोठी शेखी पुढाऱ्यांनी मिरवली, तरी संपाच्या गैरहजेरीला दंडेलीचंच सहाय्य झालं होतं यांत शंका नाहीं. साठ हजारांपेक्षां जास्त कामगार गिरणींत हजर होते. म्हणजे जवळ जवळ निम्मे लोक गिरणींत गेले होते. दुपारच्या सुट्टींत ते बाहेर आले, कीं त्यांना पुन्हां आंत जाऊं द्यायचं नाहीं, असं ठरवून हल्ल्याची योजना करण्यांत आली होती. रस्त्यावरून जाणाऱ्या बसवर सरसहा दगडफेक करण्यांत येत होती. ट्रॅममधें कुणी बसूं नये म्हणून हुल्लडवाले स्वतःच सारी ट्रॅम काबीज करीत होते. कित्येक ट्रॅमच्या समोर आडवे राहून रहदारी बंद करीत होते. दहा ते बारा वाजेपर्यंत अशा तीस पस्तीस ट्रॅमगाड्यांना अडथळा करण्यांत आला. पोलिसांनीं तो अडथळा दूर करून ट्रॅमची खोटी होऊं दिली नाहीं. दगडफेकीमुळं ट्रॅमगाड्यांचं बरंच नुकसान झालं असावं. फेरीवाल्यांच्या चणेकुरमुऱ्यांची नासधूस करण्यांत आली. दूधवाल्या भय्यांच्या दुधाचीं भांडीं ओतून टाकण्यांत आली. चहाच्या दुकानांत शिरून हुल्लडवाल्यांनीं दंगा माजवून कपबशा फोडून नुकसान केलं.

हे असले किरकोळ दंगे करण्यांत लाल बावटावाले जरी पुढं होते, तरी अत्याचार होत होते ते महार स्वयंसेवकांकडून. बायकांना त्रास देण्यांत हे स्वयंसेवक सदोदित पुढं असत. ते म्हणत, ' पगार बुडेल म्हणून कां भितां ? अन्न द्यायला मराठे समर्थ नसतील तर आमच्या बाबासाहेबांकडे जा. आम्ही घेऊं तुम्हां बायकांची काळजी. आतां बाबा-साहेबांचं राज्य सुरू झालेय इथं ! '

दादर मेनरोडवर गोल्डमोहोर मिलच्या बाजूला एक भयंकर प्रकार घडला. एक कामकरी बाई जात होती तिचे कपडे ओढून काढून तिला अक्षरशः नागवी केली. हुल्लडवाले लोक घाणेरड्या शब्दांनीं तिची विटंबना करूं लागले. त्यावेळीं एक गोरा पोलीस अधिकारी तिथं धावत आला तेव्हां हुल्लडवाले पळून गेले. कसंबसं वस्त्र गुंडाळून त्या बाईला त्या अधिकाऱ्यानं ट्रॅममधें बसवून दिलं.

हा प्रकार प्रत्यक्ष पाहिला तेव्हां माझं रक्त सळसळून उठलं. हीच का ती शांततेची चळवळ ! हीच का ती स्वयंस्फूर्त चळवळ ! हेंच का साम्यवादाचं ब्रीद ! हाच प्रसंग एकाद्या साम्यवादी पुढाऱ्याच्या आईबहिणीवर आला असता तर त्यानं काय केलं असतं ? या असल्या अत्त्याचारी माणसावर गोळ्या झाडाव्या असं नसतं का वाटलं त्याला ?

पण गोळीबार झाला तो यावेळी नव्हे. एका बाईला नागवी करण्याचा असाच प्रकार काळ्या चौकीजवळ झाला. तिथं त्या बाईच्या मदतीला एक पोष्टमन धावून गेला होता. त्या जागीं मी प्रत्यक्ष हजर नव्हतों. ती माझी ऐकीव माहिती होती.

दुपारीं जेवायला मी घरीं आलों त्यावेळीं देशसेविकांबरोबर गेलेली वहिनी परत आली नव्हती. गिरगावांतून सकाळींच निघालेली ' रामा ' गड्यांची मिरवणूक अत्यंत शांततेनं पार पडल्याचं मला कळलं. या मिरवणुकीच्या अग्रभागीं गोदूताई गोखलेप्रभृति बायका होत्या. त्याच घोळक्यांत तिथं कदाचित् उषा असावी. बायकांच्या हस्तें झालेल्या निदर्शनांत कोणताही दंगा झाला नाहीं.

ठिकठिकाणीं लहानमोठे अत्याचार झाल्याची बातमी येत होती. सकाळीं एकदोन ठिकाणीं गोळीबार झाल्याचीही बातमी आली होती. पण तिचा तपशील मला अजून कळला नव्हता.

संध्याकाळीं साडेपांच वाजतां कामगारमैदानावर सभा भरली होती. त्या सभेला तीस-चाळीस हजार माणसं हजर असावीं. कित्येक लाखांच्या हजेरीचे आकडे बोलले जातांना त्या मैदानावर किती माणसांचा समावेश होतो याची खिजगणती कुणी केली नाहीं. जीं भाषणं झालीं त्यांत त्या दिवसाच्या संपाचा आढावा घेतांना संपवाल्यांच्या संख्येचे आंकडे बेसुमार फुगवण्यांत येत होते. शिस्तीनं आणि शांततेनं संप पार पाडण्यांत आला अशी घोषणा करतांना, नागव्या केलेल्या असहाय बायका आणि चोळ्या फाडून घेतलेली बायकांची अब्रू, पुढाऱ्यांच्या खिजगणतींतच का नव्हती ?

काळ्या कायद्याच्या प्रवर्तकांवर बेसुमार तोंडसुख घेतल्यावर डॉ. आंबेडकर म्हणाले, " एक लाख पंचवीस हजार कामगार आज इथं जमले आहेत. एक दिवसाच्या पगारावर दरिद्री माणसांनीं पाणी सोडलं आहे कॉंग्रेसनं हवे ते कायदे करावे आणि त्यांना विरोध करतांना जर कुठं कांहीं दंगा झाला तर पोलिसांनीं गोळीबार करावा ! कॉंग्रेसचे लोक अधिकारारूढ व्हावे, त्यांनीं वाटेल ते कायदे पास करावे आणि त्या कायद्यांचा निषेध करण्यासाठीं लालबावटा फडकावीत, स्लोगन्स ओरडत माणसं गोळा झालीं, कीं आपल कर्तव्य संपलं असं जर तुम्हांला वाटत असेल तर तुमच्यासारखे मूर्ख कुणी नाहीं. शहाणपणाचा मार्ग म्हणजे हाच कीं, कॉंग्रेससरकारच्या हातून सत्ता हिसकावून घेतली पाहिजे. कॉंग्रेसच्या हातीं सत्ता देऊन स्वतःचे गळे कापून घेण्याइतका दुसरा मूर्खपणा नाहींत. शत्रूच्या हातीं हत्यार देण्यासारखा मूर्खपणा करूं नका. तुम्हांला अजून कळत

नाहीं. तुमचा पाठिंबा कॉंग्रेसला मिळाला नसता तर हा काळा कायदा पास झाला नसता. होळी अजून यायची आहे. तुम्हांला तुमचं राज्य स्थापन करायचं असेल तर यावेळी तुम्हीं असंच केलं पाहिजे, कीं ज्या ज्या ठिकाणीं कॉंग्रेसच्या हुकमतीचा आणि अधिकाराचा प्रश्न येईल अशा साऱ्या जागा तुम्हीं काबीज केल्या पाहिजेत. हेंच तुम्हांला मला सांगायचं आहे. येत्या डिसेंबरांत मुंबई म्युनिसिपॅलिटीचं इलेक्शन आहे. त्यासाठीं कॉंग्रेसचे उमेदवार उभे रहातील. त्यावेळीं स्वतंत्र मजूरपक्षाचे उमेदवार कॉंग्रेसच्या उमेदवारांविरुद्ध उभे रहाणार आहेत. गेल्या पंधरा महिन्यांत कॉंग्रेसनं काय काम केलं तें पहा आणि या अनुभवावरून हा धडा घ्या, कीं कॉंग्रेसवाल्यांना मत द्यायचं नाहीं, हेंच आपलं कर्तव्य आहे. मजुरांचं राज्य पाहिजे असेल तर कौन्सिलं, म्युनिसिपॅलिट्या आणि इतर संस्था यांत तुमचे प्रतिनिधि गेले पाहिजेत. हा माझा उपदेश विसराल तर आज झालेला हा सारा कार्यक्रम निरर्थक ठरेल.—"

अध्यक्ष जमनादास मेहता यांनीं आपल्या भाषणांत याच गोष्टींचा निराळ्या प्रकारें अनुवाद केला आणि आतां कामगारांचं राज्य येणार अशी घोषणा केली.

खादीची टोपी घातलेला एकच माणूस या जमावांत दिसत होता. बाकीच्या कुणा-च्याच डोक्याला खादीची टोपी नव्हती. तो म्हातारा साऱ्या श्रोत्यांतून इकडून तिकडे हिंडत असतांना आंबेडकरांचे कडवे स्वयंसेवक देखील त्याला उपसर्ग करीत नव्हते एवढंच नव्हे, तर त्याच्यावर कुणी हल्ला करूं नये म्हणून खबरदारी घेत होते.

सभा संपल्यानंतर देखील किरकोळ चकमकी होत होत्याच. गिरण्यांत गेलेले कांहीं मजूर परत येत होते त्यावेळीं त्यांच्यावर दगडफेंक करण्यांत येत होती. दगडाला जर हत्यार म्हणायचं नसेल तर मात्र हे लोक निःशस्त्र होते खरे. बंदुकींतल्या गोळीप्रमाणेंच दुरून फेकलेल्या दगडाचा मारा प्राणघातक होऊं शकतो हें ज्याला पटत नसेल, त्यानंच या लोकांना निःशस्त्र म्हटलं असतं.

मला उद्वेग येत होता—चीड येत होती—अंगाचा भडका उडत होता तो एकाच गोष्टीमुळं,—भर दिवसा मुंबईच्या उघड्या रस्त्यांत शेकडों माणसं वावरत असतांना त्या एका मायबहिणीला नागवं करण्यांत आलं ! या प्रकाराबद्दल या वक्त्यांपैकीं कुणीसुद्धां—कम्युनिस्टांनींसुद्धां या सभेंत दिलगिरी प्रदर्शित केली नाहीं. हा अघोरी अत्याचार प्रत्यक्ष कुणाचा जीव घेण्यापेक्षांही निर्घृण होता. त्याचा निषेध न करणं म्हणजे त्या प्रकाराचं समर्थन करणं होय असं मला वाटलं. त्या दिवशींच्या सभेंत तर

नाहींच, पण त्या नंतरच्यासुद्धां कुठल्याही सभेंत निषेध न केल्यामुळं या अत्याचाराला कम्युनिस्टांनींसुद्धां मान्यता दिल्यासारखं झालं होतं.

त्या असहाय मायबहिणीची ती भयंकर केविलवाणी मुद्रा अजूनही माझ्या डोळ्यासमोर दिसते आहे ! त्या विटंबनामय परिस्थितीची टिंगल उडवून ही ही करीत हंसणाऱ्या माणसांवर गोळीबार केला असता तर निदान मला तरी दुःख झालं नसतं. भारतीयांच्या सुसंस्कृत भूमींत स्वजनांकडूनच स्वजनांची अशी विटंबना होईल असं मला स्वप्नांतसुद्धां वाटलं नसतं.

म्हणूनच बाकीचे सारे अत्याचार विसरून ही एकच अघोरी घटना माझ्या नजरे-समोर सारखी नाचत होती. घरीं आल्यानंतर मी ती हकीकत सांगितली तेव्हां वहिनीचे वडील भडकून उठले. एल्फिन्स्टन मिलच्या शेजारच्या तुळशीपाईप लाईनच्या एका पायपुलावर, पोलिस अधिकाऱ्यांना वळचणींत गांठून चोहींकडून घेरून दगडाचा मारा सुरू केल्यामुळं, पोलिसांना गोळीबार कसा करावा लागला, याची स्वतः पाहिलेली हकीकत वहिनीनं मला सांगितली तरी ती माझ्या कानांत घुसली नाहीं. दादर मेनरोडवरील त्या बाईच्या त्या भीषण दिसणाऱ्या केविलवाण्या मुद्रेखेरीज मला दुसरं कांहींसुद्धां दिसत नव्हतं. मी म्हटलं, " पोलिसांनीं स्वसंरक्षणा-साठीं गोळीबार केला, कायद्याच्या कोर्टात तो समर्थनीय ठरेल, पण मला त्याचं कांहीं वाटतं नाहीं. गोळीबार व्हायला पाहिजे होता तो त्या बाईला नागवी केली तेव्हां. तुला तरी असं वाटलं पाहिजे वहिनी. "

" माझं मत फार वेगळं आहे. " वहिनी म्हणाली, " जुन्या राजवटींत वाढलेल्या पोलिसांनीं ती जुनी परंपरा चालवली. कॉंग्रेसच्या ब्रीदाचे पोलिस अधिकारी असते तर आपल्या भाऊबंदांच्या हातच्या दगडांचा मार खाऊन मरून हुतात्मे झाले असते. अस्सल कॉंग्रेसजन ठरले असते. त्या त्यांच्या घातांतूनच त्या दिवशीं पुढं झालेले अत्याचार आपोआप बंद पडले असते. पण कलिंगदेशानं पुराणकाळीं आचार-लेलं आणि आज गांधीजींनीं प्रस्थापित केलेलं हें अनात्याचाराचं अस्सल भारतीय तंत्र गळीं न उतरण्याइतका, आमचा समाज जडवादी इंग्रजी शिक्षणानं मुर्दाड बनला आहे. त्याला कुणी काय करायचं ? मला वाईट वाटतं तें एकाच गोष्टीचं, कीं हे पोलीस अधि-कारी ' मुसलमान आहेत म्हणून ' त्यांच्यावर मारा करण्याची जी चिथावणी देण्यांत आली होती त्याचं. हाच का समतावाद ? कम्युनिस्टांच्याकडून या सर्व दंग्यांत अत्यंत हलगर्जीपणा झाला. आंबेडकरांचे स्वयंसेवक काय करीत होते, हें त्यांनीं टेहळून पाहिलंच

नाहीं. ते आपल्याच रंगांत दंग होते. लालबावटेवाल्या स्वयंसेवकांनीं हुल्लड केली असली तरी अत्याचार केले नाहींत हें मात्र मी निश्चयपूर्वक सांगेन. ”

“ तेंच माझं म्हणणं आहे, ” मी म्हटलं, “ मलासुद्धां अगदीं तेंच दिसून आलं. आतां या दोहोंची गल्लत होईल आणि लालबावटेवाल्यांवर अत्याचाराचा निष्कारण आरोप येईल याचंच मला वाईट वाटतं. ”

आम्हीं बोलत बसलों होतों तोंच उषा आली. तिचं सारं स्वरूप पालटलं होतं. केस पिस्करले होते, सर्वांग धुळीनं माखलं होतं, अंगावरची साडी ठिकठिकाणीं फाटली होती—तिचा तो अवतार पाहून म्हातारा हंसत सुटला आणि म्हणाला, “ हा पहा एक आघाडीचा वीर आला. किती जखमा झाल्या आहेत ग तुला ? ”

“ जखमा कशाला होतील ? ” उषा चिडून म्हणाली, “ आम्हीं कांहीं मारामारी करायला गेलों नव्हतों ! ”

“ गप्प बैस ! ” वहिनी ओरडली, “ खोटं बोलूं नकोस. रस्त्यावरून जाणाऱ्या बायकांच्या चोळ्या फाडायच्या, देशसेविकांचे पदर ओढायचे, येत्याजात्यावर दगड-फेक करायची—नुसता आरडाओरडा—नुसती दंगल—नुसती हुल्लड म्हणजे कांहीं क्रांति नव्हे उषे ! क्रांतीचे शिपाई बेशिस्त नसतात—भर दिवसा, भर रस्त्यावर, तुझ्यामाझ्यासारख्या एकीला नागवी करणारे दुःशासन नसतात कीं कीचकही नसतात ! हा साम्यवाद मार्क्सचा नव्हे कीं लेनिनचाही नव्हे. लेनिननं क्रांति केली त्यावेळीं तो असा परक्याच्या कुशींत शिरला नव्हता. आंबेडकर जमनादासांसारख्यांच्या पदराखालीं तोंड लपवून लेनिन क्रांति करायला निघाला असता, तर सोव्हिएट सरकार अस्तित्वांतच आलं नसतं. स्वतःच्या मनगटांत जोर नाहीं, तर कशाला निघतां चळवळ करायला ? काय केलंत ही आजची क्रांति करून ? म्युनिसिपालिटीच्या पुढल्या इलेक्शन-नची तयारीच ना ? तेवढ्यासाठींच कशाला करायला हवा होता एवढा अनर्थोपात ? उघड उघड लढवा कीं इलेक्शनं ! या असल्या उपायांनीं कॉंग्रेसची शक्ति हाणून पाडतां येईल असं तुम्हांला वाटत असेल तर तो तुमचा भ्रम आहे ! घ्या हें माझं आव्हान आणि लढवा पाहूं निवडणुकी ! कॉंग्रेस उभी आहे ती स्वतःच्या पायावर—लेनिनसारखीच कॉंग्रेस एकजुटीनं लढते आहे. नुसतं हत्यार तेवढं निराळं. आपली लढाई लढण्यासाठीं वैऱ्याला बोलावून आणण्याइतकी कॉंग्रेस आत्मघातकी नाहीं. स्वातंत्र्य मिळवायचं असेल तर आमचे आम्हीं मिळवूं, नाहींतर मरून जाऊं, हा आमचा बाणा. कुठल्याच परक्याची आम्हांला मदत नको आहे. ”

" मार गप्पा, मार गप्पा ! " उषा भेसूर हांसत म्हणाली, " जशी कांहीं सुलभा हेगडे म्हणजेच सारी कॉंग्रेस ! कॉंग्रेसचीं सारीं सूत्रं जशीं काहीं हीच एक चालवतेय ! हें पहा सुलूताई, घरबसल्या गप्पा मारणं सोपं असतं—तिथं प्रत्यक्ष काम करणाऱ्या माणसाला ज्या अडचणी कळतात—"

" उगीच कांहीतरी बोलू नकोस. " वहिनी म्हणाली, " कशाला लागलां होतां स्वतंत्र मजूरपक्षाच्या कच्छपीं ? काय अडलं होतं त्यांच्यावांचून तुमचं ? काय गिरणगांवांत तुम्हांला कोण ओळखत नव्हतं कीं तुमचं तिथं वजन नव्हतं ? आज निष्कारण जी ही लालबावट्याची बदनामी झाली तिला जबाबदार कोण ? जाऊन विचार तुझ्या पुढाऱ्यांना—खास त्यांना पश्चात्ताप होत असेल आज !—"

" बरं, बरं. कळलं ! " उषा म्हणाली, " यावेळीं तुझ्याबरोबर वाद घालायला मला वेळ नाहीं. आधीं आंघोळ केली पाहिजे मला. तीन दिवस सारखी धुरळ्यांत राबतें आहें,—" असें म्हणत म्हणत ती आंत निघून गेली.

" अगदीं बरोबर वर्मावर हाणलंस ! " म्हातारा म्हणाला, " पटलंच तिला तें. ते पुढारीसुद्धां आतां मनगटं चावीत असतील ! "

चर्चा जरी चालू होती तरी उषेबद्दल पुन्हां उल्लेख निघाला नाहीं आणि तीही त्यानंतर बाहेर आली नाहीं.

दुसऱ्या दिवशीं सकाळींच आम्हीं जायचं ठरवलं तें ऐकून म्हाताऱ्याच्या डोळ्याला पाणी आलं. तो म्हणाला, " इतक्या दिवसांनीं आलीस पोरी, पण पोटभर बोलायला सुद्धां मिळालं नाहीं. कितीतरी बोलायचं राहून गेलं आहे. ही एक धोंड कशी उतरते माझ्या उरावरून, याचाच पेंच पडलाय मला. एक दिवस ही पोर माझ्या तोंडाला खास काळं फासणार ! "

" कांहीं भिऊं नका, " वहिनी उदासवाणं हंसून म्हणाली, " काहीं काळं फांसायची नाहीं ! मला त्याचा पक्का अंदाज आहे. "

तो विषय तेवढ्यावरच राहिला. सकाळच्या गाडीनं आम्हीं पुण्याला जायला निघालों तेव्हां म्हातारा आम्हांला पोहोंचवायला आला होता. गाडी सुटायच्या वेळेला म्हाताऱ्याला भडभडून आलं तें पाहून वहिनीचाही तोल सुटला. तीही रडूं लागली.

पण माझा गळा कां दाटून आला हें माझं मलाच कळेना.

---

# १४

एम्. ए. च्या टर्म्स भरण्यासाठीं उषा पुन्हां पुण्याला आली होती. काय झालं कोण जाणे, पण पुन्हां आल्यापासून उषा साम्यवादाची एवढीसुद्धां चर्चा करीत नव्हती. त्या प्रकरणावर पडदा पडला होता.

एक दिवसाच्या संपाचं प्रकरण विझून गेलं. त्यानंतर दारूबंदी आली. त्या चळवळींत भाग घ्यायला आमच्यापैकीं कुणीच पुढं सरसावलं नव्हतं. दारूवन्दी झाली होती ती मुंबईत—पुण्यांत तिचा कांहीं संबंध नव्हता.

तिनक्यांत लढाई सुरू झाली. हिंदुस्थान सरकारनं ब्रिटिशांच्या वैऱ्यांविरुद्ध लढाईची घोषणा केली, तेव्हां आपलं निश्चित धोरण ठरवण्यासाठीं कॉंग्रेसच्या साऱ्या मंत्रिमंडळांनीं एकदम राजिनामे दिले. अधिकारविसर्जनाच्या दिवसाची परिस्थिति पहाण्यासाठीं मी मुंबईला गेलों होतों. एका दिवसांत सारी हवा बदलून गेली होती. इतके दिवस काढून ठेवलेल्या No admission च्या पाट्या पुन्हां आपल्या जागीं जाऊन बसूं लागल्या होत्या. काळे गोरे, लहान मोठे—सेक्रेटरीएट मधले सारे कारकून आतां खुषींत आले होते. कॉंग्रेसमंत्रिमंडळाच्या राजवटींत सेक्रेटरीएटला जें उतारूंच्या मुशाफरखान्याचं स्वरूप आलं होतं, तें जाऊन आतां पूर्वीचं पवित्र (!) वातावरण सुरू होणार, द्विजाखेरीज इतरांना प्रवेश-बंदी असलेल्या देवळाच्या गाभाऱ्याचं स्वरूप येणार, म्हणून नोकरशाही खूष झाली होती.

फक्त वाईट वाटत होतं पटेवाल्यांना. ते बिचारे उघड उघड रडत होते. या मंत्र्यांच्या कारकार्दीत त्यांनीं नव्या सुखाची अमदानी चाखली होती. ती संपली म्हणून त्यांना वाईट वाटत होतं. सर्वांत त्यांना जाणवत होतं तें हेंच—कुणबी पटेवाल्यालासुद्धां मिळालेला नमस्काराचा अधिकार गेला! आतां जमिनीपर्यंत वांकून मुजरा करावा लागणार!

पुन्हां पूर्वींची राजवट सुरू झाली. आमच्या घरांत आलेली खादी पहातां पहातां

नाहींशी झाली. वहिनीनं मात्र आपली चिकाटी सोडली नाहीं. एकदां टाकलेली खादी पुन्हां पत्करली, ती आतां पुन्हां टाकायची नाहीं असा तिचा निर्धार होता.

उषा आतां एक अस्सल अभ्यासू विद्यार्थिनी बनली होती. तें राजकारण, ती आयडिऑलॉजी, तो विरोधविकासवाद, तीं व्याख्यानं, तीं चर्चा-मंडळं सारीं कांहीं बंद झालीं होतीं.

आमचा संसार अगदीं मरतुकडेपणानं चालला होता. दादा आपल्या नोकरीवर जात होता, मी आपल्या नोकरीवर जात होतों, दीक्षितांच्या इंटर-नॅशनल बुक डेपोमधून पुस्तकं आणून वहिनी वाचीत होती, उषा आपला अभ्यास करीत होती, आत्त्याबाई सैंपाक करीत होत्या, गडीमाणसं आपापलीं कामं करीत होतीं, शिपायांची येरझार सुरू होती—सारं कांहीं ऐषआरामांत चाललं होतं.

कुणाची मनःस्थिति काय होती याचा पत्ता मात्र कुणालाच लागत नव्हता. वहिनीनं आणलेलीं पुस्तकं मधून मधून मीही वाचीत असें. उषा मात्र त्याना हातसुद्धां लावीत नसे. वहिनीची आणि माझी बैठक क्वचितच होई. झालीच तर एकाद्या पुस्तकाच्या चर्चेवर. बाहेरच्या राजकारणाचा एक शब्दसुद्धां उच्चारायची कुणाला इच्छा होत नसे.

उषा एम्. ए. होऊन फर्स्टक्लासांत आली—आणि पुण्याच्या त्याच कॉलेजांत तिला लेक्चररची जागा मिळाली.

तितक्यांत एक खळबळ उडाली. सरकारला वर्दी देऊन विनोबा भावे यांनीं वैय-क्तिक सत्याग्रह केला. सर्वत्र चर्चा होऊं लागली पण वहिनी त्याबाबतींत एक शब्दसुद्धां बोलत नाहीं असं पाहून मला मोठं आश्चर्य वाटलं. तिनं होऊन विषयाचा उपक्रम केल्याखेरीज आपण कांहीं बोलायचं नाहीं असा माझा निर्धार होता.

वैयक्तिक सत्याग्रहाची परंपरा सुरू झाली होती. त्या परंपरेंत मंत्रिमंडळांतले मंत्री-सुद्धां गेल्यानंतर इतरही बरेचसे कॉंग्रेसजन गांधीजींची अनुज्ञा मिळवून वैयक्तिक सत्याग्रह करूं लागले. हा सत्याग्रह करायला वाटेल त्याला मुभा नव्हती. कांहीं विशिष्ट अटी पाळून सत्याग्रहपत्रिकेवर सही करणारांतलीं जीं माणसं गांधीजी निवडतील त्यांनाच हा सत्याग्रह करतां येत असे.

अलिकडे माझं पूर्वीचं पत्र बंद झाल्यामुळं मी दुसऱ्याच एका दैनिकाच्या कचेरींत प्रूफ करेक्टरची नोकरी पत्करली होती. पुढं सहसंपादक व्हायची मला आशा होती. एके

दिवशीं ऑफिसांतून घरीं आल्यावर मी या वैयक्तिक सत्याग्रहाबद्दल बोलत होतों. अशा कांहीं गोष्टी काढल्या म्हणजे त्या खोडून काढणारी वहिनी आज मुकाट्यानं ऐकूं लागली. मी बोलत होतों. वहिनीबरोबर उषासुद्धां ऐकायला बसली होती. तितक्यांत दादा माडीवरून खालीं आला आणि म्हणाला, " बाळू, असल्या गोष्टी बोलायच्या असतील तर तिकडे बँडगार्डनवर जाऊन बोल. समजलं ? "

" कां ? " वहिनीनं विचारलं.

निर्विकार मुद्रेनं वहिनीकडे पाहून गालांतल्या गालांत हंसून दादा म्हणाला, " माहीत असून कां विचारतेस ? "

" असं का ? " वहिनीनं ओठावर येणारा रागाचा बोल बळेंच गिळून विचारलं. तिची मुद्रा पालटून गेली होती.

" कळलं ना आतां ? " असं म्हणून दादा निघून गेला.

" कळलं ! " दादा जात असतांना त्याला ऐकूं येईल एवढ्या मोठ्या आवाजांत वहिनी उद्गारली.

दादाच्या पाठोपाठ उषा निघून गेली.

" पाहिलंत ? ऐकलंत ? " वहिनी माझ्याकडे पाहून हलकेच म्हणाली, " कळलं ना आतां ? "

वहिनीला काय कळलं असेल तें असो, मला या प्रकाराची नीटशी अटकळ झाली नव्हती. मी म्हटलं, " खरं सांगू ? मला नीटसं कांहीं कळलं नाहीं. एवढंच वाटलं— नुसती शंका आली—कीं ही बंदी कांहीं आजचीच नव्हे. "

" खरं आहे तें. " वहिनी म्हणाली आणि उगीच बसली.

कितीतरी वेळ आम्हीं तसींच बसून राहिलों होतों. एक शब्दसुद्धां बोलत नव्हतों.

ती संध्याकाळची वेळ होती. दादा आणि उषा बाहेर जायच्या तयारीनं एकमेकांशीं हंसत बोलत जिन्यावरून खालीं आलीं आणि आम्हांला खिजगणतींतसुद्धां न घेतां तडक बाहेर निघून गेलीं. तीं निघून जातांच वहिनी माझ्याकडे वळून म्हणाली, " हा मुका मार आतां कसा सहन करूं ? तुम्ही बाहेर असतां, तुम्हांला कांहीं कळत नाहीं, पण प्रत्यक्ष माझ्या नजरेसमोर मला धिक्कारून हीं जीं थेरं चाललीं आहेत तीं पाहत असून देखील कशी स्वस्थ बसूं ? "

मी कांहींच बोललों नाहीं. मलासुद्धां थोडाथोडा संशय येत होता. पूर्वीचा संशय होताच पण अलीकडे दादानं अगदीं ताळ सोडला आहे असं मला स्पष्ट दिसत होतं. पूर्वीसुद्धां तीं दोघं फिरायला जात—पण तीं चोरून मारून. आतां दादा उषेला बरोबर घेऊन सकाळीं संध्याकाळीं रोज फिरायला जाई. दोघंही बरोबरच परत येत. उभ्या आयुष्यांत वहिनीला बरोबर घेऊन तो एक दिवससुद्धां फिरायला गेला नव्हता.

गावांतली चर्चा पूर्वीचीच होती—पण आतां कुणी चर्चा करीत नव्हतं—पाहणाऱ्यांच्या तें आतां अंगवळणीं पडून गेलं होतं. हें सारं मला दिसत होतं म्हणूनच मी उगी राहिलों

" कां, बोलत कां नाहीं ? " वहिनी म्हणाली, " कांहीं बोलावं असं वाटत नाहीं का तुम्हांला ? "

" नाहीं, " मीं म्हटलं, " हें कांहीं नवीन नाहीं. पूर्वीपासूनच मी हें पाहतों आहें. मी नजर ठेवायला गेलों तर तें तुला आवडत नसे. आतां कशाला तक्रार करतेस ? "

" तक्रार नव्हे भावजी, " वहिनी म्हणाली, " मी नुसती विचारतेंय. ' पुरुषांची जात ' म्हणून पुरुषांना नांवं ठेवायची मला आवड नव्हती. तशीं कुणी नांवं ठेवलीं तर तो दोषारोप उगीच होतो आहे असं मला वाटे. आतां प्रत्यक्ष माझ्यापर्यंत येऊन पोहोचलं, भवितव्याला झोंबलं, तेव्हां पाहूं लागलें–तेव्हां कळून चुकलं, कीं जे होताहेत दोषारोप ते कांहींच नाहींत ! हें असंच चालू रहाणार. कांहीं फरक व्हायचा नाहीं यांत ! "

तिच्या हृदयांतून निघणाऱ्या सुस्काऱ्याबरोबरच माझ्याही हृदयांतून तसाच एक सुस्कारा कसा निघून गेला, याचं मला आश्चर्य वाटलं. कुठं तरी समवेदना उत्पन्न झाली का ?

उत्तर जरी दिलं नाहीं तरी मला प्रश्न पडला तो हा, कीं याला उपाय काय ? उपाय करण्याइतकं हें प्रकरण विकोपाला गेलं होतं, उपाय करणं शक्य नव्हतं, तसंच उपाय केल्याशिवाय रहाणं कठीण होतं. असंस्कृतांची आणि असमंजसांची गोष्ट निराळी होती. सुसंस्कृतांच्या मनाचा कोंडमारा त्यांना असह्य होत असतो. मी म्हटलं, " कांहीं दिवस मुंबईला जाऊन राहीनास तुझ्या दादांकडे ? "

" कांहीं दिवस कां ? " वहिनी म्हणाली, " आतां कुठं जायचं तें कायमचंच जावं लागेल. आतां मी गेलें कीं यांना चारी वाटा मोकळ्या होतील—" असं म्हणून एक क्षणभर थांबून ती म्हणाली, "—माझ्यासारखा त्यांचाही कोंडमारा होत असेल. कुणी-

तरी वाट मोकळी करून दिली पाहिजे. त्यांना ती जरूरी भासत नाहीं—पण माझ्या बहिणीच्या कल्याणाकडे पाहिलं पाहिजे मला. त्यापायीं खर्ची पडल्याखेरीज आतां गत्यंतर नाहीं. एक जीव तरी सुखाला लागेल !"

त्या रात्रीं जेवणं झाल्यानंतर आम्हीं बसलों होतों—दादा नव्हता—त्यावेळीं मी उषेला विचारलं, "आतां अगदीं मास्तरीण बनून रहायचं ठरवलं आहेस होय ?"

"तर काय करायचं ?" उषा म्हणाली, "कॉंग्रेसचीं तत्वं मला पटत नाहींत. ज्यांचीं तत्वं पटतात त्यांचे मार्ग पटत नाहींत. जितकं जास्त बघत जावं तितका जास्त बुद्धिभेद होतो. विश्वास कुणावर ठेवावा हेंच कळत नाहीं—"

"तें खरं आहे," मीं म्हटलं, "मुंबईचे ते एक कम्युनिस्ट पुढारी काल आमच्या कचेरींत आले होते. ते म्हणत होते, कीं त्यांच्यातल्या कुणातरी एका मुलीनं त्यांचे सारे बेत पोलिसांना कळवले—" टाकलेला डाव कसा लागू पडतो हें पहाण्यासाठीं एक क्षणभरच मी तिच्या चेहऱ्याकडे पाहिलं तेव्हां ती दचकली असं पाहून मी म्हटलं, "तूंच नाहीं ना सांगितलंस ?"

"मी ?" उषा गडबडत म्हणाली, "मी कशाला सांगूं ? अन् सांगणार तरी कुणाला ? अन् कां सांगणार ? अन् सांगण्यांत माझा फायदा काय ?—कोण होते ते ?"

"आमच्या संपादकांबरोबर बोलत होते," मी म्हटलं.—खरं बोलायचं म्हणजे कोणच आलं नव्हतं.—तिच्या कपाळाला आठ्या पडल्या असं पाहून मी म्हटलं, "मला त्यांचं नांव माहीत नाहीं. विचारलं तर उगीच त्याना संशय आला असता. सर्वांनाच माहीत आहे, कीं माझा भाऊ पोलिसांत आहे."

"काय तरी माणसांचा स्वभाव असतो!" उषा म्हणाली, "ऐकलंस ना सुलूताई ?—तुझे भावजी काय म्हणतात तें ऐकलंस ?"

"मलासुद्धां तसंच वाटतं." वहिनी शांतपणें म्हणाली.

"तुलासुद्धां तसंच वाटतं होय ?" बसल्या जागेवरून ताड्कन उठून उषा म्हणाली, "हंः ! रावसाहेबांचा संशयच खरा आहे तर ! ही दोन्हीं मनं एक झालीं आहेत कीं दोघांचं संगनमत झालंय ?"

"तुला वाटेल तें समज. पण मी सांगतें, एकदां ज्या माणसानं एक गुन्हा केला—त्या गुन्ह्याबद्दल ज्या माणसाला पश्चात्ताप झाला नाहीं—तो गुन्हा त्या माणसानं पुन्हां

केला म्हटलं तर म्हणणाराला दोष नाहीं देतां यायचा ! " वहिनी एकेक शब्द टिपून बोलत होती.

" असं होय ? " उषा रागानं बेफाम होऊन म्हणाली, " वडील बहीण म्हणून बोलूं नये पण मीही तुला सांगतें, माझेही डोळे कांहीं फुटले नाहींत. मी गुन्हेगार असलें तरी तूंही कांहीं निर्मळ नाहींस. तूं देखील गुन्हे करते आहेस नि त्याचीं फळं भोगायची वेळ देखील जवळ आली आहे. "

" हें कळलं तें बरं झालं. " वहिनी नितक्याच शांतपणें म्हणाली, " भावजीनीं हा विषय काढला म्हणून कळलं, नाहींतर कांहींच कळलं नसतं. आतां मी सावध राहीन. "

" बरं, बरं ! म्हणे भावजी ! " असं म्हणून उषा निघून गेली.

कितीतरी वेळ आम्हीं दोघं एक शब्दसुद्धां न बोलतां तिथं बसून राहिलों होतों. तितक्यांत दादा आला आणि वर निघून गेला. टेबलाजवळचा दिवा पेटवून वहिनी कागद काढून लिहीत बसली. यापूर्वी या जागीं ती कधींच लिहायला बसली नव्हती. तें लिहायचं टेबल माझं होतं. मी मुकाट्यानं पहात बसलों होतों, त्यामुळं तासचे तास ती लिहीत बसली होती कीं काय असं मला वाटलं.

पत्र लिहून संपतांच माझ्याकडून तिनं एक कोरं पाकीट मागून घेतलं आणि पत्र पाकिटांत बंद करून पत्ता लिहिल्याशिवाय तसंच घेऊन ती निघून गेली.

सकाळीं उठून मी खोलीबाहेर आलों तेव्हां तिथंच हॉलमधें एका कोचावर वहिनी झोपीं गेल्याचं मला आढळून आलं. उषा कुठं दिसत नव्हती. काम नसे तेव्हां दादा उशिरां उठून खालीं येत असे—तोही आला नव्हता. वहिनीला कसं जागं करावं याचा विचार करीत होतों तोंच ती एकदम दचकून जागी होऊन उठून बसली आणि मला समोर पाहून म्हणाली, " काय वेड्यासारखी झोपलें मी एवढा वेळ !— " मी कांहीं बोलायच्यापूर्वीच ती झट्कन घरांत निघून गेली.

मी आश्चर्यचकित झालों—दादा आणि उषा बाहेरून आंत आलीं. भल्या पहाटे उठून तीं दोघं फिरायला गेलीं असावीं.

हें काय चाललं होतं ?

त्या दिवशीं कुणी कुणाशीं कांहींच बोललं नाहीं.

सत्याग्रह करून वहिनी पकडली गेल्याचं दादानं मला त्या दिवशीं सकाळीं बाहेरून येतांच सांगितलं. शेवटीं नवऱ्याच्या हातून पकडलं जाण्याचं भाग्य तिला एकदाचं लाभलं.

दादा म्हणाला, " तशी तिला फारशी शिक्षा व्हायची नाहीं असं मला वाटतं. पण हें पहा बाळू, वाईट वाटून घेऊं नकोस—मला शेवटचं सांगायचं आहे तुला—आतां तुझा मार्ग तूंच पहावास हें बरं. इथंच दुसरीकडे राहिलास तर मी तुला घरांतून घालवून दिलं अशी उगीच वकवा होईल. मला वाटतं तूं मुंबईला जा. तिचे वडील तुझ्यासाठीं कांहींतरी करतील. तशी तात्पुरती पैशांची गरज असली—"

" छे, छे. मुळींच नाहीं, " मीं म्हटलं, " आजवर मिळवलं तें सारंच शिल्लक आहे माझ्याकडे—"

तें ऐकून दादा जात होता त्याला थांबवून मीं म्हटलं, " आजच जाणार आहें मी. पुन्हां कदाचित तुझी भेट होणार नाहीं म्हणून हाच निरोप घेतों ! " असं म्हणून मी त्याच्या पायावर डोकं ठेवलं.

डोकं वर करून उभा रहातों तो समोर उषा उभी असलेली दिसली. चकित झाल्याचा आव आणून ती म्हणाली, " काय झालं बळवंतराव ? "

" मी मुंबईला जातों आहें आज. तुझ्या दादांकडेसच जातोंय. "

" बोलावलंय वाटतं त्यांनीं ? केव्हां येणार ? "

" नाहीं—तिथंच रहायला जातोंय. "

दादाकडे वळून उषा म्हणाली, " मोठा विलक्षण आहे आमच्या दादांचा स्वभाव ! बरं का रावसाहेब, काय केव्हां कुणाबद्दल मनांत घेतील तें समजायचं नाहीं. गेल्या वर्षी दोनच दिवस बळवंतराव तिथं राहिले होते, पण तेवढ्यांतच ते अगदीं खूष झाले होते त्यांच्यावर. "

" बरं बरं ! " दादा म्हणाला, " अन् हें पहा बाळू, जेवल्याशिवाय जाऊं नकोस हं. " दोघंही माडीवर निघून गेलीं.

अगदीं प्रेमळ जोडपं जातंय असं मला वाटलं.

त्याचवेळीं माझ्या संपादकांना पत्र लिहून मी जरुरीच्या कामासाठीं मुंबईला जातों आहें असं कळवलं. असलेली नोकरी एव्हांच सोडायची माझी तयारी नव्हती.

" सिव्हिल मॅरेज ? " मी आश्चर्यचकित होऊन म्हणालों, " तुरुंगांत असली तरी वहिनी अजून हयात आहे. एक बायको हयात असतांना लग्न रजिष्टर कसं होईल ? "

" तें कांहीं मला कळत नाहीं, " वहिनीचे वडील म्हणाले, " हें पहा उषेचं पत्र आणि घे खात्री करून. बरं झालं—सुटलों ! अशा रीतीनं कां होईना, पण हा उषेचा धोंडा एकदांचा माझ्या उरावरून उतरला. "

" पण आतां वहिनीचं काय ? मला नाहीं वाटत ती आतां दादाकडे राहील ! "

" कशाला जायला हवं तिकडे ? " म्हातारा तिरसटून म्हणाला, " इथं मला तरी कोण आहे ? आतां या शेवटच्या दिवसांत मला कांवळ्यावर काढायला दुसरं कोण आहे ? "

टच्कन माझ्या डोळ्यांना पाणी आलं. म्हाताऱ्याच्या तें ध्यानीं आलं. तो म्हणाला, " अरे रडतोयस वाळ्या ! रडायला काय झालंय असं ? तूंच सांगितलीस ना मला सारी हकिकत ? मग झालं तर ! सुटली—मोकळी झाली ! आतां तुरुंगांत जायला तिला कुणाच्या बापाचीही भीति नाहीं. पूर्वी ती म्हणत असे—मीच धरून बांधून तिचं लग्न केलं—आतां लग्न झालं, गेलं, आतां म्हणावं काढ तें तुझं मुलींचं विद्यामंदीर. माझ्या गाढवपणाचं प्रायश्चित म्हणून पन्नास हजारापर्यंत रक्कम देतों मी—"

आतां मात्र मला हसूं आल्यावांचून राहिलं नाहीं. मी म्हटलं, " मला कशाला सांगतां हें ? "

" तुलाच सांगायला हवं—" म्हातारा म्हणाला, " तें असं आहे, आम्हां म्हाताऱ्यांना वाटतं, पोरींच्या कल्याणाची दोरी आमच्या हातीं आहे. ती धरून आम्हीं त्यांना कुणाच्या तरी दावणीला बांधतों. आमच्या मतें तें स्थळ मोठं उत्तम असतं पण तिच्या मतें तें कसं असतं याची आम्ही कदरच करीत नाहीं. अन् मग हें असं होतं— "

" पण हें सिव्हिल मॅरेज कसं झालं ? "

" तें कांहीं मला कळत नाहीं. झालंय हें असं आहे. तिनं प्रत्यक्ष लिहिलंय, त्यानं ताजाकलम जोडलाय, माझा आशीर्वाद मागितलाय—दुसरं कांहीं मागितलं नाहीं. पैसे मागितले

असते तर विचार करावा लागला असता. नुसता आशीर्वाद द्यायला माझ्या बापाचं काय खरचतं ! आतां तूं इथंच रहा. मला कुणीतरी हातकाठी पाहिजे आहे. ती आली तर तीसुद्धां इथं राहील—दुसऱ्या कुठं रहायचं असलं तर तीही व्यवस्था करून देईन. पण मला वाटतं, तिनं तसं दुसरीकडे राहूं नये. कुठं काय जमलं असेल तर पुन्हां लग्न करून टाकावं. माझी कांहीं हरकत नाही. जमलं नसलं तर एकादं स्थळ शोधून काढावं. त्यालाही माझीं हरकत नाही. पण जी काय देशसेवा—लोकसेवा तिला करायची असेल, ती करतांना कुणीतरी जोडीदार असेल तिची काळजी घ्यायला, तर मला तेवढंच बरं वाटेल. सुखानं मरण येईल मला. मोठी खोल स्वभावाची आहे ती पोर. एकटंच राहूं देतां नये तिला. त्यांतून ह्या भानगडी झालेल्या. झुरणीला लागायची उगीचच—"

म्हातारा सारखा बडबडत होता.

माझं काळीज सारखं धडधडत होतं.

वहिनी आली तेव्हां सारा उलगडा झाला. ती बातमी तिला तुरुंगांतच कळली होती.

तो सगोत्र विवाह होता. कायद्याच्या दृष्टीनं तें लग्नच नव्हतं. आजवर ती दादाची बायको म्हणून नांदत होती पण कायद्याच्या दृष्टीनं ती रखेली होती. हिंदुधर्मशास्त्र आणि हिंदू लॉ यांच्या कृपेनं आतां ती आपोआप मोकळी झाली होती. हीच पळवाट काढून दादानं उषेशीं लग्न केलं होतं.

त्या मुक्ततेबद्दल तिला आनंद वाटत होता. इतक्या वर्षांचा तो मुका मार आतां संपला होता. नवा जन्म झाल्यासारखं तिला वाटत होतं.

माझं हृदय आनंदानं भरून आलं. जन्माचं सार्थक झाल्यासारखं मला वाटलं.

आशीर्वादासाठीं हात पुढं करून म्हातारा तयार होताच.

अजूनही मी तिला 'वहिनी' म्हणतों—पण ती मात्र मला आतां 'भावजी' म्हणत नाहीं.

ॐ तत्सत्

# वरेरकरांचें वाङ्मय

**नाटकें:—** ( १ ) कुंजविहारी ( २ ) संजीवनी ( ३ ) सरस्वति ( ४ ) वरवर्णिनी ( ५ ) ह्याच मुलाचा बाप ( ६ ) समर्थ भिकारी [ चंद्रशेखर ] ( ७ ) लयाचा लय ( ८ ) संन्याशाचा संसार ( ९ ) सत्तेचे गुलाम ( १० ) पतित पावन [ तुरुंगाच्या दारांत ] ( ११ ) नवा खेळ ( १२ ) करग्रहण ( १३ ) करीन ती पूर्व ( १४ ) सोन्याचा कळस ( १५ ) जागती ज्योत ( १६ ) स्वयंसेवक ( १७ ) समोरासमोर ( १८ ) कोरडी करामत ( १९ ) केवळ कलेसाठीं ( २० ) उडतीं पाखरें ( २१ ) सारस्वत ( २२ ) त्याची घरवाली ( २३ ) भाग्याचा भगवंत ( २४ ) रंगभूमीच्या वाटेवर ( २५ ) सेनानी ( २६ ) चला लढाईवर.

**लघु नाटकें:—** ( २७ ) वज्रकुसुम ( २८ ) पापी पुण्य ( २९ ) संसार ( ३० ) नामानिराळा ( ३१ ) सदा वंदीवान ( ३२ ) श्रेय कुणाचें ?

**कादंबरी—** ( ३३ ) संसार कीं संन्यास ? ( ३४ ) चिमणा ( ३५ ) विधवा-कुमारी ( ३५ ) गोदू गोखले भाग १ ( ३७ ) गोदू गोखले भाग २ ( ३८ ) धांवता धोटा ( ३९ ) परतभेट ( ४० ) कुलदैवत ( ४१ ) उघडझांप ( ४२ ) विकारी वात्सल्य ( ४३ ) वेणू वेलणकर ( ४४ ) उमलती कळी ( ४५ ) न पुजलेली देवता ( ४६ ) मलबारहिल ( ४७ ) १९१४ नंतर ( ४८ ) कुणाचा हा देश ? ( ४९ ) भानगड गल्ली ( ५० ) पेटतें पाणी ( ५१ ) सात लाखांतील एक ( ५२ ) तरतें पोलाद ( ५३ ) गीता ( ५४ ) फाटकी वाकळ ( ५५ ) मी–रामजोशी ( ५६ ) शिपायाची बायको ( ५७ ) अर्ध्या वाटेवर ( ५८ ) द्राविडी प्राणायाम ( ५९ ) रस्सीखेंच.

**अनुवाद—** ( ६० ते ६३ ) श्रीकांत भाग १ ते ४. ( ६४ ) गांवगंगा ( ६५ ) भैरवी ( ६६ ) विजया ( ६७ ) विराजवहिनी ( ६८ ) विप्रदास.

**लघुकथा—** ( ६९ ) स्वैरसंचार ( ७० ) षोडशी ( ७१ ) वैमानिक हल्ला ( ७२ ) एकादशी.

**किरकोळ—** ( ७३ ) आघात ( व्याख्यानें ) ( ७४ ) श्रूतिका ( श्राव्यप्रकरणें ) ( ७५ ) आजचे संवाद ( ७६ ) माझा नाटकी संसार ( आत्मचरित्रात्मक ) ( ७७ ) पुन्हां आघात ( व्याख्यानें )

---